







नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका




# नवी क्षितिजे

अंक सत्तेचाळीसावा १९९६

संपादक

श्री. नाना जोशी

रचना

हेमचंद्र कराडकर

अक्षरजुळणी

अभिजित पंडित

मुद्रण व्यवस्था

विजय एंटरप्रायझेस,
'भाग्यरेखा', जुना बेलापूर रस्ता,
कळवा, ठाणे.

मालक, मुद्रक, प्रकाशक
आणि पत्रव्यवहार

श्री. नाना जोशी
४ – अ, सोमणनगर,
क्रांतीवीर भाई बालमुकुंद मार्ग,
मुंबई – ४०० ०१२

## अनुक्रमणिका







## संपादकीय

नवी क्षितिजेचा सत्तेचाळीसावा अंक आपल्या हाती देत आहोत.

ज्येष्ठ पत्रकार व श्रेष्ठ लेखक दि. वि. गोखले हे नुकतेच दिवंगत झाले. मृत्यूपूर्वी त्यांच्या 'क्लाउजवित्सची युद्धमीमांसा' या प्रसिद्ध होणाऱ्या ग्रंथातील काही भाग 'नवी क्षितिजे' मध्ये प्रकाशित करण्यासाठी त्यांनी दिला होता. या अंकात तो लेख समाविष्ट करीत आहोत. हीच त्यांना उचित श्रद्धांजली ठरेल.

'गणित विज्ञानाची भाषा' या वाचकांना आवडलेल्या लेखाचा पुढील भाग या अंकात वाचावयास मिळेल. यातील शून्यासंबंधी केलेले विवेचन वाचकांना उद्‌बोधक ठरेल. सनातन काळापासून चालत आलेली पुनर्निर्माणाची क्रिया कशी घडते व त्यांत किती गोष्टी अंतर्भूत असतात याचा शास्त्रीय पद्धतीने केलेला अभ्यास मराठी वाचकांपर्यंत पोचविण्यासाठी एक नवीन लेखमाला सुरू करीत आहोत. डेव्हिड बूस यांच्या 'दि डिझायर फॉर मेटिंग' या पुस्तकावरून हा लेख प्रतिभा टिल्लू यांनी लिहिला आहे. श्री. देशपांडे यांचा 'संगीत' या विषयावरील लेख वाचकांना आवडेल अशी खात्री आहे. ऐक्य आणि विविधता (प्रदेश व विभाग) या लेखातून प्रादेशिक संस्कृतीचा राष्ट्रीय संस्कृतीशी असलेला संबंध वाचकांना समजेल. मागील अंकात फळे आणि भाज्यांचा इतिहास देणारा लेख आपण वाचला. या अंकात त्या लेखाचा पुढचा भाग देत आहोत. त्यांतील मसाल्याच्या पदार्थांचा समाज– सांस्कृतिक इतिहास सर्वांनाच रोचक वाटेल असा विश्वास वाटतो.

**– नाना जोशी**

---

**नवी क्षितिजे संबंधी :**

* सुट्या अंकाची किंमत रु. १५०/-
* ४५, ४६, ४७, ४८ अशा चार अंकाची वर्गणी रुपये २०१/-
* प्रत्येक अंकाची पृष्ठ संख्या १७०-१७५
* वर्गणी मधल्या अंकापासून स्वीकारली जाणार नाही. थोडक्यात ४६ या अंकासाठी वर्गणी पाठविल्यास ४५ व्या अंकापासून अंक पाठविण्यात येईल.

अनुक्रमणिका



# युद्धवेत्ता कार्ल फॉन क्लाउजवित्स याचे अल्पचरित्र व कामगिरी

**– दि. वि. गोखले**

नेपोलियन बोनापार्टला फ्रेंच राज्यक्रांतीचे अपत्य मानले तर कार्ल फॉन क्लाउजवित्स या जर्मन युद्धवेत्त्याला नेपोलियनने आजन्म केलेल्या अनेक नेत्रोद्दीपक युद्ध- मोहिमांचे अपत्य मानावे लागेल. नेपोलियनचे नाव ऐकलेले नाही, असा मराठी ग्रंथवाचक क्वचितच आढळेल, व त्याचबरोबर क्लाउजवित्सचे नाव ऐकलेला मराठी वाचकही क्वचितच सापडेल. युद्ध हा राष्ट्राच्या धोरणाचा अन्य (हिंसक) मार्गांनी केलेला विस्तार असतो. हे क्लाउजवित्सचे वारंवार उद्धृत केले जाणारे वचन काहींच्या कानावरून गेले असावे. मात्र, या पलीकडे त्याची माहिती फारच थोड्यांना असेल. विशेष म्हणजे तो ज्या आपल्या देशाच्या विजयासाठी लढाया लढला, त्या त्याच्या जर्मन पितृभूमीतही त्याच्या मृत्यूपर्यंत त्याचे नाव फारसे कोणाला ठाऊक झालेले नव्हते. आजची स्थिती अशी आहे की, क्लाउजवित्स आख्यायिका बनून राहिला आहे. जगांतल्या कोणत्याही युद्ध समीक्षकाला त्याचे नाव टाळून पुढे जाताच येत नाही.

कार्लचा जन्म अगदी सामान्य कुटुंबात झाला. दुसऱ्या महायुद्धापावेतो जर्मनीत फॉन या पदाला फार महत्त्व होते. फॉन म्हणजे उच्च कुळातला वा उमराव घराण्यातील माणूस. अर्न्स्ट फ्रीडरिश बॅरन फॉन क्लाउजवित्स हा आपला मूळ पुरुष असा क्लाउजवित्स घराण्याचा दावा असे. गंमत म्हणजे फ्रीडरिशच्या वंशजांनी जमीनदारी सोडून अध्यापन व धर्मोपदेश या व्यवसायात प्रवेश केला. खरे कारण म्हणजे या घराण्यापाशी फारशी शेतीवाडी नव्हतीच. नावालाच ते उमराव होते. मात्र त्याचा थोडासा उपयोग त्यांना सैनिकी पेशात प्रवेश मिळण्यासाठी झाला.

कार्लच्या वडिलांनी सेनादलात प्रवेश मिळविला. त्यांचे नाव फ्रीडरिश गेब्रिएल. जन्म १३ फेब्रुवारी १७४०. ते नऊ वर्षांचे असताना त्यांचे वडील वारले. आईने सैन्यात मेजर असलेल्या इसमाशी पुनर्विवाह केला. त्याच्या सांगण्यावरून म्हणा, अगर ओळखीने म्हणा, फ्रीडरिश सैन्यात दाखल झाला आणि क्लाउजवित्स घराणे पुन्हा फॉन हे पद मिरवू लागले.

इ. स. १७५६- ६३च्या सप्तवार्षिक युद्धात फ्रीडरिश लेफ्टनंट म्हणून लढला. दुर्दैवाने एका चकमकीत त्याचा उजवा हात निकामी झाल्याने त्याला लष्करी सेवा सोडावी लागली. ६० साली त्याला एक किरकोळ पगाराची नोकरी देण्यात आली. मात्र क्लाउजवित्स कुटुंबाने लष्करी सेवा हाच मुख्य पेशा बनविला. फ्रीडरिशच्या चार मुलांपैकी तिघे सैन्यात गेले, तर

त्याच्या दहापैकी नऊ पुतण्यांनी सेनेतील सेवा पसंत केली. फ्रीडरिशला चार मुलांखेरीज दोन मुली. कार्लचा जन्मदिवस १ जून १७८०.

फ्रीडरिशला अवघ्यां २७ व्या वर्षी सेनेतून निवृत्त व्हावे लागले. तशातच त्याला नवी करवसुलीची नोकरी आवडत नसे. सेनेतील आपल्या दोस्तांशी गप्पा मारण्यात त्याला आनंद वाटे. स्वाभाविकच बऱ्याच लष्करी मंडळींची त्याच्या घरी ये– जा असे व त्यांच्या गप्पा मुलांच्या कानावर पडत. कार्लचे दोघे मोठे भाऊ विल्हेल्म आणि फ्रित्स सैन्यात अधिकारी म्हणून गेले. कार्लने १७९२ साली सेनेत प्रवेश केला. सैन्याबद्दलच्या आकर्षणाबरोबर घरची गरीबी हेही सेनादलात जाण्याचे मोठे कारण होते. तिघेही बंधू जनरलपदापर्यंत चढले. कार्ल व विल्हेल्म मेजर जनरल बनले, तर फ्रित्स लेफ्टनंट जनरल होऊन निवृत्त झाला. फ्रित्स शिपाई होण्यासाठीच जन्माला आला होता. 'सैनिकांचा सैनिक' असे त्याचे वर्णन केले जाई. नेतृत्वगुणही त्याच्यामध्ये प्रकर्षाने होते.

पॉट्सडॅम या बर्लिननजीकच्या लष्करी केंद्रातील ३४ व्या पायदळ रेजिमेंटमध्ये कार्ल दाखल झाला तेव्हा तो केवळ बारा वर्षांचा होता (१७९२). मात्र तेथे त्याचा थोरला भाऊ विल्हेल्म हा त्याच रेजिमेंटमध्ये सेकंड लेफ्टनंट होता. एक प्रकारे कार्लला तो आधार होता. जर्मन पद्धतीप्रमाणे नव्या उमेदवारांना ध्वजवाहक (स्टँडर्ड बेअरर) म्हणून काम करावे लागे. रेजिमेंटच्या पथ संचलनात (रूट मार्च ) कार्लला रेजिमेंटचा ध्वज धरून चालावे लागे. प्रारंभी युद्धातही त्याला त्याच प्रकारची उमेदवारी करावी लागली.

कार्लने लष्करी पेशा पत्करण्याआधीच फ्रान्समध्ये राज्यक्रांती होऊन राजेशाहीचे उच्चाटन झाले व प्रजासत्ताक राज्य स्थापन झाले. (जुलै १७८९). या राज्यक्रांतीने एकता, बंधुता नि समता या तत्त्वांचा उद्घोष केला नि परिणामी साऱ्या युरोपखंडातील वातावरण आमूलाग्र बदलून गेले. सामान्य जर्मन जनता व सैनिक यांनाही राज्यक्रांतीबद्दल आकर्षण वाटू लागले. पण पुढे फ्रान्समध्ये गिलोटिनचा (फाशी देण्याचा) जोर झाला व क्रांतीला विकृत वळण लागले, तसतसा जर्मन जनतेचा क्रांतीबद्दलचा उत्साहही मावळू लागला.

फ्रान्समध्ये युद्धाची तयारी सुरू झाली. आक्रमण होऊ नये म्हणून प्रथम आपणच चढाई करून सीमा पक्क्या करावयाच्या, असा निर्णय क्रांतीच्या नेत्यांनी घेतला. त्यामुळे ऑस्ट्रियाने जर्मनीशी १७९२ सालीच संरक्षण करार केला. त्यावेळी ऑस्ट्रिया हे मोठे साम्राज्य होते व जर्मनी हे तुलनेने लहान राज्य होते. फ्रेंचांनी या कराराला आक्षेप घेऊन ऑस्ट्रियाविरुद्ध युद्ध पुकारले. तेव्हा फ्रान्सच्या आधी आपणच आक्रमणाचे पाऊल उचलावे या उद्देशाने ऑस्ट्रिया– जर्मनीच्या संयुक्त सैन्याने पॅरिसच्या दिशेने कूच केले. पण वाटेत वॉल्मी येथे त्याने फ्रेंच तोफांचा जबर मार खाल्ला व तशातच रोगराई व सैनिकांची नाउमेद यामुळे हे सैन्य ऱ्हाइन नदीच्या अलीकडील काठावर परतले. यावेळी कार्ल सेनेत दाखल झालेला नव्हता.

माघार घेणाऱ्या जर्मन सेनेचा फ्रेंचांनी पाठलाग सुरू केला. ऱ्हाइन नदीच्या काठची अनेक शहरे त्यांनी काबीज केली. फ्रँकफर्टही जिंकले; पण मेंझ शहराची शरणागती हा फ्रान्सचा लक्षणीय विजय. शहराचा पाडाव होताच फ्रेंच सेनेने तेथे 'मुक्तिवृक्षा'चे रोपटे लावले. मुख्य सरकारी कार्यालयात एक 'लाल वही' ठेवली. शहरातल्या शेकडो स्त्री-पुरुषांनी राजीखुशीने त्यात स्वाक्षऱ्या करून क्रांतीशी निष्ठा जाहीर केली. फ्रेंचांना मेंझमधून हुसकावून लावण्याचे काम ब्रन्सविकच्या ड्यूककडे सोपविण्यात आले. त्याच्या सेनेतील एका पायदळ रेजिमेंटमध्ये विल्हेल्म व कार्ल दोघेही होते. १७९३ च्या प्रारंभी या रेजिमेंटने पॉट्सडॅमहून कूच केले. क्लाउजवित्सचा युद्धाचा हा पहिला अनुभव. त्यावेळी त्याचे वय होते तेरा वर्षे. त्याचा एक फ्रेंच चरित्रकार सांगतो : ही रेजिमेंट खेड्यांमधून जात असताना निशाणाच्या भाराने वाकलेला एक मुलगा अग्रभागी चालत असल्याचे दृश्य पाहून लोकांना अचंबा वाटे !

१४ एप्रिल १७९३ रोजी मेंझची लढाई खऱ्या अर्थाने सुरू झाली व त्याच वर्षीच्या २२ जुलैला फ्रेंच शिबंदीच्या शरणागतीने समाप्त झाली. कार्ल क्लाउजवित्सकडे प्रारंभी जखमी व आजारी सैनिकांची हॉस्पिटलात जाऊन चौकशी करणे व खंदकाखंदकांतून अधिकाऱ्यांचे निरोप पोहोचविणे हे काम असे. विशेष म्हणजे जखमांमुळे विव्हळणाऱ्या सैनिकांच्या दुःखाचा त्याच्या मनावर काही परिणाम झाल्याचे त्याच्या लिखाणावरून जाणवत नाही. उलट युद्धातील आवाज, धूर, तेथील धोके यामुळे तो उत्तेजित आलेला दिसतो. आपण स्वतः लढाईत मरणार नाही, अशी अनेक नवख्या सैनिकांची धारणा होते, तशीच कार्लची झाली असावी.

१८ जून रोजी ऑस्ट्रो- जर्मन सेनेने तोफांची जंगी जमावट करून मेंझवर एकाच वेळी गोलंदाजी सुरू केली. त्याचा परिणाम भीषण होता. कार्लच्या जीवनातील तोफांच्या सरबत्तीचा हा पहिलाच अनुभव. पुढे अनेक लढायांत त्याने शेकडो तोफांची सरबत्ती पाहिली. तथापि, एखादे शहर नष्ट करण्याच्या उद्देशाने झालेला तोफांचा मारा त्याच्या पुन्हा कधी अनुभवास आला नाही. हा पहिला अनुभव त्याच्या मनात कायम घर करून राहिला. त्याने पुढे केव्हातरी लिहिले: आमच्या तोफांच्या माऱ्यामुळे मेंझ जळत असताना, सैनिक विजय- घोषणा करीत होते व मीही माझा चिमुकला आवाज त्यात मिळविला होता.

या माऱ्यानंतरही फ्रेंच लगेच शरण आले नाहीत. त्यांनी आणखी एक महिना शहर लढविले. अखेर धान्य दाणावैरण (घोड्यांसाठी) संपत आल्यामुळे त्यांनी शस्त्रे खाली ठेवली. मेंझमधून बाहेर पडणारे अशक्त, रोड झालेले फ्रेंच सैनिक कार्लने पाहिले. फ्रेंचांशी त्याची पहिली गाठ मेंझलाच पडली. पुढे आयुष्यभर फ्रेंचानाच त्याने पहिल्या नंबरचा शत्रू मानले.

### शॉनहॉर्स्टशी परिचय

कार्लच्या दृष्टीने मेंझच्या वेढ्यातील उल्लेखनीय गोष्ट म्हणजे त्याची उमेदवारी संपून त्याला अधिकारी बनविण्यात आले (२०जुलै ९६). आता निशाण खांद्यावरून नेण्याचा प्रश्न नव्हता. इतरांप्रमाणे गणवेष घालून तो घोड्यावरून हिंडू लागला. प्रशियन सैन्यात अगदी कनिष्ठ अधिकाऱ्यापासून फील्ड मार्शलपर्यंत सर्वांचे गणवेष समान असत. जनरलच्या कोटावर निरनिराळे गोफ असत व शिरस्त्राणात पिसे असत, एवढाच फरक.

युद्धाचा जोर हळूहळू कमी झाला. कार्ल दीर्घ रजेवर गेला. या कालात त्याने वाचनावर भर दिला. आपल्या औपचारिक शालेय अभ्यासाची कसर भरून काढण्याचे त्याने ठरविले. १७९५ साली म्हणजे १५व्या वर्षी त्याला पदोन्नती मिळून तो सेकंड लेफ्टनंट बनला. त्याच वेळी त्याने एका शाळेतही नाव घातले. गणित, इतिहास व फ्रेंच हे विषय त्याला शिकायचे होते. यातूनच त्याला इतिहासाची सर्वाधिक गोडी लागली. १८०१ साली बर्लिन येथील यंग ऑफिसर्स इन्स्टिट्यूट या शिक्षणसंस्थेची चाचणी परीक्षा तो उत्तीर्ण झाला व फ्रेड्रिक द ग्रेटने स्थापन केलेल्या या संस्थेत दाखल झाला. तेथील दोन वर्षांच्या अभ्यासक्रमात त्याला विज्ञान, डावपेच व व्यूहरचना यांचे शिक्षण मिळाले. मात्र इतर विद्यार्थ्यांच्या तुलनेने आपण मागास आहोत, असे आढळून आल्यामुळे उद्विग्न होऊन लष्करालाच रामराम ठोकण्याचे विचार कार्लच्या मनात येऊ लागले होते. याच वेळी योगायोगाने या विद्यालयातील तोफखाना विभागाचे प्रमुख लेफ्टनंट कर्नल गेरहार्ड शॉर्नहॉर्स्ट यांचेशी त्याचा परिचय झाला. शॉर्नहॉर्स्टना हा मुलगा आवडला व त्यांनी त्याला माया नि प्रोत्साहन दिले. जर्मनीच्या लष्करी इतिहासात या योगायोगाला फार महत्त्व आहे.

शॉनहॉर्स्ट– क्लाउजवित्स यांचा काल हा प्रिन्स बिस्मार्कच्या आधीचा काल. त्या काळी जर्मनी एकसंघ राष्ट्र बनलेले नव्हते; तर अनेक छोट्या– मोठ्या राज्यांत हा देश विभागला होता. यापैकी हॅनोवर राज्यात १७५५ साली शॉर्नहॉर्स्टचा जन्म झाला. त्याचे वडील सैन्यात क्वार्टरमास्टरच्या हुद्यापर्यंत चढले. पण आपण उमराव कुळातले नाहीच, तर आपला जन्म अगदीच सामान्य कुळात झाला असल्याने आपणास वरचा मुद्दा मिळणे शक्य नाही, या जाणिवेने त्यानी लष्करी सेवा सोडली. त्यांच्या विवाहाचाही किस्सा असाच आहे. आपल्यापेक्षा सामाजिक दर्जाने बऱ्याच वरच्या श्रेणीत असलेल्या कुटुंबातील एका मुलीवर त्यांचे प्रेम होते. तीही त्याच्यावर अनुरक्त होती. तथापि, तिच्या वडिलांनी विवाहास परवानगी दिली नाही. पुढे त्याच्यापासून तिला मूल झाले तेव्हा तिच्या वडिलांचा नाइलाज़ झाला, व अधिकृत विवाह समारंभ साजरा झाला.

गेरहार्ट शॉर्नहॉर्स्टने हॅनोवरच्या सेनेत प्रवेश केला व तो ऑफीसर्स हॅन्डबुक अशासारखी तांत्रिक विषयावरील पुस्तके लिहू लागला. न्यू मिलिटरी जर्नल या नियतकालिकाचे संपादकत्वही त्याच्याकडे आले. १७९३ साली नेदर्लंडस्‌मधील युद्धात त्याने पराक्रम गाजविल्यामुळे

त्याला मेजरचा हुद्दा मिळाला व लौकरच क्वार्टर मास्टर जनरलपदी त्याची नेमणूक झाली. पण आपण उमराव कुळातले नसल्यामुळे आपली पदोन्नती येथेच थांबेल, या भीतीने त्याने प्रशियाच्या सेनेत प्रवेश केला. लेफ्ट. कर्नलचा हुद्दा त्याला देण्यात आला व त्याच वेळी बर्लिनमधील लष्करी विद्यालयात त्याची नेमणूक झाली. पुढच्याच वर्षी (१८०२) प्रशियाचा राजा फ्रीडरिश विल्हेल्म याने त्याला उमरावाचा दर्जा दिला.

शॉर्नहॉर्स्टला कार्ल क्लाउजवित्समध्ये विद्वत्तेची चमक आढळली असावी. त्याने त्याला प्रोत्साहन देऊन त्याचा न्यूनगंड घालविला. त्यासरशी कार्लने मैदानी तोफखाना, लष्करी इतिहास, गणित, इंजिनियरिंग व जनरल स्टाफ प्रशासन आदी विषयांत आघाडी मारली. तत्त्वज्ञानावरील भाषणे ऐकून विख्यात तत्त्वज्ञ कांट याचे प्रतिपादनही त्याने समजावून घेतले. तर्कशुद्ध विचारपद्धती व धारदार युक्तिवाद यांचा प्रत्यय क्लाउजवित्सच्या ग्रंथात येतो. याचे श्रेय त्याच्या तत्त्वज्ञानाच्या स्वाध्यायाला द्यायला हवे.

क्लाउजवित्सने हळूहळू दुपन, व्होल्टेरसारखे राजकीय तत्त्वज्ञही वाचून काढले. मॅकिअॅवेलीच्या 'प्रिन्स' या ग्रंथाचा त्याच्या मनावर खोल परिणाम झाला. मॅकिअॅवेली वाचण्याएवढे अन्य महत्त्वाचे दुसरे काहीही नाही, असे पुढे त्याने लिहिले. शॉनहॉर्स्ट त्याच्या व्यासंगावर खूष झाला. त्याने आपल्या शिष्याबद्दल अभिप्राय दिला: विषय व्यापक व गुंतागुंतीचा असला तरी कार्लच्या तो झपाट्याने ध्यानात येतो व त्याच्यावर शहाणपणाने तो मत देऊ शकतो! या अभिप्रायामुळे क्लाउजवित्सला वर्गात पहिल्या क्रमांकाचा मान मिळाला. या घटनेमुळे आत्मविश्वासाने मी वाटचाल करू लागलो, असे कार्लने पुढे म्हटले आहे.

शॉर्नहॉर्स्टच्या शिफारशीवरून लष्करी विद्यालयातून बाहेर पडताच कार्लची प्रशियाचा युवराज ऑगस्ट याचा 'एडी कॅम्प' म्हणून १८०३ साली नेमणूक झाली.

## युरोपीय युद्धपद्धती

येथे युरोपमधल्या तत्कालीन युद्ध पद्धतीविषयी थोडी माहिती द्यायला हवी. बंदूकधारी पायदळ, घोडदळ व तोफखाना ही लष्कराची प्रमुख अंगे असत. पायदळाचे कवायती कंपू बनविलेले असत व हे कंपू लढाई सुरू झाली की चौकोन करीत व तो किल्ल्यासारखा लढवीत. पुढची रांग गोळ्या संपल्या की खाली बसे नि पुन्हा बंदुकीत गोळ्या भरे. यावेळी मागे बसलेली रांग उभी राही व गोळीबार चालू ठेवी. चौकोनात अनेक सैनिक असत व पुढच्या रांगेतील सैनिक ठार झाला किंवा जबर जखमी होऊन कोसळला की, चौकोनातील सैनिक पुढे होऊन त्याची जागा घेई व चौकोन कायम ठेवी.

चौकोनाप्रमाणेच लांबच लांब रांगा करूनही लढाई केली जाई. तेथे चौकानासारखाच प्रकार असे. तोफखाना व घोडदळ शत्रूच्या पायदळावर मारा करून चौकोन व सरळ रांगा मोडून काढत पुढे घुसत. दोन्ही बाजू अशाच प्रकारे हालचाली व सैन्यरचना करीत

या पद्धतीत शिक्षण, शिस्त व पूर्वनियोजन यांना असाधारण महत्त्व असे. चौकोनात गोंधळ माजला तर साराच डाव उधळता जाण्याची भीती असे. यासाठी महिनोन महिने चालणाऱ्या ठराविक पद्धतीच्या संचलनातून सैन्यात कडक शिस्त निर्माण केली जाई. लढाईच्या संभाव्य जागी आधी सैन्य नेऊन व्यूहरचनेनुसार ते उभे करावे लागे. भारतात, तसेच चीन, इजिप्त, सुदान आदी देशात पाश्चात्त्य राष्ट्रांनी स्थानिक सेनादलांचा पराभव केला तो चौकोन करून अत्यंत शिस्तीत लढण्याच्या या पद्धतीमुळे. महादजी शिंद्यांनी वडगावची लढाई पाहिली तेव्हा तोफांचा मारा व घोडदळाचा हल्ला यामुळे चौकोनातील काही माणसे मेली, तरी इंग्रजांचा मानवी चौकोन फुटला नाही याचा त्याला विलक्षण अचंबा वाटला, व त्याने कवायती फौज तयार केली. वॉटर्लूच्या लढाईतही अरुंद लाल रेषा (Red thin line) कायम राहिली, असे वेलिंग्टनच्या सैन्याच्या बहादुरीसंबंधात म्हटले जाते. ही रेषा म्हणजे फळी, लाल गणवेशातील ब्रिटिश सैनिकांची होती. नेपोलियनच्या घोडदळाने पुन:पुन्हा हल्ले करूनही ती फुटली नाही व अखेर नेपोलियनचा पराभव झाला.

मात्र याचबरोबर युरोपात वारंवार होणाऱ्या लढायांत या पद्धतीतील उणीवा स्पष्ट होऊ लागल्या होत्या. रणांगणावर उशिरा पोहोचणाऱ्या सैन्याला नियोजित व्यूहरचना करणे अवघड होई व लढाईपूर्वीच आपण हरलो अशी सेनापतीची भावना होई. तसेच लढाई सुरू झाल्यावर व्यूह बदलणे जवळपास अशक्य ठरे. या पद्धतीत उपक्रमशीलतेला फारसा वाव नसे. त्यामुळे शत्रूच्या चुकीमुळे निर्माण झालेल्या संधीचा फायदा घेता येत नसे. पराभूत शत्रूचा झपाट्याने पाठलागही होत नसे. कारण आपल्या शिस्तबद्ध सैनिकांमधील परस्पर – संबंध तुटून गोंधळ माजेल, अशी भीती अधिकाऱ्यांना वाटे.

याचबरोबर त्या कालातील युद्धांचे उद्दिष्ट मर्यादित असल्यामुळे त्यांचा विस्तार मर्यादित असे. अठराव्या शतकातील सैन्यदलाचे स्वरूप असे होते की, युद्धाच्या विस्तारावर आपोआप मर्यादा पडत. दीर्घ मुदतीच्या कराराने रंगरूटांना सैन्यात भरती केली जाई व त्यांना शिकवून शिकवून विशिष्ट पद्धतीत तरबेज बनविण्यात येई. स्वाभाविकच सैन्यदल हे हत्यार फार महागडे असे. ते नष्ट झाले तर पुन्हा सहजासहजी त्याची जागा भरून काढता येत नसे. परिणामी राजे मंडळी मोठ्या प्रमाणावर सैन्य गमावण्यास तयार नसते. याचाच अर्थ साहसाकडे प्रवृत्ती नसे. अटीतटीचे व निर्णायक युद्ध करण्यात सेनापतींनाही रस नसे. कारण त्यांचा त्यात फारसा लाभ नसे व नोकरी गमावण्याचीच शक्यता अधिक असे. आपल्या व्यवसायाची संहिता ते पाळत. मात्र आपल्या राजाशी कायम निष्ठा बाळगण्याचे नैतिक बंधन त्यांच्यावर त्या कालात नव्हते. चालू युगातील निष्णात मॅनेजर वा वकील यांची उपमा त्यांना शोभेल. एका कंपनीतून ही मंडळी दुसऱ्या कंपनीत केव्हाही जातात, त्याचप्रमाणे हे लष्करी तज्ज्ञ वा वरिष्ठ अधिकारी नोकऱ्या बदलत. तत्कालीन युरोपमधील सर्वच सेनानी याच विचारप्रणालीचे वारस असल्यामुळे ते आपल्या मोहिमा कमीत कमी धोके पत्करून व

स्वत:ची फारशी गैरसोय होणार नाही, अशा रीतीने चालवीत. एक प्रकारे, सेनापतींची ट्रेड युनियनच बनली होती म्हणाना ! 'अखेरचा सैनिक जिवंत असेपर्यंत लढाई' ही कल्पना केवळ काव्यातच होती.

## फ्रेंचांनी केलेला बदल

फ्रेंच सेनेने आपली युद्धपद्धत सर्वप्रथम बदलली. मोठ्या तुकड्यांमध्ये मानवी फळी करून वा चौकोन करून लढण्याच्या शिक्षणाबरोबर छोट्या तुकड्या बनवून शत्रूशी चकमकी करण्याचे, असे दोन्ही प्रकारचे शिक्षण सैनिकांना देण्यात आले. या छोट्या पथकांचा चकमकींसाठी खूप फायदा होतो असे आढळून आल्यावर फ्रेंच राज्यक्रांतीनंतर बटॅलियन संख्येची चकमकी- पथके फ्रेंच सेनादलाने बनविली. यामुळे लढाईतील हालचाली लवचिक बनल्या. माघार घेणे, आगेकूच करणे व शत्रूचा पाठलाग करणे अधिक सोपे झाले. राज्यक्रांतीनंतर आणखी एक महत्त्वाचा बदल फ्रान्समध्ये झाला. सैन्यदल लोकसेना बनले व सैन्यसंख्या खूपच म्हणजे कल्पनेबाहेर वाढली.

जर्मन सैन्यातील वरिष्ठ अधिकाऱ्यांची परंपरागत पद्धतीवरच श्रद्धा होती. त्यांना बदलाची आवश्यकता वाटली नाही. शॉर्नहॉर्स्टला मात्र बदल होणे अगत्याचे वाटू लागले. चालू पद्धतीत त्याला अनेक उणीवा दिसू लागल्या. फ्रेंच चकमक- पथकांबद्दल त्याने लिहिले: सैनिकाचे चापल्य व त्याची हुशारी यांचा या पद्धतीत उपयोग होऊ शकतो. त्याचप्रमाणे भौगोलिक प्रदेशरचनेचे फायदेही उठविता येतात. या उलट, उघड्या मैदानात जर्मन, बोहेमियन व डच फौजा काही हालचाल न करता थंड उभ्या राहात.

शॉर्नहॉर्स्टने अशा लष्करी समस्यांच्या चर्चेसाठी मिलिटरी सोसायटी नामक संख्या स्थापन केली. हळूहळू मोठेमोठे अधिकारी तिचे सभासद बनले व दोन जर्मन युवराजांनीही संस्थेत नावे नोंदविली. क्लाउजवित्सही या संस्थेचा सभासद होता व तेथील चर्चा त्यांच्या विचारांना गती मिळण्यासाठी खूपच उपयुक्त ठरल्या.

फ्रेंचांनी छोटी चकमक – पथके आणली खरी. पण युद्धाच्या संकल्पनेतच क्रांती केली ती फ्रेंच राज्यक्रांतीने. तोपर्यंत युरोपीय सैन्यात केवळ धंदेवाईक सैनिक असत. ज्या राजाची नोकरी ते करीत त्याच्यासाठी ते लढत. या पलीकडे त्यांच्यात आंतरिक उमाळा नसे. तसेच, आपण कशासाठी लढत आहोत, लढाईचा उद्देश काय आहे, याची त्यांना थोडीशीही कल्पना नसे. हुकूम पाळणे एवढेच त्यांचे काम. फ्रेंच राज्यक्रांतीने देशभक्त सैनिक ही संकल्पना आणली. क्रांती हे आपले फार मोठे धन आहे, व क्रांती चिरडण्यासाठी युरोपीय राजे आपल्याविरुद्ध युद्ध करीत आहेत, याची जाणीव ठेवून फ्रेंच देशभक्तांची सेना लढू लागली. त्यांचे लष्करी शिक्षण जुन्या धंदेवाईक सैन्याएवढे चांगले नव्हते, मात्र त्यांची जिद्द नि त्यांचा आवेश शत्रूच्या दसपट होता. मानवी हक्क आपण आपल्या बागनेटांच्या





पात्यावरून अखिल युरोप खंडात पोहोचविणार आहोत, अशी बव्हंश फ्रेंच सेनेची धारणा होती. त्यांच्या या क्रांतिनिर्मित आवेशामुळेच त्यांनी प्रारंभी विलक्षण विजय मिळविले व त्यामुळे त्यांना नवे अवसान प्राप्त झाले. तत्त्वज्ञानामुळे भारलेला फ्रेंच सैनिक हा युरोपातील युद्धात एक संपूर्ण नवा व युद्धकल्पनेला कलाटणी देणारा घटक होऊन बसला.

## नेपोलियनचा उदय

फ्रेंच राज्यक्रांतीतूनच नेपोलियन बोनापार्ट उदयाला आला. अपूर्व कल्पनाशक्तीचे वरदान त्याला लाभले होते, व आपल्या कल्पना कोणतेही साहस पत्करून अंमलात आणण्याची हिंमत त्याचे ठायी होती. याच गुणावर त्याने इटलीत नेत्रोद्दीपक विजय संपादन केले, भूमध्य सागरातून इजिप्तवर स्वारी करून इजिप्त काबीज केला, ऑस्ट्रियन साम्राज्याच्या विराट सेनादलाला मारेंगोच्या लढाईत पाणी पाजले, पुन्हा रशिया व ऑस्ट्रियाच्या संयुक्त सेनेवर ऑस्टरलिझच्या लढाईत संपूर्ण विजय मिळविला.

तथापि, नेपोलियनच्या शत्रूंचा पूर्ण बीमोड झालेला नव्हता. इंग्लंड, रशिया व ऑस्ट्रिया पुन्हा नवी सैन्ये उभारून नेपोलियनशी टक्कर घेऊ पहात होती. प्रशियाचे सैन्य तर पूर्णपणे शाबूत होते. क्रांत्युत्तर फ्रेंच सेनेने प्रशियन सेनेचा पराभव केला होता, तरी त्याला बराच काल लोटला होता व तो पराभव प्रशियाचे पेकाट मोडू शकला नाही. त्याच्या सैन्याला फ्रान्समधून माघार घ्यावी लागली होती एवढेच. फ्रीडरिश विल्हेल्मपाशी दोन लक्ष उत्कृष्ट सैन्य होते. त्याचे शिक्षण, शस्त्रास्त्रे व हिंमत चांगली होती. त्यामुळे त्यानेच फ्रान्सला अंतिमोत्तर पाठवून फ्रेंच सेना ऱ्हाईनपलीकडे माघारी घेण्याची मागणी केली. १ ऑक्टोबर, १८०६.

नेपोलियनने यावेळी फारच वेगाने हालचाली केल्या. १४ ऑक्टोबर रोजी झालेल जेना व आवरस्टाट या दोन लढायांत प्रशियन सैन्याची धूळधाण उडाली. नेपोलियनने २० हजार कैदी घेतले व २०० तोफा काबीज केल्या. प्रशियन सेनेचे तीन विभाग पराभूत होऊन उधळले गेले. माघार घेणाऱ्या प्रशियन सेनेची शिस्त मोडली व पाठलाग करणाऱ्या फ्रेंच सेनेने त्यांची अक्षरशः लांडगेतोड केली. क्लाउजवित्स या युद्धात हजर होता. २७ ऑक्टोबर, १८०६ रोजी नेपोलियनने बर्लिनमध्ये प्रवेश केला.

या युद्धाआधी काही दिवस, आपल्या भावी पत्नीशी क्लाउजवित्सचा परिचय झाला युवराज ऑगस्ट याचा तो एडी कॅम्प असताना, एका मेजवानीच्या प्रसंगी काउंटेस मारी फॉन ब्रुहल हिच्याशी त्याची भेट झाली. ब्रुहल मंडळी मोठ्या कुळातली, तरीही कार्ल व मारी यांचे प्रेम परिचयामुळे वृद्धिंगतच होत गेले. १८०६ सालच्या युद्धावर कार्ल निघाला तेव्हा मारीने त्याला शुभचिन्ह म्हणून अंगठी दिली. त्यावर कार्ल खूष होताच. पण त्याचबरोबर युद्धाचेही त्याला आकर्षण असल्यामुळे युद्धावर जायचे म्हटल्यावर तो खूपच

उत्साहात होता.

प्रशियन सैन्य तीन सेना विभागात वाटले गेले होते. त्यापैकी ब्रन्सविकच्या ड्यूकच्या सेनेबरोबर प्रिन्स ऑगस्ट होता. क्लाउजवित्स त्याच्याच हाताखाली ग्रेनेडियर बटॅलियनमध्ये काम करी. राजाने ब्रन्सविकच्याच पथकाबरोबर रहाण्याचे ठरविले. त्याच्याबरोबर त्याचे तज्ज्ञही गेले. क्लाउजवित्सला यामुळे धक्का बसला. मारीला त्याने लिहिले: आमच्या सेनादलाबरोबर तीन फील्ड मार्शल व दोन क्वार्टरमास्टर जनरल आहेत. वस्तुत: एक फील्ड मार्शल व एक क्वार्टरमास्टर जनरल एवढे दोघे पुरे होते.

## विश्लेषणाची सवय

या तज्ज्ञांच्या गर्दीमुळे युद्धव्यूह निश्चित होईना. शॉर्नहॉर्स्ट ब्रन्सविकचा चीफ ऑफ स्टाफ होता. त्याच्याशी कार्लचे बोलणे होत असले पाहिजे. कार्लने मारीला लिहिले: शॉर्नहार्स्ट त्याच्या कामासाठी सर्वात लायक माणूस आहे. तथापि, तज्ज्ञांच्या अखंड मतभेदांमुळे त्याच्या बुद्धिमत्तेचा उपयोग होणार नाही. पुढे ७ ऑक्टोबर रोजी खुद्द शॉर्नहॉर्स्टने वैतागाने लिहिले: नेमके काय केले पाहिजे मला ठाऊक आहे. पण आम्ही काय करणार आहोत, ईश्वरालाच ठाऊक !

खुद्द क्लाउजवित्सने काही वर्षांनी जेनाच्या लढाईतील प्रशियन नेतृत्वावर जबर आसूड ओढले. तथापि, लढाईच्या कालात त्याचे विचार परिपक्व झालेले नव्हते. तो तरुण होता व युद्धाचा त्याचा अनुभव अल्प होता. मात्र आपला गुरु शॉर्नहॉर्स्ट याच्या शिकवणुकीमुळे परिस्थितीचे विश्लेषण करण्याची सवय त्याला लागली, ही महत्त्वाची गोष्ट.

क्लाउजवित्स मारीला रणांगणावरून सतत पत्रे धाडी. त्यात मुख्यत्वे युद्धचर्चाच असे मारीला त्या वयात या पत्रांचा काय अर्थबोध होत असेल कोणास ठाऊक; पण तिने ही पत्रे जपून ठेवली व अभ्यासकांना कार्लच्या मृत्यूनंतर त्याच्या विचारांचा मागोवा घेणे शक्य झाले.

ऑक्टोबरच्या दुसऱ्या आठवड्यात क्लाउजवित्सने लिहिले: रणांगणावर जास्तीत जास्त सैन्य हाताशी ठेवणे हे महत्त्वाचे तत्त्व असल्यामुळे नेपोलियनवर चालून जाताना कमाल सैन्य एकत्र ठेवावयास हवे. त्याचबरोबर शत्रुसैन्याचा मोठा भाग नष्ट करावयाचा आहे, हे लक्षात ठेवावयास हवे. शत्रूच्या किरकोळ पथकांची हानी करण्यात अर्थ नसतो. त्यामुळे शत्रूला स्वत:चे सैन्य एकत्रित करण्यासाठी वेळ मिळतो. यासाठी एकापेक्षा अधिक दिशांना सैन्य धाडण्याची कल्पना रद्द केली पाहिजे.

जेनाच्या लढाईनंतर क्लाउजवित्सने 'मिनर्व्हा' नावाच्या नियतकालिकास तीन पत्रे पाठविली. ती १८०७ साली प्रसिद्ध झाली. त्यात तो म्हणतो: प्रशियन सेनापती होहेनलोहे याचा धीर संपुष्टात आल्याने तो लढाई टाळू लागला. पण प्रत्यक्षात लढाईच त्याच्या मागे

हात धुऊन लागली. जनरल ब्लूशरने शौर्याचे उत्तम उदाहरण घालून दिले. अत्यंत कठीण समयी देशाचे धैर्य परत आणणारा सेनापती म्हणून मी त्याचे स्मरण ठेवीन. जर्मनांनो, भवितव्याबद्दल निराश न होता स्वत:चा सन्मान राखा, असा संदेशही त्याने या पत्रांच्या अखेरीस दिला.

प्रशियाने बर्लिन पडल्यावरही काही दिवस युद्ध चालू ठेवण्याचा प्रयत्न केला. पण रशियाने नेपोलियनशी तह केल्यावर प्रशियालाही तह करण्यावाचून मार्ग नव्हता. ९ जुलै, १८०७ च्या तहाने प्रशियाला मोठा प्रदेश गमवावा लागला व १ कोटी लोकवस्तीऐवजी ते ५० लक्ष वस्तीचे राज्य बनले.

राजे फ्रीडरिश विल्हेल्मचे वैशिष्ट्य म्हणजे तहानंतर अवघ्या सहाव्या दिवशी ५ सदस्यांचा लष्करी पुनर्रचना आयोग त्याने नेमला. शार्नहॉर्स्टला आयोगाचे अध्यक्षपद देण्यात आले. या आयोगाकडे अनेकांनी सुधारणा योजना पाठविल्या. प्रारंभी आलेल्या काही योजनांमध्ये युवराज ऑगस्ट व क्लाउजवित्स यांचीही योजना होती. ती बनविण्यात प्रमुख वाटा अर्थातच कार्लचा होता.

या योजनेच्या प्रस्तावनेत ऑगस्ट व कार्ल म्हणतात – प्रशियन हालचाली अत्यंत सुस्त होत्या, तसेच पायदळ, घोडदळ व तोफखाना यांच्यातील सुसूत्रता कमी दर्जाची होती. म्हणून या तिन्ही दलांच्या एकत्रित व कायम स्वरूपाच्या डिव्हिजन्स् बनविल्या पाहिजेत. (ही सूचना शार्नहॉर्स्टने पूर्वीच केली होती.) जलद हालचालीत अडथळे आणणारे सामान दयामाया न दाखविता मोडीत काढले पाहिजे व रणांगणावरील पुरवठापद्धत अधिक लवचिक केली पाहिजे. भारी पलटणी (लाइन ट्रुप्स) व हलक्या पलटणी (लाइट ट्रुप्स) यांच्यातील सहकार्य वाढले पाहिजे. ताज्या युद्धात अचूक व वेगवान नेमबाजी करणाऱ्या पथकांचा पूर्ण वापर झाला नाही, असा शेराही प्रस्तावनेत मारण्यात आला.

आपल्या योजनेत त्यांनी पुढे म्हटले होते : राष्ट्राचे रक्षण करणे प्रत्येक नागरिकाचे कर्तव्य आहे, या प्रमेयास तात्त्विक पातळीवर सार्वत्रिक मान्यता मिळाली असली, तरी बव्हंश देशांत याला विस्तृत प्रमाणात अपवाद असतात. काही विशिष्ट वर्ग व विशिष्ट व्यवसाय यांच्या खास हक्कांमुळे हे अपवाद घडतात. फ्रेंच राज्यक्रांतीने हे विशेषाधिकार धुऊन टाकले, त्यामुळे फ्रान्स व इटली या राष्ट्रांत सार्वत्रिक सैन्यभरती खऱ्या अर्थाने चालू आहे. या प्रमेयाचे रूपांतर कायद्यात झाले व प्रत्येक सैनिकाला वरिष्ठ हुद्यांपर्यंत जाण्याची परवानगी व संधी मिळाली, तर ते राष्ट्र बलिष्ठ लष्करी सत्ता बनेल हे नाकारण्यात अर्थ नाही. आणि हे तत्त्व (प्रत्येकास सर्वश्रेष्ठ हुद्यांपर्यंत संधी) मान्य झाल्याशिवाय सक्तीची सार्वत्रिक सैन्यभरती शक्य होईल काय, याची शंकाच आहे.

आपल्या पत्रात ऑगस्ट व कार्ल यांनी पुढे म्हटले होते की, सैन्यदलात अद्यापही सैनिकांना देहान्त शासन दिले जाते. पण सैनिकांच्या सन्मानाशी हे विसंगत ठरते. म्हणून

लष्करी शिस्तीत अधिक मानवता आणली पाहिजे.

क्लाउजवित्स जेनाच्या लढाईत नेपोलियनच्या विरुद्ध लढला. त्या आधी नेपोलियनने इटली, इजिप्तमध्ये मिळविलेले आश्चर्यजनक विजय व मारेंगो, ऑस्टरलित्झ आदी लढायातील त्याच्या सैन्याचा पराक्रम या घटना क्लाउजवित्सने ऐकल्या होत्या. नेपोलियनच्या या चतुरस्त्र विजयांचे विश्लेषण त्याच्या चिकित्सक मनात चालू असलेच पाहिजे. कवायती सैन्य ठेवणे ही अत्यंत खर्चिक बाब असूनही नेपोलियन एवढे सैन्य गमावू कसे शकतो, सतत नवनवे व प्रचंड सैन्य उभारू कसे शकतो, याचा विचार करीत असताना सक्तीच्या सार्वत्रिक लष्करभरतीचा मुद्दा त्याच्या मनात ठसला असावा. फ्रेंच राष्ट्राची सर्व मानवी व आर्थिक शक्ती नेपोलियनच्या हाती असल्यामुळे प्रचंड व सुसज्ज सैन्यदले तो ठेवू शके. याखेरीज नेपोलियनने युद्धतंत्रातही क्रांतिकारी बदल केले होते. तोफांची अभूतपूर्व सरबत्ती तो करी. कारण त्याचे उद्दिष्ट शत्रुसेनेवर वरताण करणे एवढे नसून, शत्रूचे सैन्य नेस्तनाबूद करणे हे असे.

क्लाउजवित्स बर्लिनमध्ये युवराज ऑगस्टचा एडीसी म्हणून अडकला होता. अखेर १८०८ च्या एप्रिलमध्ये दोघेही कोनिग्जबर्गला गेले. तेथे शॉर्नहॉर्स्टच्या आयोगाचे काम चालू होते. लगेच गुरुशिष्यांची भेट झाली. कार्लने मारीला लिहिले: शॉर्नहॉर्स्टला मी भेटलो. ते अतिशय अगत्याने वागले व जवळपास साडेतीन तास आम्ही बोलत होतो! कोनिग्जबर्गमध्ये कार्लचा बव्हंश वेळ आयोगामध्ये अध्यक्षांबरोबर काम करण्यातच जाई. येथे कार्लला आणखी एक लाभ झाला. त्याची ग्नायजनाउ या आणखी एका श्रेष्ठ सेनापतीशी ओळख झाली. हळूहळू परिचयाचे दाट मैत्रीत रूपांतर झाले. शार्नहॉर्स्ट १८१३ साली मरण पावला. त्यानंतर अखेरपर्यंत ग्नायजनाऊ हाच क्लाउजवित्सला पित्याच्या ठायी होता.

पुनर्रचना आयोगाने सुचविलेल्या सुधारणांना अनेक लष्करी अधिकारी व उमरावांचा विरोध होता. तथापि, नेपोलियनचा पराभव हे अंतिम उद्दिष्ट डोळ्यासमोर असल्यामुळे राजाला आयोगाच्या विरुद्ध भूमिका घेणे परवडणारे नव्हते. त्यामुळे राजाने आयोगाच्या शिफारसी पूर्णतया मान्य केल्या नाहीत, तरी दोन मुख्य सुधारणांबद्दल ३ ऑगस्ट, १८०८ रोजी फर्मान जाहीर केले.

त्यात म्हटले होते की, शांतताकाळात शिक्षण व ज्ञान यांच्या बळावर कोणत्याही वर्गातला मनुष्य सेनेत अधिकारी होऊ शकेल. युद्धकाळात अपवादात्मक शौर्य व परिस्थितीची अचूक समज या अधिकारी बनण्याच्या कसोट्या राहतील. हे गुण असणारी राष्ट्रातील कोणतीही व्यक्ती सैन्यातले सर्वोच्च पद मिळवू शकेल. सैन्यामध्ये आतापर्यंत सामाजिक उच्चनीचतेचे जे निकष होते ते इत:पर समाप्त झाले असून, सामाजिक पार्श्वभूमी कशीही असली तरी सर्वांना समान हक्क मिळतील व समान कर्तव्ये करावी लागतील.



अनुक्रमणिका

सामान्य सैनिकांना कडक शिक्षा व काही प्रकरणात फटक्यांची शिक्षा याला आयोगाचा तीव्र विरोध होता. राजाने आपल्या फर्मानाने शिक्षा खूपच सौम्य केल्या. पूर्वी फटक्यांची शिक्षा झालेल्या शिपायास मिठाच्या पाण्यात बुडविलेल्या चाबकांचे फटके खात, दोन्ही बाजूंनी उभ्या असलेल्या दोनशे सैनिकांच्या रांगेतून पळत जावे लागे. शिक्षा झालेल्याने जीभ चावू नये म्हणून त्याच्या तोंडात गोटी ठेवत. त्याचे हातही बांधत. सामान्य अपराधाबद्दलही ही शिक्षा दिली जाई. ताज्या फर्मानात ही शिक्षा रद्द करण्यात आली. फटक्यांची शिक्षा कायम राहिली; पण तीन गंभीर अपराधानंतर ती द्यावी असे नमूद करण्यात आले.

सार्वत्रिक लष्करी भरतीबाबत फर्मान काहीसे डळमळीत होते. फर्मानात म्हटले होते, भविष्यकाळात देशाच्या प्रत्येक नागरिकाला, त्याचा जन्म कोठल्या कुळात झाला हे लक्षात न घेता, लष्करात सेवा करावी लागेल.

सुधारणावाद्यांचा हा मोठाच विजय होता. तथापि परिस्थिती राजाच्या फर्मानाची अंमलबजावणी करू देण्यास तयार नव्हती. नेपोलियन ऑस्ट्रियाला नव्याने धडा शिकविणार असा रंग दिसू लागला. त्याचबरोबर त्याचे प्रशियावरही लक्ष होते. त्याने प्रशियाचे सैन्य ४२ हजारांपेक्षा अधिक असता कामा नये, असे बंधन घातले व फ्रान्सला प्रशियाने द्यावयाच्या भरपाईची रक्कमही मोठ्या प्रमाणात वाढविली.

ऑस्ट्रियाने आधीच्या काही वर्षांत आपल्या सैन्यदलात बऱ्याच सुधारणा केल्या असल्यामुळे नेपोलियनला आपण पराभूत करू शकू, अशी आशा त्याला वाटू लागली, व १८०९ सालच्या एप्रिल महिन्यात त्याने नेपोलियनविरुद्ध युद्ध पुकारले. नेपोलियनने झपाट्याने हालचाली करून १० मे रोजी ऑस्ट्रियाची राजधानी व्हिएन्ना हे शहर काबीज केले. मात्र, यामुळे युद्ध संपले नाही. ६ जुलै रोजी नेपोलियनने वॅग्रॅम येथे ऑस्ट्रियन सेनेचा जबरदस्त पराभव केला. ऑस्ट्रियाने अवघ्या आठवडाभरात शस्त्रसंधीची याचना केली.

या काळात शॉर्नहॉर्स्ट, ग्नायजनाऊ, ब्लूशर यांच्याप्रमाणेच क्लाउजवित्सही अत्यंत अस्वस्थ होता. स्पॅनिश राष्ट्राने नेपोलियनविरुद्ध स्वातंत्र्यासाठी जो खडतर, पण नेटाचा लढा चालविला होता, त्यामुळे साऱ्या युरोपबरोबर जर्मन जनतेलाही स्फूर्ती मिळाली होती. तथापि, राजे फ्रीडरीश यांच्या मनातील नेपोलियनची भीती गेली नव्हती व ते युद्धाला तयार नव्हते. मात्र, क्लाउजवित्सच्या बाबतीत महत्त्वाची नि आनंदाची घटना म्हणजे मारीशी त्याचा विवाह झाला (१७ डिसेंबर, १८१०).

१८११ सालच्या उत्तरार्धात नेपोलियनच्या मनात रशियावर स्वारी करण्याचे बेत चालू झाले. यासाठी वाटेतल्या प्रशियाशी त्याला मैत्रीचा तह हवा होता. प्रशियाच्या सीमेवर त्याने हळूहळू ३ लक्ष सुसज्ज फ्रेंच सैनिक आणून उभे केले व हे सैन्य प्रशियन सीमेत प्रवेशही करू लागले. यामुळे राजे फ्रीडरीश विल्हेल्म यांचा धीर सुटला व त्यांनी फ्रान्स– प्रशिया मैत्री करारावर स्वाक्षरी केली (१४ फेब्रुवारी, १८१२). या करारान्वये २० हजार प्रशियन सैनिक

फ्रेंच सेवेत द्यावयाचे व फ्रेंच सैन्याला विविध साहित्याचा पुरवठा करण्याचे ठरले. या करारामुळे क्लाउजवित्स भयंकर संतापला व त्याने जर्मनांच्या देशभक्तीला आवाहन करणारे जळजळीत लेख लिहिले. अर्थात या ज्वालाग्राही लेखांना प्रसिद्धी मिळाली नाहीच. ते प्रसिद्ध झाले १८६९ साली म्हणजे ५८ वर्षांनंतर व त्याच्या मृत्यूनंतर !

## रशियन लष्करात नोकरी

मात्र, क्लाउजवित्स केवळ लेखांवरच थांबला नाही. तो रशियन सेनेत दाखल झाला इतरही काही प्रशियन अधिकाऱ्यांनी हाच मार्ग स्वीकारला. क्लाउजवित्सचा एक चरित्रकार रॉजर पार्किन्सन लिहितो: गेल्या शतकातील इतिहासकारांनी अनेक प्रशियन अधिकारी रशियन सेनेत गेल्याचा दावा केला आहे. प्रत्यक्षात, दोन डझनांपेक्षा हा आकडा अधिक नसावा. मात्र, प्रशियन इतिहासात राजाविरुद्ध एवढे प्रभावी निदर्शन झालेले नव्हते! सेनापती ग्नायजनाऊ उद्गारला: सध्या जग दोन पक्षांमध्ये विभागले गेले आहे. एक नेपोलियनचा व दुसरा त्याच्याशी लढणारा. राज्यांच्या सीमा हा आजकाल विभाजक नाही, तर तत्त्वज्ञान हा विभाजक आहे!

क्लाउजवित्सने रशियन लष्करात नोकरी धरल्याने राजे विल्हेल्म संतापले व त्यांनी त्याला नोकरीतून काढून टाकले. झारने मात्र त्याची अधिक वेतनावर नेमणूक केली. त्याची नियुक्ती रशियन घोडदळाच्या नामांकित सेनापती जनरल काउंट पीटर पहलेन याच्या कार्यालयात अधिकारी मंडळाचा सर्वोच्च अधिकारी म्हणून झाली. रशियन भाषा येत नसल्यामुळे आपण अडचणीत येऊ असे क्लाउजवित्सला प्रारंभी वाटे. पण तो गंड टाकून देऊन त्याने तुफान काम करून रशियनांचा विश्वास थोड्याच अवधीत संपादन केला.

नेपोलियनने रशियाच्या सीमेनजीक ६ लक्ष ५० हजार सैनिक जमवून, २४ जून १८१२ रोजी आपली मोहीम सुरू केली. अवघ्या पाचव्या दिवशी त्याने विल्ना शहर घेतले. रशियन सेनेची सार्वत्रिक माघार सुरू झाली. दहा दिवसांनी सीमेवरचे रशियन सैन्य विटेबस्क या गावी येऊन पोहोचले. दिवस कडक उन्हाळ्याचे होते. लगाम खेचून खेचून क्लाउजवित्सच्या हाताला घट्टे पडले. मारीला तो लिहितो: दोन आठवड्यांत मी कपडे बदललेले नाहीत. विटेबस्कपाशी आमची नेपोलियनच्या सैन्याशी चकमक झडली. पण सरसेनापती जनरल बार्कलेने आणखी माघार घेण्याचा निर्णय घेतला. क्लाउजवित्सला माघारीची योजना पसंत होती. तो म्हणतो: रशियन सेनेचा नाश पुन्हा टळला.

१७ ऑगस्ट रोजी निप्पर नदीवरील स्मॉलेन्स्कनजीक नेपोलियन येऊन थडकला. तेथे सरसेनापती बार्कले व युवराज बॅग्रेशन या दोघांचेही सेनाविभाग एकत्र झाले होते. या सर्व सैन्याला आपण साफ करू अशी आशा नेपोलियनला होती. पण शहराच्या तटबंदीत अवघे २० हजार सैनिक ठेवून बाकीचे रशियन सैन्य तेथून निसटले. दुसऱ्या दिवशी घनघोर लढाई



अनुक्रमणिका

झाली. ९ हजार फ्रेंच तर १० हजार रशियन सैनिक ठार झाले. स्मॉलेन्स्क शहर नेपोलियनच्या हाती पडले ते जळत असलेल्या स्थितीत, आजूबाजूचा प्रदेश रशियनांनी उजाड करून टाकला होता.

रशियनांची माघार योजनेप्रमाणे चालली होती, असे नेपोलियनला त्या वेळी वाटले व नंतरही अनेकांची तशीच समजूत झाली. तथापि, काही वरिष्ठ रशियन अधिकाऱ्यांनी बार्कलेवर भित्रेपणाचा आरोप केला. त्याने लढाई द्यायला हवी होती असे त्यांचे मत पडले. अखेर झारवर प्रचंड दडपण आले, व बार्कलेच्या जागी जनरल कुटुझॉव याची नेमणूक त्याला करावी लागली. ६७ वर्षांचा कुटुझॉव एकाक्ष झाला तो युद्धात गोळी लागल्यामुळे; पोलंड व तुर्कस्थान विरोधी लढायांत तो सेनेचा लाडका सेनापती बनला होता. तथापि, झारला तो पसंत नव्हता. गंमत म्हणजे कुटुझॉवने माघारीबाबत बार्कलेचाच कित्ता गिरविण्याचे ठरविले. माघार घेऊन नेपोलियनला खोल पाण्यात घेण्यानेच अधिक यश पदरात पडू शकेल, असे त्याचेही मत होते. पण, बार्कलेवर भित्रेपणाचा आरोप आला, तशी आपलीही अवस्था होऊ नये, असे कुटुझॉवला स्वाभाविकच वाटले व मॉस्कोच्या अलीकडे त्याने एक लढाई देण्याचे ठरविले.

मात्र, अनुकूल रणक्षेत्र सापडेपर्यंत माघार चालू ठेवणे आवश्यक होते. तसा हुकूमही त्याने दिला. दिवस कडक उन्हाळ्याचे होते. ज्या प्रदेशातून सैन्य चालले होते तेथे धुळीचे साम्राज्य होते. पाणथळ जागा भरपूर होत्या. पण पाणी मचुळ होते. क्लाउजवित्सने मारीला लिहिले: "या मोहिमेतील अडचणी विलक्षण आहेत. गेले नऊ आठवडे आम्ही चालत आहोत. उकाडा, धूळ, गलिच्छ पाणी आणि जवळपास उपास. आतापर्यंतच्या बव्हंश रात्री मी उघड्यावर काढल्या. कारण या भागात वस्ती कमी आणि त्यांच्या चंद्रमौळी झोपड्या नष्ट करण्यात आल्या आहेत. सांध्यांना सूज येणे चालूच आहे. दाढदुखी तर सतत चालू असते. विल्नानंतर माझे तीन दात पोकळ झाले आहेत. केसही गळू लागले आहेत. गेला पंधरवडा हातमोजे नसल्यामुळे हात पिवळ्या कातड्यासारखे दिसतात."

नेपोलियनचे सैनिक पाठलाग करीत होते. पिछाडीवरील रशियन पथकांच्या त्यांच्याशी सतत चकमकी चालू होत्या. क्लाउजवित्सची बदली आता काउंट उवॉरॉवच्या घोडदळ विभागाचा क्वार्टर मास्टर जनरल म्हणून झाली होती. मुख्य सैन्यातच या घोडदळाचा समावेश होता. अखेर कुटुझॉवने रणक्षेत्र निवडले. नजीकच बोरोदिनो नावाचे खेडे होते.

सात सप्टेंबरला सकाळी बोरोदिनोची घनचक्कर लढाई सुरू झाली नि त्याच दिवशी संपली. रशियन सैन्य होते १ लक्ष २८ हजार, तर फ्रेंच सैन्य १ लक्ष ३० हजार. फ्रेंचांकडे ५८७ तोफा, तर रशियनांकडे थोड्या अधिक म्हणजे ६४० होत्या. सकाळी ६ वाजताच फ्रेंच तोफांनी अशी काही सरबत्ती सुरू केली की धरणी हादरते आहे असे वाटावे. रशियन सेनेच्या उजव्या बगलेवर उवॉरॉवचे घोडदळ होते नि क्लाउजवित्स त्याच्या अधिकारीवर्गात

होता.

प्रारंभी फ्रेंच सैन्य बोरोदिनो खेड्यावर चालून गेले. पण थोड्याच वेळात खरी लढाई जुंपली ती रशियन सेनेच्या डाव्या बगलेवर. या बगलेवर रशियन आघाडी गुंडाळण्याचा नेपोलियनचा विचार होता. रशियन सैन्य येथे भीमाच्या पराक्रमाने लढले. त्यांच्या तळपत्या संगिनींनी अनेक फ्रेंच जवानांचे कोथळे बाहेर काढले. रशियन तोफांनीही फ्रेंचाच्या आघाडीत बरीच भगदाडे पाडली. पण सर्व हानी सोसून फ्रेंचांनी आपली फळी टिकवली व हळूहळू आपला तोफखाना तेथे आणावयास प्रारंभ केला. १५०, ३०० आणि अखेर ४०० तोफा जमा झाल्या आणि त्यांनी गोलंदाजी सुरू केली. या तुफान मारगिरीचे जबरदस्त परिणाम क्लाउजवित्सला पाहावयास मिळाले. डावी रशियन फळी फ्रेंचांनी मोडून काढली.

नेपोलियनने नंतर मध्य फळीकडे मोर्चा वळविला. तोफांचा तुफान मारा झाल्यावर फ्रेंच घोडदळ रशियन आघाडीवर तुटून पडले. ज. बार्कलेची पदावनती झाल्यामुळे तो अपमानित झाला होता. मरण्याच्या उद्देशानेच तो या कचाकचीत पुढे घुसला. पण वाचला. सेनापती बॅग्रेशन ठार झाला.

उजव्या फळीवरील उवॉरॉवच्या सैन्यावर फ्रेंच तोफखान्याचा मारा झाला तरी प्रत्यक्ष हल्ला झाला नव्हता. त्या बाजूच्या फ्रेंच फळीची चाचपणी करण्यासाठी प्रथम २ हजार कोसॅक पाठविण्यात आले. त्यांनी तेथील कोलोट्सचा नदी ओलांडली तेव्हा तेथील फ्रेंच सेनेला फारसे संरक्षण (तोफखाना व राखीव सैन्य) नसल्याचे त्यांना आढळून आले. त्याचा फायदा उठविण्यासाठी उवॉरॉवचे घोडदळ धाडण्याचे ठरले. क्लाउजवित्सला हल्ल्याच्या यशस्वितेबद्दल शंका होती. उवॉरॉवच्या घोडदळाविरुद्ध फ्रेंचांचे केवळ घोडदळच आले तर ठीक होते. पण पायदळ व घोडदळ दोन्ही असेल तर यश येणार नाही, अशी त्याची धारणा होती. " We know well what happens when a single arm is opposed by two others." अर्थात उवॉरॉवच्या इतर अधिकाऱ्यांबरोबर क्लाउजवित्सलाही हल्ल्यासाठी जावे लागले. त्याची शंका खरी ठरली. रशियन घोडदळ पुढे येताच फ्रेंच घोडदळ मागे फिरले, पण तेथे असलेल्या एका इटालियन पायदळ बॅटॅलियनने चौकोन तयार केले व ते लढाईस सिद्ध झाले. तोफांचा मारा करून मग घोडदळ पाठवा, असे क्लाउजवित्स सांगत होता. पण या खटाटोपात फ्रेंच सैन्य निसटून जाईल अशी भीती उवॉरॉवला वाटली व त्याने हल्ला केला. इटालियन पायदळाने तो परतविला. असे तीन हल्ले परतविल्यावर रशियन तोफांनी मारा केला व इटालियन पायदळाला पिटाळून लावले.

तथापि या वेळेपर्यंत बोरोदिनोतील सर्व फ्रेंच सैन्य सावध झाले होते. त्यांनी खेड्याच्या भोवतालच्या टेकड्यांवर विखरून मोर्चे धरले व उवॉरॉवच्या घोडदळाची बिनीची पथके कापून काढली. रशियनांची अडचण म्हणजे राखीव सैन्य शिल्लक नव्हते. मात्र दोन हजार कोसॅक सैनिकांनी आरोळ्या ठोकत फ्रेंच सेनेवर हल्ला केला. त्यांचा त्वेष पाहून उवॉरॉवचे

झाली. ९ हजार फ्रेंच तर १० हजार रशियन सैनिक ठार झाले. स्मॉलेन्स्क शहर नेपोलियनच्या हाती पडले ते जळत असलेल्या स्थितीत, आजूबाजूचा प्रदेश रशियनांनी उजाड करून टाकला होता.

रशियनांची माघार योजनेप्रमाणे चालली होती, असे नेपोलियनला त्या वेळी वाटले व नंतरही अनेकांची तशीच समजूत झाली. तथापि, काही वरिष्ठ रशियन अधिकाऱ्यांनी बार्कलेवर भित्रेपणाचा आरोप केला. त्याने लढाई द्यायला हवी होती असे त्यांचे मत पडले. अखेर झारवर प्रचंड दडपण आले, व बार्कलेच्या जागी जनरल कुटुझॉव याची नेमणूक त्याला करावी लागली. ६७ वर्षांचा कुटुझॉव एकाक्ष झाला तो युद्धात गोळी लागल्यामुळे; पोलंड व तुर्कस्थान विरोधी लढायांत तो सेनेचा लाडका सेनापती बनला होता. तथापि, झारला तो पसंत नव्हता. गंमत म्हणजे कुटुझॉवने माघारीबाबत बार्कलेचाच कित्ता गिरविण्याचे ठरविले. माघार घेऊन नेपोलियनला खोल पाण्यात घेण्यानेच अधिक यश पदरात पडू शकेल, असे त्याचेही मत होते. पण, बार्कलेवर भित्रेपणाचा आरोप आला, तशी आपलीही अवस्था होऊ नये, असे कुटुझॉवला स्वाभाविकच वाटले व मॉस्कोच्यां अलीकडे त्याने एक लढाई देण्याचे ठरविले.

मात्र, अनुकूल रणक्षेत्र सापडेपर्यंत माघार चालू ठेवणे आवश्यक होते. तसा हुकूमही त्याने दिला. दिवस कडक उन्हाळ्याचे होते. ज्या प्रदेशातून सैन्य चालले होते तेथे धुळीचे साम्राज्य होते. पाणथळ जागा भरपूर होत्या. पण पाणी मचुळ होते. क्लाउजवित्सने मारीला लिहिले: "या मोहिमेतील अडचणी विलक्षण आहेत. गेले नऊ आठवडे आम्ही चालत आहोत. उकाडा, धूळ, गलिच्छ पाणी आणि जवळपास उपास. आतापर्यंतच्या बव्हंश रात्री मी उघड्यावर काढल्या. कारण या भागात वस्ती कमी आणि त्यांच्या चंद्रमौळी झोपड्या नष्ट करण्यात आल्या आहेत. सांध्यांना सूज येणे चालूच आहे. दाढदुखी तर सतत चालू असते. विल्नानंतर माझे तीन दात पोकळ झाले आहेत. केसही गळू लागले आहेत. गेला पंधरवडा हातमोजे नसल्यामुळे हात पिवळ्या कातड्यासारखे दिसतात."

नेपोलियनचे सैनिक पाठलाग करीत होते. पिछाडीवरील रशियन पथकांच्या त्यांच्याशी सतत चकमकी चालू होत्या. क्लाउजवित्सची बदली आता काउंट उवॉरॉवच्या घोडदळ विभागाचा क्वार्टर मास्टर जनरल म्हणून झाली होती. मुख्य सैन्यातच या घोडदळाचा समावेश होता. अखेर कुटुझॉवने रणक्षेत्र निवडले. नजीकच बोरोदिनो नावाचे खेडे होते.

सात सप्टेंबरला सकाळी बोरोदिनोची घनचक्कर लढाई सुरू झाली नि त्याच दिवशी संपली. रशियन सैन्य होते १ लक्ष २८ हजार, तर फ्रेंच सैन्य १ लक्ष ३० हजार. फ्रेंचांकडे ५८७ तोफा, तर रशियनांकडे थोड्या अधिक म्हणजे ६४० होत्या. सकाळी ६ वाजताच फ्रेंच तोफांनी अशी काही सरबत्ती सुरू केली की धरणी हादरते आहे असे वाटावे. रशियन सेनेच्या उजव्या बगलेवर उवॉरॉवचे घोडदळ होते नि क्लाउजवित्स त्याच्या अधिकारीवर्गात

होता.

प्रारंभी फ्रेंच सैन्य बोरोदिनो खेड्यावर चालून गेले. पण थोड्याच वेळात खरी लढाई जुंपली ती रशियन सेनेच्या डाव्या बगलेवर. या बगलेवर रशियन आघाडी गुंडाळण्याचा नेपोलियनचा विचार होता. रशियन सैन्य येथे भीमाच्या पराक्रमाने लढले. त्यांच्या तळपत्या संगिनींनी अनेक फ्रेंच जवानांचे कोथळे बाहेर काढले. रशियन तोफांनीही फ्रेंचाच्या आघाडीत बरीच भगदाडे पाडली. पण सर्व हानी सोसून फ्रेंचांनी आपली फळी टिकवली व हळूहळू आपला तोफखाना तेथे आणावयास प्रारंभ केला. १५०, ३०० आणि अखेर ४०० तोफा जमा झाल्या आणि त्यांनी गोलंदाजी सुरू केली. या तुफान मारगिरीचे जबरदस्त परिणाम क्लाउजवित्सला पाहावयास मिळाले. डावी रशियन फळी फ्रेंचांनी मोडून काढली.

नेपोलियनने नंतर मध्य फळीकडे मोर्चा वळविला. तोफांचा तुफान मारा झाल्यावर फ्रेंच घोडदळ रशियन आघाडीवर तुटून पडले. ज. बार्कलेची पदावनती झाल्यामुळे तो अपमानित झाला होता. मरण्याच्या उद्देशानेच तो या कचाकचीत पुढे घुसला. पण वाचला. सेनापती बॅग्रेशन ठार झाला.

उजव्या फळीवरील उवॉरॉवच्या सैन्यावर फ्रेंच तोफखान्याचा मारा झाला तरी प्रत्यक्ष हल्ला झाला नव्हता. त्या बाजूच्या फ्रेंच फळीची चाचपणी करण्यासाठी प्रथम २ हजार कोसॅक पाठविण्यात आले. त्यांनी तेथील कोलोट्सचा नदी ओलांडली तेव्हा तेथील फ्रेंच सेनेला फारसे संरक्षण (तोफखाना व राखीव सैन्य) नसल्याचे त्यांना आढळून आले. त्याचा फायदा उठविण्यासाठी उवॉरॉवचे घोडदळ धाडण्याचे ठरले. क्लाउजवित्सला हल्ल्याच्या यशस्वितेबद्दल शंका होती. उवॉरॉवच्या घोडदळाविरुद्ध फ्रेंचांचे केवळ घोडदळच आले तर ठीक होते. पण पायदळ व घोडदळ दोन्ही असेल तर यश येणार नाही, अशी त्याची धारणा होती. " We know well what happens when a single arm is opposed by two others." अर्थात उवॉरॉवच्या इतर अधिकाऱ्यांबरोबर क्लाउजवित्सलाही हल्ल्यासाठी जावे लागले. त्याची शंका खरी ठरली. रशियन घोडदळ पुढे येताच फ्रेंच घोडदळ मागे फिरले, पण तेथे असलेल्या एका इटालियन पायदळ बॅटॅलियनने चौकोन तयार केले व ते लढाईस सिद्ध झाले. तोफांचा मारा करून मग घोडदळ पाठवा, असे क्लाउजवित्स सांगत होता. पण या खटाटोपात फ्रेंच सैन्य निसटून जाईल अशी भीती उवॉरॉवला वाटली व त्याने हल्ला केला. इटालियन पायदळाने तो परतविला. असे तीन हल्ले परतविल्यावर रशियन तोफांनी मारा केला व इटालियन पायदळाला पिटाळून लावले.

तथापि या वेळेपर्यंत बोरोदिनोतील सर्व फ्रेंच सैन्य सावध झाले होते. त्यांनी खेड्याच्या भोवतालच्या टेकड्यांवर विखरून मोर्चे धरले व उवॉरॉवच्या घोडदळाची बिनीची पथके कापून काढली. रशियनांची अडचण म्हणजे राखीव सैन्य शिल्लक नव्हते. मात्र दोन हजार कोसॅक सैनिकांनी आरोळ्या ठोकत फ्रेंच सेनेवर हल्ला केला. त्यांचा त्वेष पाहून उवॉरॉवचे

काही सैनिक स्वयंस्फूर्तीने त्यांना जाऊन मिळाले. पण थोड्याच वेळात रक्तात रंगलेले घोडे व कोसॅक घोडेस्वार परतू लागले. रशियन सेनेने आपल्या पूर्वीच्या जागी माघार घेतली.

सायंकाळी हलका पाऊस पडला व लढाई थांबली. 'माझ्या सर्व लढायांमधील सर्वांत भीषण लढाई' असे बोरोदिनाच्या लढाईचे वर्णन खुद्द नेपोलियननेच केले. रशियाने ५८ हजार तर फ्रेंचांनी ५०हजार सैनिक गमावले. नेपोलियनचे ४३ जनरल ठार वा जखमी झाले. तांत्रिकदृष्ट्या फ्रेंचांचा विजय झाला असला, तरी कोणी दुसऱ्याचे अभिनंदन करण्याच्या मन:स्थितीत नव्हता. खुद्द नेपोलियनही हादरला होता. एवढी मोठी लढाई होऊनही अवघे आठशे रशियन सैनिक पाडाव झाले होते.

रशियन सैनेपैकी ६,७ व ८ सेनाविभाग (कोअर्स) साफ नष्ट झाले होते. चार हजार गार्डस्‌पैकी अवघे ३०० जिवंत राहिले. तर शिखान्स्क रेजिमेंटच्या १३०० सैनिकांपैकी ३ अधिकारी नि ९६ सैनिक जिवंत राहिले. मात्र आपण पराभूत झालो, अशी भावना रशियन सैनिकांत नव्हती.

कुटुझॉवने एकंदर परिस्थितीचा विचार करून मॉस्कोकडे चलण्याचा आदेश दिला मॉस्को होते अवघे १५ मैलांवर व तरीही जखमी सैनिकांना रणांगणावरच सोडून देण्यात आले. थंडी व भूक यामुळे हालहाल होऊन यातले बहुतेक जण मृत्युमुखी पडले. क्लाउजवित्स उवॉरॉवबरोबर पिछाडीला होता. आठ सप्टेंबरच्या दुपारी नेपोलियनने पाठलागाचा आदेश ज. मुरातला दिला. पण जोमाने पाठलाग झाला नाही. क्लाउजवित्स म्हणतो: कमालीच्या थकावटीचा हा परिणाम होता.

१३ सप्टेंबर रोजी रशियन सैन्य मॉस्कोनजीक पोहोचले. आपण आणखी एक लढाई देणार, असे दाखविण्याच्या दृष्टीने कुटुझॉवने व्यूहरचना केली. त्याच दिवशी दुपारी त्याने सर्व ज्येष्ठ सेनापतींची बैठक बोलावून विचारविनिमय केला. बहुतेकांनी लढाईचा सल्ला दिला. पण कुटुझॉव म्हणाला, मॉस्कोमधून माघार घेण्यास तुम्ही घाबरत आहात. पण मला माघार दूरदर्शीपणाची वाटते. नेपोलियन म्हणजे पिसाट लाट आहे. ती अद्याप आपण थोपवू शकलो नाही. मॉस्को शहर स्पंजाप्रमाणे त्याला शोषून घेण्याचे काम करील !

तत्काळ मॉस्कोतून माघारीस प्रारंभ झाला. शहरवासीय आधीच पळू लागल्याने रस्त्यांवर बेफाम गर्दी झाली होती. त्यातच सैन्याची भर पडली. लष्कराला वाट करून देण्यासाठी घोडदळाच्या दोन डिव्हिजन्सची योजना करावी लागली. क्लाउजवित्स घोड्यावरून मॉस्कोत हिंडत होता. अनेक उत्तमोत्तम व कलापूर्ण लाकडी प्रासाद त्याला दिसले.

मॉस्कोहून सैन्य कोठे जाणार? सरळ रस्त्याने पूर्वेला व्लादिमिरकडे दक्षिणेस वळून रायझानकडे! कुटुझॉवने दक्षिणेकडे वळण्याचा निर्णय घेतला. हा निर्णय सोपा नव्हता. अनेकांनी यावर आधी चर्वितचर्वण केले होते. तथापि, सेनापतीला कोणता तरी निर्णय घ्यावाच लागतो.

सप्टेंबरच्या १४ तारखेसच एक फ्रेंच टेहळणी पथक मॉस्को रस्त्यालगतच्या टेकडीवर धाडण्यात आले. नेपोलियनला निराळीच स्वप्ने पडत होती. झार अलेक्झँडर आपण मॉस्कोत पाऊल ठेवण्यापूर्वीच तहाचा बावटा दाखवील, अशी त्याला आशा होती. तसा संदेश तर आला नाहीच, उलट मॉस्कोत गुप्तपणे प्रवेश केलेल्या फ्रेंच अधिकाऱ्यांनी भलतीच बातमी आणली. मॉस्कोतील सर्व नागरिक पळून गेले आहेत. मॉस्को रिकामे झाले आहे, ही ती बातमी!

नेपोलियनने बातमीवर विश्वास ठेवला नाही. पण त्याच रात्री त्याने मॉस्कोत प्रवेश केला. सर्वत्र भयाण शांतता. मॉस्कोतील थोडीफार फ्रेंच वस्ती व जुगारी, दारुडे नि गुंड यांच्याखेरीज शहरात कोणीच दिसेना. मात्र काही इमारती पेटू लागल्या. नेपोलियनने १५ तारखेच्या सकाळी क्रेमलिन प्रासादात प्रवेश केला. यावेळी आगी आटोक्यात येतील, अशी आशा त्याला होती. तथापि आगी वाढतच चालल्या. लाकडी इमारती एकापाठोपाठ एक आगीच्या भक्ष्यस्थानी पडू लागल्या. आगी आणखी वाढत गेल्यां नि बव्हंश शहर भस्मसात करून १८ सप्टेंबरला त्या थांबल्या. मात्र त्याआधीच नेपोलियन मॉस्कोबाहेरच्या प्रासादात रहावयास गेला होता.

नेपोलियनची स्थिती अत्यंत अडचणीची झाली आहे हे क्लाउजवित्सच्या लक्षात आले. त्याने लिहिले: आगीमुळे फ्रेंचांच्या गरजेच्या अनेक गोष्टी नष्ट झाल्या. मात्र नेपोलियनच्या अडचणीचे ते महत्त्वाचे कारण नव्हते. त्याच्यापाशी ९० हजार सैनिक शिल्लक होते व तेही अत्यंत थकलेले होते. अनेकांचे घोडे खलास झाले होते, वा निकामी बनले होते. नेपोलियनचा भाला रशियात खोल घुसला असला तरी त्याच्या उजव्या बगलेवर १ लक्ष १० हजार शत्रुसैन्य सिद्ध होते व सभोवती सशस्त्र प्रजा असल्यामुळे आघाडी सर्वच दिशांवर पसरली होती. यातच शस्त्रे व दारूगोळ्याची टंचाई आणि भर म्हणून उद्ध्वस्त झालेले दळणवळणाचे मार्ग. अशा स्थितीत फ्रेंच सैन्याला हिवाळा काढावयाचा होता.

विशेष म्हणजे रशियन सैन्यही निराश बनले होते. माघारीचा व लढाई न करण्याच्या कुटुझॉवच्या निर्णयाचा हा परिणाम होता. काही सेनापतींनी राजिनामे दिले व अनेकजण शांततेच्या तहाची भाषा बोलू लागले होते. सध्याच्या परिस्थितीतून आशेला काही जागा नाही, असे ज. बार्कलेने क्लाउजवित्सला सांगितले. क्लाउजवित्सचे मत मात्र वेगळे होते. रशियन सेनेने कालुगाकडे माघार घेतली असल्यामुळे नेपोलियन स्वत:कडे मॉस्को ठेवू शकणार नाही. रशियाला नमविणे त्याला अशक्य आहे. तसा विचारही चुकीचा ठरेल, असे तो म्हणतो.

दरम्यान, लिथुआनियात असलेल्या व विटगेन्स्टाइनच्या छावणीत क्लाउजवित्सला धाडण्यात आले. तेथे तो १५ नोव्हेंबर रोजी पोहोचला. तोपर्यंत विटगेन्स्टाइनच्या फ्रेंच सैन्याशी काही चकमकी झडल्या होत्या. या भागात ज. चिचागॉव हा दुसरा एक अधिकारी



अनुक्रमणिका

होता. नेपोलियनशी लढाई देण्याची विटगेन्स्टाइन व चिचागॉव दोघांचीही इच्छा होती. तथापि, सरसेनापती कुटुझॉवला हे मत मान्य नव्हते. आपण केवळ नेपोलियनच्या पाठीवर राहिलो तरी पुरे, असे त्याचे ठाम मत होते. पण त्याची लढाईची टाळाटाळ झारला असह्य झाली व त्याने नेपोलियनचे सैन्य स्वदेशाच्या वाटेवर बेरेझिना नदीवर येईल, तेव्हा तेथे त्याची कत्तल करून टाकावी, असा आदेश दिला. क्लाउजवित्स या योजनेने आनंदित झाला. त्याने लिहिले: निरगाठीसाठी सर्व धागे एकत्र येत आहेत.

**भीषण माघार**

१९ ऑक्टोबर रोजी फ्रेंच सेनेने मॉस्को नगरीतून माघार घेण्यास प्रारंभ केला. रशियावर मोहीम सुरू झाल्याला १२० दिवस व मॉस्कोत पोहोचल्याला ३९ दिवस झाले होते. ५०० मैल माघार घ्यावयाची होती. पण फ्रेंच सैनिक आनंदात होते. त्यांच्या पाठीवरील पिशव्यांत उंची मद्याच्या बाटल्या, चांदीची भांडी, मूर्ती, दागिने, उंची कपडे व जवाहीर होते. ही सारी मॉस्कोतील लूट होती. परतताना ते गाणी म्हणत होते. एक लक्ष सैनिकांनिशी नेपोलियनचा हा परतीचा प्रवास सुरू झाला. थोड्याच दिवसांत परिस्थिती बदलली. थंडीमुळे घोडे मरू लागले. विशिष्ट ठाण्यांमध्ये भरपूर अन्न व अन्य सामुग्री मिळेल अशी कल्पना होती. पण साठे खूपच अपुरे होते. थंडीमुळे अनेकांना थकवा येई. चालणे अशक्य होई. त्यांच्यावर कोसॅक गनीम झडप घालीत व त्यांना ठार मारत. थकवा व भूक वाढत चालली. सैनिक मेलेले घोडे कापून खाऊ लागले.

या अवस्थेत बेरेझिनाच्या अलिकडेच असलेले बॉटिसॉव ठाणे चिचागॉवच्या सैन्याने काबीज केले व फ्रेंच सेनेची वाट अडविली. पण अडचणीत असला तरी नेपोलियनशी त्यांची गाठ होती. चिचागॉवच्या मदतीला ज. पहलेन आला. पण फ्रेंच सैन्याने बॉटिसॉव जिंकून घेतले. त्या गावावर रशियनांचे लक्ष केंद्रित करावयाचे असा नेपालियनचा व्यूह होता. तो यशस्वी झाला. त्या लढाईसाठी रशियन सैन्य जमा झाले असताना नेपोलियनने बेरेझिना नदीवर दोन पूल टाकून घेतले. या कालात विटगेन्स्टाइन बॉटिसॉव भागात आलाच नाही. त्याने पाच दिवस वाया घालविले व तो आला तेव्हा फ्रेंच सेनेने नदी ओलांडण्यास प्रारंभ केला होता.

पूल उभारलेल्या स्टुडिआनका गावानजीक, नेपोलियन २६ नोव्हेंबर रोजी सकाळी येऊन पोहोचला व त्याने नदी ओलांडण्यास प्रारंभ करण्याचा हुकूम दिला. प्रथम लढाईत समर्थ असलेल्या सैनिकांनी जावे. नंतर वेळ असल्यास नि:शस्त्र सैनिक, आजारी, जखमी, नंतर स्त्रिया व मुलांनी नंबर लावावा असेही त्याने ठरवून दिले होते. २६ व २७ या दोन दिवसांत बरेच फ्रेंच सैनिक शिस्तीने पुलावरून गेले. २७ ला सायंकाळी विटगेन्स्टाइन व कोसॅक पथकांचे हल्ले सुरू झाल्यावर मात्र फ्रेंच लष्करात गोंधळ माजला. रशियन तोफखाना

व कोसॅकांचे तरवारींचे वार यामुळे अनेक सैनिक ठार झाले. इतरांनी पुलावर गर्दी केली. त्या चेंगराचेंगरीत अनेक गुदमरून मरण पावले; तर अनेक पाण्यात पडून वाहून गेले. बर्फतुल्य थंडीमुळे गारठून बरेच प्राणाला मुकले. २८ तारखेला मोठा पूल मोडला व छोटा पूल २–३ माणसेच एका वेळी जाऊ शकतील एवढा अरुंद असल्यामुळे तेथे अभूतपूर्व गोंधळ माजला. याच वेळी रशियन सैनिक व कोसॅक पुलाशी भिडले. कोसॅकांनी पुरुष, स्त्रिया सर्वांची सर्व चीजवस्तू लुबाडून त्यांना नग्न करून बर्फात फेकून दिले. क्लाउजवित्स घोड्यावरून या भागात फिरला. त्याने मारीला लिहिले: काय भयप्रद दृश्ये मी येथे पाहिली! माझ्या भावना निबर नसत्या तर मी वेडाच झालो असतो. तरीही ही दृश्ये अनेक वर्षे माझ्या शरीरावर काटा उभा करतील!

६० हजार माणसे नदी ओलांडण्यात यशस्वी झाली. यातच दोन बगलांवर असणाऱ्या २० हजार व्यक्तींची भर पडली. यामध्येच काही जखमी व आजारी मंडळींचा समावेश होता. या ८० हजारांपैकी निम्मी माणसे बेरेझिना व विल्ना यांच्या दरम्यान मरण पावली. रशियन तरवारीपेक्षा कितीतरी पट बळी भयंकर हवा व भूक यांनी घेतले. भुकेने एवढी वाईट अवस्था झाली की मृत घोडे व गुरेच नव्हे, तर कुत्री, मांजरे व काही माणसांची प्रेतेही उरलेल्यांनी खाल्ली!

रशियन सेनेलाही थंडी व अन्नाचा अभाव यांचा कमी त्रास झाला नाही. क्लाउजवित्सने लिहिले: आमचे सैन्य सरळ आगेकूच करीत असल्यामुळे आम्हाला आमच्या बगलांवरून अन्न आणणे शक्य होत नव्हते. जेथून आमची बिनीची पथके गेली त्या रस्त्यावर अनेक रशियन मरून पडल्याचे मी पाहिले. ते जखमांमुळे नव्हे तर श्रम नि थंडीमुळे कोसळले होते. विटगेन्स्टाइनने ४० हजार सैनिकांनिशी आगेकूच केली. गेल्या चार आठवड्यानंतर विल्ना येथे ३० हजार सैनिकच पोहोचले!

ज. कुटुझॉवची अवस्था वेगळी नव्हती. त्याचे सैन्य तर रशियाचे मुख्य सैन्य. पण कालुगापासून विल्ना येथे येईपर्यंत त्याच्याकडे एकतृतीयांश सैन्यही उरले नाही. विल्ना येथे तपमान उणे ४० अंश होते.

अखेर १४ डिसेंबरला फ्रेंच सैन्य (ग्रँड आर्मी ) फ्रेंच सीमेत परतले. काउंट लुई फिलिप सेगूर म्हणतो: अनेक लढाया मारलेले ६ लक्ष विजयी फ्रेंच सैन्य शेकडो तोफा, गाडे, शस्त्रास्त्रे, ध्वज नि इतर विविध सामुग्रीनिशी रशियन भूमीत घुसले आणि त्या शुभ्र बर्फाच्छादित भूमीवरून परतले ते एक हजार पायदळ, ९ तोफा नि माना खाली घातलेली, बर्फामुळे दाढ्या ताठ झालेली, चेहऱ्यावर प्रेतकळा असलेली २० हजार माणसे. हीच ती फ्रान्सची ग्रँड आर्मी!

नेपोलियनच्या या मोहिमेचे काहीसे विस्तृत वर्णन करण्याचे कारण म्हणजे, या मोहिमेचा क्लाउजवित्सच्या विचारांवर सर्वाधिक परिणाम झाला.



अनुक्रमणिका

बेरेझिना नदी फ्रेंच सैन्याने ओलांडल्यावर आता आपली गरज पॅरिसमध्ये आहे, असे ठरवून नेपोलियन ३ डिसेंबर रोजी पॅरिसकडे येण्यास निघाला व १८- १९ डिसेंबरच्या मध्यरात्री तुलरिज प्रासादात हजर झाला. प्रशिया आता फ्रान्सविरुद्ध उठाव करील, अशी भीती त्याला वाटू लागली. रशियाच्या हिवाळ्याने ग्रँड आर्मी गिळून टाकल्यानंतरही, अवघ्या चार महिन्यांत आपण पुन्हा (सहा लक्ष ६०हजार) सैन्य उभारू, अशी उमेद त्याला वाटत होती.

इकडे जर्मन जनता नेपोलियनची सत्ता कायमची नष्ट करण्यास उत्सुक झाली होती तथापि, जर्मनीचे सैन्य खरोखरच तुटपुंजे होते. राजे फ्रीडरिश विल्हेल्म रशियाशी मैत्रीचा करार झाल्याखेरीज युद्धाची भाषा करण्यास तयार नव्हते. अखेर १३ मार्च, १८१३ रोजी रुसो- प्रशियन मैत्री करार घोषित झाला. क्लाउजवित्सला यामुळे अत्यंत आनंद झाला. फ्रान्सशी जर्मनीने लढावे, यासाठी ६ वर्षे तो आपल्या परीने प्रयत्न करीत होता. त्याच्या आनंदाचे आणखीही एक कारण होते. मारीला तो भेटू शकणार होता. करार घोषित झाल्यावर त्वरेने तो बर्लिनला गेला. मारीशी त्याची भेट झाली. पण दहा महिन्यानंतरच्या या भेटीत त्याच्या प्रकृतीकडे पाहून मारी हादरून गेली. रशियातील युद्ध व विशेषत: तेथील हिवाळा यांनी जबर किंमत वसूल केली होती. तो हाडकुळा झाला होता, त्याचे केस विरळ व मधूनमधून पांढरे झाले होते. बर्फामुळे झालेल्या गळवांच्या अनेक काळ्या खुणा चेहऱ्यावर कायम होत्या. पूर्वीपेक्षा तो अधिक अबोल, अंतर्मुख व हळवाही बनला होता. प्रशियन सैन्यात पुन्हा प्रवेश मिळावा म्हणून केलेल्या अर्जानुसार त्याची पुन्हा नेमणूक झाली, तरी राजे विल्हेल्म त्याच्यावर फारसे खूष असल्याचे वाटले नाही.

रूसो- प्रशियन करार घोषित झाल्यावर त्यांच्या चढाईची वाट न पाहता स्वत:च प्रशियावर चालून जाण्याचे नेपोलियनने ठरविले. युद्ध स्वदेशात होऊ देण्यापेक्षा परदेशात लढणे केव्हाही फायद्याचे असते. युद्धामुळे होणाऱ्या विध्वंसाची झळ आपल्या प्रदेशाला पोहोचत नाही. नेपोलियनचे कर्तृत्व असे की, रशियातील भीषण पराभवानंतर त्याने पुन्हा २ लक्ष २६ हजार सैनिक व ४५७ तोफा चढाईसाठी सिद्ध केल्या. घोडदळाबाबत मात्र फ्रेंच सैन्य उणे होते. १५ हजार स्वार त्याने उभे केले तरी प्रत्यक्ष युद्धासाठी त्यातील निम्मेच लायक होते. दोन प्रकारची कारणे होती. एकतर फ्रान्समध्ये पुरेसे जातिवंत घोडे शिल्लक नव्हते व तरुण घोडेस्वारांचे शिक्षण पूर्ण करण्याएवढा वेळ मिळाला नाही.

### नेपोलियनची नवी मोहीम

प्रशियाने सक्तीची सैन्यभरती केल्यामुळे त्याला २ लक्ष ८० हजार सैनिक उभे करता आले, तरी सैन्याचे पुरेसे शिक्षण झालेले नव्हते व शस्त्रास्त्रेही पुरेशी नव्हती. मात्र सैनिक युद्धासाठी फुरफुरत होते, आणि सेनापती ब्लूशर सेनेचे नेतृत्व करणार होता. प्रशियन सैन्य



अनुक्रमणिका

व जनता दोघांचाही त्याच्यावर विलक्षण विश्वास होता. रशियाने या युद्धासाठी १ लक्ष १० हजार सैन्य आणले होते. त्यापैकी ३० हजार घोडेस्वारांत अनेक कोसॅक पथके होती. रूसो-प्रशियन सैन्याचे घोडदळ अधिक होते, तर नेपोलियनचे पायदळ दोघांच्या एकत्रिक संख्येपेक्षा अधिक होते.

नेपोलियन आपल्या सैन्याचा प्रमुख भाग घेऊन १ मे रोजी (१८१३) निघाला व ग्रॉस गॉरशेनच्या लढाईत दोस्त सैन्याचा जबरदस्त पराभव करून त्याने दोन दिवसांनी लायपझिग शहरात प्रवेश केला. ग्रॉस ग्रॉरशेनच्या लढाईत क्लाउजवित्स लढला. त्याने या लढाईचे जे वर्णन केले आहे त्यावरून तिची भीषणता लक्षात येते. १ मे रोजी फ्रेंच सेनेने एल्स्टर नदीच्या डाव्या काठावरील ग्रॉस गॉरशेन, क्लाइव गॉरशेन, रहना व कात्र ही खेडी काबीज केली. तेथेच फ्रेंच फळी फोडून फ्रेंचांची लायपझिगवरील संकल्पित चाल विफल करावी, या उद्देशाने प्रशियन पायदळ २ मे रोजी या खेड्यांवर चालून गेले. सकाळपासून कचाकच सुरू झाली, पण फ्रेंचांना हटविण्यात प्रशियन सेनेला यश येईना. दुपारनंतर प्रथम प्रशियन घोडदळ आले, त्या पाठोपाठ रशियन पायदळ व घोडदळाने एकत्रित हल्ला चढविला. पण ग्रॉस गॉरशेन फ्रेंचांनी सोडले नाही. सायंकाळी नेपोलियनने ८० तोफा या भागात आणल्या व तुफान गोलंदाजी केली. पाठोपाठ फ्रेंच घोडदळाने हल्ला करून रूसो- प्रशियन सैन्य उधळून लावले. अंधार पडल्यामुळे व फ्रेंच घोडस्वार नवोदित असल्यामुळे त्या सैन्याचा पाठलाग होऊ शकला नाही. या लढाईत दोन्ही बाजूचे मिळून प्रत्येक १५ हजार सैनिक ठार, जायबंदी (निकामी) वा पाडाव झाले.

क्लाउजवित्सला युद्धाचे रौद्ररूप अनुभवण्यास मिळाले. त्याचे छोटे घोडदळ पथक फ्रेंच पायदळाच्या कोंडीत सापडले. ह्या पथकाने जिवाच्या आकांताने माणसे कापत कापत शत्रुसैन्यातून वाट काढली. क्लाउजवित्सच्या उजव्या कानामागे जखम होऊन भळाभळा रक्त वाहू लागले. त्याने मारीला लिहिले: कचाकचीत सहभागी होऊन अधिकाऱ्याने तलवार गाजवणे ही अन्य केव्हाही विशेष शौर्याची घटना मानली गेली असती. पण गॉरशेनमध्ये प्रत्येक अधिकाऱ्यालाच तलवार चालवावी लागली.

रूसो- प्रशियन सेनेला एल्ब नदीची संरक्षण रेषा सोडून माघार घ्यावी लागली. ६ मे रोजी नेपोलियनने ड्रेसडेन शहरात प्रवेश केला. तेथून नजीकच्या असलेल्या बाउरझेन येथे ६४ हजार रशियन व ३२ हजार प्रशियन सैन्य जमले होते. येथेही २० व २१ मे असे दोन दिवस घनघोर लढाई झाली. या लढाईत दोस्तांचे ११ हजार तर फ्रेंचांचे २२ हजार सैनिक कामास आले. तथापि, फ्रेंच सैन्य आपल्याला कोंडीत पकडेल, या भीतीने रूसो-प्रशियन सैन्य आणखी माघार घेऊ लागले. १ जूनला फ्रेंच सेनेने हॅम्बर्ग व ब्रेसलाउ या शहरांत विजयी प्रवेश केला. ५ दिवसांनी झार अलेक्झँडरने शस्त्रसंधी मान्य केला. रशियातील अभूतपूर्व सैनिक हानीनंतरही नेपोलियनने अल्पावधीत भव्य विजय संपादन



अनुक्रमणिका

केला होता.

मात्र त्याचा हा विजय अत्यंत अल्पायुषी ठरला. युरोपातील सर्व राष्ट्रांना नेपोलियनने दुखविले होते. ती सर्व त्याच्याविरुद्ध उठाव करण्याच्या तयारीतच होती. यापैकी ऑस्ट्रिया हे मोठे राष्ट्र. रशियाशी झालेल्या शस्त्रसंधीनंतर ऑस्ट्रिया तटस्थ राहील, अशी नेपोलियनची आशा होती. पण ती विफल ठरली. रशिया व ऑस्ट्रिया यांनी गुप्त वाटाघाटी करून नेपोलियनशी नव्याने युद्ध करण्याचे ठरविले. शस्त्रसंधीनंतर अवघ्या दोन महिन्यांनी रशियाने शस्त्रसंधी धुडकावून लावला, व १० ऑगस्ट रोजी फ्रान्सविरुद्ध युद्ध पुकारले. दोन दिवसांनी ऑस्ट्रियाही युद्धात आला. स्वीडनचे युवराज काउंट बर्नादोत हेही आपल्या सैन्यासह दोस्तांना येऊन मिळाले. यामुळे दोस्तांकडे एकूण ७ लक्ष ७६ हजार, तर नेपोलियनपाशी ५ लक्ष ६८ हजार सैनिक जमा झाले.

दोस्त सैन्य तीन दलांमध्ये (ऑस्ट्रिया, रूसो- प्रशियन व युवराज बर्नादोतचे स्वीडिश) विभागले गेले होते. याचा फायदा घेऊन नेपोलियन तिन्ही सेनांना अलग अलग गाठून सर्वांना पराभूत करील, अशी भीती होतीच. म्हणून जरूर तर माघार घेऊन तिन्ही दलांची परस्परांना मदत होईल, अशा रीतीने सर्वांनी हालचाली करण्याची युद्धयोजना आखली गेली. प्रथम नेपोलियन प्रशियन सेनेवर (जनरल ब्लूशर) घसरला,(१७ ऑगस्ट) तेव्हा ब्लूशरने नेपोलियनला काही हुलकावण्या दिल्या व काल्झबाख नदीला पूर आला असता त्याने फ्रेंच सैन्यावर हल्ला करून त्याची प्रचंड हानी केली.

या कालावधीत ऑस्ट्रियन सैन्य ड्रेसडेनपर्यंत आले व त्याने फ्रेंच पुरवठातळावर हल्ला चढविला (२६ ऑगस्ट). तथापि, खुद्द नेपोलियन तेथे येऊन पोहोचला. ७० हजार फ्रेंच सैन्याने १।। लक्ष ऑस्ट्रियन सेनेस मागे हटविले. तथापि, दोनच दिवसांनी (२८ ऑगस्ट) रशियन सेनेने कुल्मनजीक फ्रेंच सेनापती वेंदाम याचा जबरदस्त पराभव करून १३ हजार फ्रेंच सैनिक पाडाव केले.

कुल्मनजीक लढाई चालू असतानाच बर्नादोतच्या सैन्याने ग्रॉस बॉरेननजीक फ्रेंच सैन्याला मार दिला. नेपोलियनने या आघाडीवर मार्शलने याला पाठविले. पण त्याचीही डाळ शिजली नाही. तो पराभूत झाला (६ सप्टेंबर).

या सर्व पराभवानंतरही नेपोलियनचा बर्लिनवर चालून जाण्याचा निश्चय कायम होता. तेवढ्यात बर्नादोतच्या सैन्याने ८० हजार सैन्यानिशी एल्ब नदी ओलांडल्याची बातमी आली. नेपोलियनच्या सेनेची लढाया व आजार यामुळे खूपच हानी झाली होती. त्याने एल्बच्या पूर्वेकडील सर्व प्रदेश सोडण्याचा आदेश आपल्या सेनेला दिला.

क्लाउजवित्सच्या दृष्टीने नेपोलियनच्या पहिल्या रूसो- प्रशियन मोहिमेच्या कालात एक दु:खद घटना घडली. जन. शॉर्नहॉर्स्ट याला युद्धात गोळी लागून तो जखमी झाला होता. त्याचे २८ जून रोजी निधन झाले.



अनुक्रमणिका

पहिल्या व दुसऱ्या दोन्ही मोहिमांत क्लाउजवित्सने केलेल्या कामगिरीबद्दल त्याला कर्नलचा हुद्दा देण्यात आला.

दोस्त सैन्याने आता चढाईचा पवित्रा घेऊन नेपोलियनला सर्वत्र फ्रेंच सीमेत ढकलण्याचा निर्धार केला. प्रिन्स बर्नादोत वॉर्टेनबर्गसमोर येऊन उभा ठाकला. याच वेळी ब्लूशरने लांब मजला मारल्या व तो बर्नादोतला जाऊन मिळाला. दोघांचे मिळून १ लक्ष ४० हजार सैन्य उभे राहिले, तर दक्षिणेतून श्वार्झेनबर्ग १ लक्ष ८० हजार ऑस्ट्रियन सेनेनिशी लायपझिगच्या दिशेने येऊ लागला. या दोन सेनादलांचे संख्याबल नेपोलियनपेक्षा खूपच अधिक होते. नेपोलियनची कोंडी करण्याची संधी आली होती.

## पराभव : एल्बा बेटात रवानगी

पण, नेपोलियन एवढ्या सहजासहजी कात्रीत सापडणारा सेनापती नव्हता. ज्याला अंतर्गत मार्ग म्हणतात, त्याचा फायदा त्याला मिळणार होता. त्याचे सैन्य नजीकच्या मार्गांनी हालचाली करू शकत असल्यामुळे तो एका शत्रूचा नाश करून दुसऱ्यावर चालून जाऊ शकला असता. ब्लूशर व बर्नादोत यांचा समाचार प्रथम घेण्याचे त्याने ठरविले, व लायपझिगच्या पूर्वेस बुर्झेननजीक दीड लक्ष फ्रेंच सैन्य खडे ठाकले. ही घटना ८ऑक्टोबरची. तेथून नेपोलियनने दुबेनवर धाव घेतली, ब्लूशरला तेथे अडकावून ठेवण्याचा त्याचा डाव होता. पण ब्लूशर आधीच तेथून निसटून बर्नादोतला जाऊन मिळाला होता. त्यावर आणखी खोलवर न जाता श्वार्झेनबर्गला पुढे येऊ देण्याचे त्याने ठरविले. ज. मुरातच्या पथकांशी त्याचे तोंड लागले की, त्याच्यावर अनपेक्षितरीत्या कोसळण्याचा नेपोलियनचा डाव होता. पण १३ ऑक्टोबर रोजी ब्लूशरने श्वार्झेनबर्गला थांबविले. तिन्ही दोस्त दले आता नजीक आली आहेत. सबब शत्रूचे सैन्य जेथे एकत्र झाले असेल, तेथे आपण सर्वजण एकाच वेळी चालून जाऊ, असे ब्लूशरने त्याला कळविले.

जंगी लढाई होणार हे स्पष्ट झाले होते. १६ ऑक्टोबर रोजी ब्लूशरने लायपझिंगच्या वायव्येस हल्ला चढविला. त्याच्यापाशी ५४ हजार सैनिक होते. त्यांनी अनेक खेडी काबीज केली. त्याचवेळी पश्चिम व दक्षिणेकडून दोस्तांच्या चार सेनादलांनी आगेकूच केली. ब्लूशर व इतर दोस्त सेनापतींनी लायपझिगभोवतालची अनेक खेडी जिंकली व शहराच्या सीमेपर्यंत ते आले.

यावर नेपोलियनने गुल्डेन गॉसावर घोडदळाचा जबर हल्ला चढवून दोस्त फळी मध्यावरच फोडण्याचा डाव रचला. फळी फुटली की, दोस्त पथकांवर फ्रेंच पायदळ हल्ला करणार होते. यानुसार ज. मुरातने १० ते १२ हजार घोडदळ व जोडीला काही पायदळ तुकड्या घेऊन हल्ला चढविला. त्याला यश आले, व फ्रेंच घोडदळ गुल्डेन गॉसाच्या दक्षिणेस पोहोचले. तेवढ्यात उत्तरेकडे तोफांचा गडगडाट ऐकू आला. मॉकर्नवर ब्लूशरने

हल्ला चढविला होता. तो त्या दिवशी हल्ला चढवील ही अपेक्षा नसल्यामुळे स्वत: नेपोलियन फ्रेंच सैन्याला धीर देण्यासाठी तिकडे गेला आणि मुरातच्या हल्ल्याकडे दुर्लक्ष्य होऊन तो लटका पडला. फ्रेंच पायदळ मंद गतीने पुढे गेले. मुरातच्या घोडदळावर तोफगोळ्यांची तुफान वृष्टी झाली. सायंकाळी फिरून पूर्वस्थळांपर्यंत फ्रेंचांना हटावे लागले.

१७ ऑक्टोबर शांततेत गेला. १८ तारखेस सकाळी ९ च्या सुमारास दोस्त तोफांची गोलंदाजी सुरू झाली. फ्रेंच सैन्याला मागे लोटण्यात आले. दुपारी बेनिगसेन व बर्नादोत यांची पथके रणांगणावर येऊन पोहोचली. त्यांना तत्काळ लढाईत लोटण्यात आले. रात्र पडली तेव्हा नेपोलियनने माघारीचा आदेश दिला. मृत, जखमी व पाडाव मिळून नेपोलियनने ७ हजार सैनिक गमावले. दोस्तांनाही ५४ हजार सैनिक गमवावे लागले. उरलेले फ्रेंच सैन्य २० ऑक्टोबर रोजी साह नदी ओलांडून माघारी जाऊ लागले.

क्लाउजवित्सच्या मते सैन्याधिक्याच्या परिणामाचे हे उत्कृष्ट उदाहरण होते. नेपोलियनचा प्रथमच थेट युद्धात निर्णायक पराभव झाला होता. नेपोलियन त्वरेने फ्रान्सला परतला व ९ नोव्हेंबर रोजी (१८१३) पॅरिसला पोहोचला.

फ्रेंच सैन्याची माघार सुरू होताच दोस्त सैन्यानेही जोरदार पाठलाग केला असता, तर नेपोलियनची खूपच पंचाईत झाली असती. पण, विजय दिसू लागताच दोस्तांच्या परस्परांविषयीच्या अविश्वासाने डोके वर काढले. रशिया संपूर्ण पोलंड घशात घालेल या भीतीने ऑस्ट्रियाने नेपोलियनशी शांतता तह करण्याचा प्रयत्न सुरू केला. या घोळात दीड महिना गेला व नेपोलियनला फ्रेंच सेनेची पुनर्घटना करण्यास वेळ मिळाला. अखेर, १८१४ सालच्या पहिल्या दिवशी दोस्त सैन्याने मध्य ऱ्हाइनवरून फ्रान्सकडे झेप घेतली.

ब्लूशरचे रूसो– प्रशियन सैन्य व श्वार्झेनबर्गचे ऑस्ट्रियन सैन्य यांच्यात अनेक मैलांचे अंतर होते. त्याचा फायदा घेऊन नेपोलियनने प्रथम ब्लूशरवर व पाठोपाठ श्वार्झेनबर्गवर हल्ले चढविले. पण त्याला यश आले नाही व मागे हटावे लागले. मात्र, या कालात बर्नादोत अगदी मंद वेगाने फ्रान्सकडे येत होता.

नेपोलियनला यश येत नाही असे दिसताच, दोस्तांच्या युद्धमंडळाने ब्लूशर व श्वार्झेनबर्गने दोन दिशांनी पॅरिसवर चाल करावी, असा निर्णय घेतला. दोन्ही सेनापतींचे लक्ष्य पॅरिस हेच होते. तथापि, दोन्ही सेनापतींचे परस्परांशी पटत नसे. श्वार्झेनबर्गच्या युद्धकौशल्यावर ब्लूशरचा विश्वास नव्हता, तर श्वाझेनबर्ग ब्लूशरला जंगली व गरम डोक्याचा प्राणी म्हणे.

या मतभेदांचा स्वाभाविक परिणाम त्यांच्या चढायांवर झाला. त्यातच त्यांचे पुरवठा मार्ग लांबले होते, तर नेपोलियनचे आखूड झाल्याने त्याच्या हालचाली सुलभ व वेगाने होऊ लागल्या. त्याने फेब्रुवारी महिन्याच्या मध्यास ब्लूशरवर हल्ला केला व त्याचे मोठे नुकसान केले. मात्र, तो ब्लूशरला नष्ट करू शकला नाही. श्वार्झेनबर्गवरही त्याने हल्ला चढविला. मात्र



अनुक्रमणिका

सैन्याच्या टंचाईमुळे त्याला यश आले नाही. दरम्यान, बर्नादोतचे सैन्य बेल्जियममधून उत्तर फ्रान्समध्ये आले. ब्लूशर त्याला जाऊन मिळाला. या संयुक्त सैन्याला हुसकणे नेपोलियनला सैन्याभावी शक्य झाले नाही.

अखेर, ब्लूशर व श्वार्झेनबर्ग दोघेही पॅरिसनजीक पोहोचले. ३० मार्च रोजी त्यांच्या फ्रेंच सेनेशी लढाया झाल्या. फ्रेंच सैन्य पराभूत झाल्याने पॅरिसने शरणागती पत्करली. नेपोलियन त्यावेळी पॅरिसमध्ये नव्हता. त्याचे लढाई पुढे चालू ठेवण्याचे प्रयत्न चालू होते. पण त्यात अर्थ नव्हता. अखेर, दोस्त राष्ट्रांचा कैदी बनून त्याला एका ब्रिटिश युद्धनौकेतून एल्बा बेटाचा रस्ता धरावा लागला (२८ एप्रिल १८१४).

१८१२ ची रशियन मोहीम, १३ सालच्या उत्तरार्धातील मध्य युरोपातील मोहीम मिळून नेपोलियनने दहा लक्ष सैनिक अवघ्या १५ महिन्यांत गमावले. तरीही १८१४ सालच्या फ्रान्समधील युद्धात त्याने आपले जुने लष्करी कौशल्य प्रकर्षाने प्रगट केले, असा तज्ज्ञांचा अभिप्राय आहे. त्याची व्यूहरचना, डावपेच अव्वल दर्जाचे होते. पण कसलेले फ्रेंच सैन्य आधीच्या मोहिमांत नष्ट झाले होते व एकूणच सैन्य तुटपुंजे होते, त्यामुळे त्याला पराभवाचा धनी व्हावे लागले. १८१३ व १४ साली चमकलेला दुसरा सेनानी म्हणजे प्रशियाचा जनरल ब्लूशर. चढाई हाच त्याचा मंत्र असे. यावरूनच त्याला जनरल 'आगे बढो' असे टोपण नामाभिधान प्राप्त झाले.

नेपोलियनला दोस्त राष्ट्रांनी दिलेली शिक्षा सौम्य असल्याने ती पुढेमागे युरोपला घातक ठरेल, असे क्लाउजवित्सचे मत होते. तसे तो अनेक वरिष्ठांशी बोलूनही दाखवी. दोन वर्षे त्याने सतत रणभूमीवर काढल्यामुळे शरीराने तो दुबळा झाला होता. सांधेसुजीने त्याला हैराण केले होते. प्रशियन सैन्यात आपल्याला बढत्या मिळणार नाहीत, असे त्याच्या मनाने घेतल्यामुळे तो दु:खी असे. मन:स्वास्थ्यासाठी तो अफू घेई. हे त्या कालात सार्वत्रिक व्यसन होते. त्याने प्रदीर्घ रजा घेतली. मारीच्या सहवासात त्याची प्रकृती तर सुधारलीच, पण मनानेही तो खूपच सावरला.

## पुनश्च हरि: ओम

नेपोलियनने प्रचंड फ्रेंच सैन्याचा स्वत:च्या हाताने विध्वंस केला, त्याला दारुण पराभवाचा काळिमा लागला; त्याला स्वत:ला देशोधडीला जावे लागले, यामुळे युरोपवरील त्याचे संकट समाप्त झाले, अशा खुषीत दोस्तराष्ट्रे होती. परस्परांविरुद्ध त्यांची कारस्थाने सुरू झाली. या पार्श्वभूमीवर एक दिवस बातमी येऊन थडकली. नेपोलियन एल्बा बेटातून निसटला व दक्षिण फ्रान्समध्ये उतरला, अशी ती वार्ता होती.

नेपोलियन फ्रान्समध्ये उतरला तो दिवस होता. १ मार्च १८१५, अवघ्या दहा महिन्यांपूर्वी त्याला फ्रान्समधून हद्दपार करण्यात आले होते.

त्याच्यापाशी ना सत्ता होती ना सैन्य. पण आश्चर्य म्हणजे नि:शस्त्र सैनिक शेकड्यांनी त्याच्या भोवती गोळा होऊ लागले. पायदळातले जवान आपआपले जुने गणवेश घालून आले, तर घोडदळाचे स्वार घोडे नसल्यामुळे खोगीर खांद्यावर टाकून त्याला सामील झाले. नेपोलियन पॅरिसच्या रोखाने मार्गक्रमण करू लागला, तेव्हा हळूहळू फ्रान्सच्या सर्व भागातून पायदळ, तोफखाना व घोडदळाचे सैनिक प्रचंड संख्येने येऊन त्याला मिळू लागले. २० मार्च रोजी तो पॅरिसला पोहोचला. लढाई करावी न लागता राज्य त्याच्या हाती आले व सैनिकांची संख्या वाढू लागली. मे महिन्याच्या अखेरीस नेपोलियनपाशी २ लक्ष ८४ हजार सैन्य जमले. यावर खुद्द नेपोलियनचेच आधिपत्य होते. काही सैनिक ऱ्हाइन, लॉयर, आल्प्स व पिरिनीज भागातील दलांमध्ये विभागले होते.

नेपोलियन फ्रान्समध्ये उतरल्याची व त्याच्याभोवती सैनिक गोळा होत असल्याची वार्ता मिळाल्यापासून दोस्त राष्ट्रे अवस्थ झाली. मात्र त्याचबरोबर त्याला साफ नेस्तनाबूत करण्याचा त्यांचा निर्धारही भक्कम होऊ लागला. व्हिएन्नामध्ये बैठक घेऊन आपापली सेनादले सुसज्ज करण्याची खटपट त्यांनी चालू केली. ९३ हजार अँग्लो – डच सैनिक असलेले दल बेल्जियममध्ये ड्यूक ऑफ वेलिंग्टनच्या नेतृत्वाखाली उभे राहिले. फील्ड मार्शल ब्लूशरच्या नेतृत्वाखाली १ लक्ष १७ हजार प्रशियन सैन्य बेल्जियममध्ये फ्रेंच सीमेवर सज्ज झाले, श्वार्झेनबर्गने २ लक्ष १८ हजार ऑस्ट्रियन सेना ऱ्हाइनच्या वरच्या बाजूस उभी केली, ऱ्हाइनच्या मध्य भागात बार्कलेचे १ लक्ष ९० हजार रशियन सैन्य खडे ठाकले, तर उत्तर इटलीत फ्रीमाँतच्या नेतृत्वाखाली ७५ हजार ऑस्ट्रो– इटॅलियन सैनिक युद्धास तयार झाले.

केवळ संख्याबलाने नेपोलियनवर मात करून त्याला साफ नेस्तनाबूत करावयाचे, असा दोस्त सेनापतींचा व्यूह होता. वेलिंग्टन, ब्लूशर व श्वार्झेनबर्ग या तिघांच्या सैन्यदलांनी थेट पॅरिसवर चाल करावयाची व यापैकी कोणाला थांबावे लागले वा माघार घ्यावी लागली, तर ज. बार्कलेने रशियन सैन्य घेऊन त्याला मदत करावी, अशी ही रचना होती. तिन्ही देशांच्या फौजांनी २७ जून ते १ जुलै या दरम्यान फ्रेंचसीमेत प्रवेश करावा असे ठरले होते बेल्जियममध्ये अँग्लो– डच व जर्मन सेनादले होती. दोन्ही सैन्यदलांवर वेलिंग्टनचे आधिपत्य होते. वेलिंग्टन व ब्लूशर दोघांनाही नेपोलियन चढाई करील असे वाटत नव्हते. म्हणून क्वात्रे ब्रास– सांब्र रेषेवर सैन्य जमवून आगेकूच करण्याचा संयुक्त निर्णय घेतला गेला.

### अखेरच्या लढाया

मात्र नेपोलियनने बेल्जियममध्ये शिरून प्रथम अँग्लो– डच व नंतर प्रशियन सैन्याला मार देण्याचे ठरविले. दोस्तांची दोन्ही दले एकत्र झाली नव्हती. त्याचा फायदा घेण्याची त्याची इच्छा होती. यासाठी वेलिंग्टन, ब्लूशर यांच्या सेनादलांमध्ये असलेल्या पोकळीतून झपाट्याने ब्रसेल्सला जाणे आवश्यक होते. प्रशियन सैन्य त्याच्या नजीक होते. त्याला प्रथम

नेस्तनाबूत करावे व त्वरेने दुसऱ्या बाजूला वळून वेलिंग्टनचा फडशा पाडावा, हा नेपोलियनचा डाव होता. १३ जूनच्या रात्री फ्रेंच– बेल्जियम सीमेवर नेपोलियनच्या सैनिकांच्या शेकोट्या दिसू लागल्या. ब्लूशरने तात्काळ म्हणजे त्याच रात्री ११ वाजता, आपल्या सर्व कोअर कमांडर्सना फ्लुरूसच्या दिशेने सैन्य एकवटण्याचा हुकूम दिला. पहिल्या कमिशन कोअरचा सेनापती ज. झायथेन हा होता. त्याने सांब्र नदीवर फ्रेंच चढाई रोखावी, मात्र भारी हानी होण्याचा धोका निर्माण झाला तर फ्लुरूसपर्यंत क्रमाक्रमाने माघार घ्यावी असे हुकूम त्याला देण्यात आले. झायथेनच्या कोअरला मागे हटावे लागले. ते फ्लुरूसपर्यंत परतले.

क्लाउजवित्सची रजा संपल्यावर त्याची तिसऱ्या कोअरमध्ये सेनाधिकारी मंडळाचा प्रमुख म्हणून नेमणूक झाली. या कोअरचा सेनापती लेफ्ट ज. फॉन थिएल्मान हा होता. त्याला बेल्जियममधील जे स्थळ धरण्यास सांगण्यात आले, ते वॉटर्लूपासून ४० मैलांवर होते. याप्रमाणे क्लाउजवित्सची फ्रेंचविरुद्ध चवथी मोहीम सुरू झाली. फारच थोड्या प्रशियन अधिकाऱ्यांना अशी संधी मिळाली असेल. या वेळी क्लाउजवित्सची प्रकृती उत्तम होती. समरप्रसंग आला की त्याला अवसान चढे. तिसऱ्या कोअरमध्ये २०,६११ पायदळ सैनिक, २४०५ घोडेस्वार, शिवय ४८ तोफा होत्या.

प्रशियन सेना फ्लुरूसनजीक गोळा होत असल्याचा संदेश वेलिंग्टनला १५ जूनच्या सकाळी मिळाला, तरीही त्याने दिवसभर ब्लूशरच्या दिशेने जाण्याचा निर्णय घेतला नाही. मात्र त्या रात्री आलेल्या तातडीच्या संदेशामुळे, नेपोलियन प्रथम प्रशियन सैन्यावर तुटून पडू पहातो, याबद्दल त्याची खात्री पटली व त्याने सेनेला क्वात्रे ब्रासकडे जाण्याचा हुकूम दिला.

इकडे झायथेनच्या सैन्यावर संकट कोसळल्यामुळे थिएलमानच्या तिसऱ्या कोअरला त्वरित त्याच्या मदतीस जाण्याचा आदेश मिळाला. १६ जूनच्या मध्यरात्री म्हणजे दोन वाजता तिसरे कोअर नामूरला पोहोचले, आणि लगेच पहाटे फ्लुरूसच्या दिशने चालू लागले. फ्लुरूसच्या पाठीमागे लिग्नी नावाचा ओढा होता. त्याच्या काठाशी झायथेनच्या पथकांनी जागा घेतल्या. तिसऱ्या कोअरचे सैनिक या भागात सकाळी दहा वाजता पोहोचण्यास प्रारंभ झाला, आणि त्यांनी झायथेनच्या डाव्या बगलेस मोर्चे उभारले. याच सुमारास पर्चचे दुसरे कोअरही तेथे येऊन पोहोचले. त्याला झायथेनच्या पाठीमागे उभे करण्यात आले.

प्रशियन सेनेने अत्यंत त्वरेने बचाव मोर्चे उभारून ते बळकट करण्याची खटपट चालू केली. मात्र प्रशियनांचे सर्वात मोठे नि बलिष्ठ मानले जाणारे, सेनापती ब्युलोचे कोअर अद्याप लीजमध्येच म्हणजे रणांगणापासून ६० मैल अंतरावर होते. म्हणजे ३० हजार सैनिक वगळून उरलेल्या प्रशियनांना लढाई करावी लागणार होती.

हे रणांगण व ही वेळ ब्लूशरला अनुकूल नव्हती. त्याच्यापाशी सव्वा लाखाऐवजी ८४ हजारच सैनिक होते. आणि सहा मैल दूर असलेल्या क्वात्रे ब्रास येथे नेपोलियनने वेलिंग्टनचे सैन्य अडकावून ठेवले होते. नेपोलियनच्या हाती महत्त्वाचे मार्ग जाऊ द्यायचे नसतील, तर लिग्नी ओढ्याच्या प्रवाहाच्या भागातील खेड्यांचे पुंज प्रथम ताब्यात घेणे आवश्यक होते. या खेड्यातील घरे दगडी बांधणीची होती व भोवती जाड भिंती तरी होत्या, वा गच्च झुडपांची कुंपणे तरी होती. संरक्षणाच्या दृष्टीने ही स्थिती उत्तम होती.

दोन्ही पक्ष लढाईला सज्ज झाले नि युद्ध सुरू होण्याची वाट पहात बसले. या मोसमात (जून- जुलै) दुपारी उन्हाचा कडाका असतो. स्वाभाविकच सैनिकांच्या अंगातून घामाच्या धारा वहात होत्या. सकाळ टळली नि फ्रेंच सैनिक हल्ल्यासाठी पुढे सरकत आहेत हे क्लाउजवित्सच्या ध्यानात आले. त्यांची शस्त्रे व गणवेशावरील बकले उन्हात चकाकू लागली. तोफगाड्यांची चाकें करकरू लागली आणि अधिकाऱ्यांच्या हुकुमाचे प्रतिध्वनी खोऱ्यात घुमू लागले. प्रशियन सैनिक निःशब्द व स्तब्ध होते. जन. ग्राउची याचे तिसऱ्या प्रशियन कोअरला जागीच अडकावून ठेवावे आणि त्याच वेळी ज. वेंदाम व गेरार्डने सेंट आमंद व लिग्नी यावर हल्ला चढवावा, असा नेपोलियनचा व्यूह होता.

क्लाउजवित्सच्या म्हणण्यानुसार दुपारी दोन वाजता लिग्नीच्या लढाईला तोंड लागले. तिसऱ्या कोअरवर काही तोफांचा मारा झाला, तरी पहिले काही तास मोठा हल्ला आला नाही. क्लाउजवित्स एका दगडी भिंतीमागे लपून टेहळणी करीत होता. सेंट आमंदवर हल्ला करण्याआधी फ्रेंच सैनिक पिवळ्या धान्यशेतातून पुढे सरकत आहेत, हे त्याला दिसत होते. याच सुमारास लिग्नीवर तोफांचा गडगडाटी मारा होऊन ते खेडे धुरात बुडून गेले. धूर व धूळ खाली बसली तेव्हा प्रशियन सैनिक शिल्लक नसतील अशी क्लाउजवित्सची कल्पना होती. पण फ्रेंच सैनिक पुढे येताच प्रशियन सैनिकांनी घराच्या कुंपणांच्या भिंतीआडून गोळीबार सुरू केला.

लिग्नीवरील दोन फ्रेंच हल्ले परतविण्यात आले. मात्र, सेंट आमंदवर एवढ्या मोठ्या संख्येने फ्रेंच सैनिक चालून आले की, वाटेत आलेल्या सर्वांना त्यांनी कापून काढले. पण सेंट आमंद काबीज केल्यावर फ्रेंच पुढे जाऊ लागले, तेव्हा त्यांच्यावर पलीकडच्या टेकडीवरून तोफांची एवढी तुफान सरबत्ती झाली की, नेपोलियनच्या सैन्याला मागे हटावे लागले. याचा फायदा घेऊन प्रशियन पथकाने प्रतिहल्ला केला व अर्धे सेंट आमंद परत घेतले. या पाठोपाठ दोन्ही बाजूंच्या तोफांचे भयकारी द्वंद्व सुरू झाले. फुटल्यावर आजूबाजूला विखरणाऱ्या तोफगोळ्यांमुळे कित्येक फ्रेंच सैनिक घायाळ होऊन पडले, तर काही भीतीने पळू लागले. तरीही बाकीच्यांची आगेकूच चालूच होती.

आता थिएलमानच्या तिसऱ्या कोअरचीही फ्रेंचांशी लढाई सुरू झाली. बोइनी खेडे व तोंग्रिनच्या पलीकडील घरे काबीज करण्याचा आदेश ग्राउचीने फ्रेंच पथकांना दिला. काही घरे

फ्रेंचानी घेतली. घराआडून प्रशियन सैनिक बंदुकींचा एवढा जबरदस्त मारा करीत की, अनेक फ्रेंच सैनिक खाली पडत तरीही कठोर निश्चयाने फ्रेंच सैनिक आगेकूच करीत होते. तथापि, प्रशियन माऱ्याचा जोर अखेर एवढा वाढला की, फ्रेंच सैनिकांना जीव मुठीत घेऊन धावतपळत परतावे लागले.

प्रशियन मध्य व उजवी फळी मोडून काढणे एवढेच नेपोलियनचे उद्दिष्ट होते. परिणामी, मुख्य लढाई सेंट आमंदभोवतीच चालली होती. आमंद फ्रेंचांनी एकदा घेतल्यावर सोडले नाही. तथापि त्यांना आगेकूच करणे अशक्य झाले. याउलट, प्रशियन सेनापती पर्चने प्रतिहल्ला चढविला तेव्हा फ्रेंच तोफखान्याने जवळपास त्याच्या सर्व सैनिकांची कत्तल केली. तरीही प्रशियन हटले नाहीत. लढाईत सतत मागेपुढे चालू होते. फ्रेंच सेनापती जिराद ठार झाला. अखेर स्वत: सरसेनापती ब्लूशरने प्रतिहल्ल्याची आखणी केली व रिकिबीत उभा राहून त्याने गर्जना केली: माझ्या पुत्रांनो, आगे बढो. ईश्वराचे नाव घ्या नि आगेकूच करा!

ब्लूशरने दिलेली 'फोरवार्टस्' ही घोषणा एका आवाजात घुमवत प्रशियन सैन्य फ्रेंचांवर तुटून पडले, तेव्हा फ्रेंच सैनिकांनीही 'विवे एम्परर' ही नेहमीची घोषणा दिली. फ्रेंच तोफखान्याला दाद न देता प्रशियन सैन्य चालून गेले व ला हाये खेड्यातील इमारतींमधील फ्रेंचाना कापून काढून त्यांनी ते खेडे जिंकले. हाच प्रकार वॅग्नेली खेड्याबाबत झाला. पण या खेड्यातील घरांचा आश्रय सोडून प्रशियन सैन्य पुढे चालून गेले तेव्हा उभ्या पिकात लपविलेल्या फ्रेंच तोफांनी त्यांना भाजून काढले. प्रशियनांना माघार घेण्याखेरीज पर्याय नव्हता. थिएलमान व क्लाउजवित्सच्या कोअरला जरूर तेथे कुमक देण्याचे काम होते. क्लाउजवित्स हल्ले व प्रतिहल्ल्यांचे निरीक्षण करीत होता. ला हाये चार वेळा प्रशियन व फ्रेंचांनी आलटून पालटून काबीज केले. सेंट आमंदची तीच गत झाली. प्रशियनांची डावी बगल मार खात होती. म्हणून तिसऱ्या कोअरचे सैनिक कुमक म्हणून तिकडे धाडण्यात येत होते.

लिग्नी येथे घनचक्कर लढाई चालू होती. हजारो सैनिक आमनेसामने उभे राहून परस्परांवर बंदुकींच्या फैरीवर फैरी झाडत होते. मोठे रस्ते, गल्ल्या, इमारतींची प्रवेशद्वारे, मृत व मरू घातलेले व जखमी सैनिक यांनी भरून गेली होती. सबंध गावावर धुराचा प्रचंड थर पसरत होता, व प्रत्येक घर किल्ल्याप्रमाणे लढविले जात होते.

लिग्नीतील प्रशियनांच्या मदतीला तिसऱ्या कोअरची एवढी पथके गेली की, त्या कोअरमध्ये पाव हिस्सा सैनिकही उरले नाहीत. आणि फ्रेंचांचा मारा कमी होण्याची चिन्हे तर दिसेनात. ब्लूशर व ग्नायजनाउ स्वाभाविकच विचारात पडले. ज. ब्युलेकडून कुमक येण्याची आशाच नव्हती. तो खूपच दूर होता, आणि वेलिंग्टन स्वत:च क्वात्रे ब्रासच्या लढाईत अडकून पडल्यामुळे तिकडूनही रसदीची आशा नव्हती. तथापि फ्रेंचांची चढाई ढिली पडत असल्याची लक्षणे दिसू लागली. द एरलाँ या सेनापतीला नेपोलियनने लिग्नीवर चालून

जाण्याचा आदेश दिला होता. पण क्वात्रे ब्रास येथे असलेल्या मार्शलनेकडूनही त्याला तातडीने निघून येण्याचा संदेश मिळाला, व द एरलाँ तिकडे निघाला. त्यामुळे नेपोलियनला आपली लिग्नीवरील चढाई थांबवावी लागली.

फ्रेंचांच्या या गोंधळामुळे थिएलमानला थोडीफार उसंत मिळाली. त्याचा फायदा घेऊन त्याने क्लाउजवित्सला चढाईची तयारी करण्यास सांगितले. त्याने नजीक असलेले पायदळ व घोडदळ जमविले आणि ते टेकाडावरून उतरून लिग्नी पुलाच्या दिशेने चालून गेले. फ्रेंच सैन्याची पांगापांग झाली तरी त्यांनीही तोफा पुढे आणून प्रशियनांना माघार घ्यायला लावली. याच गतीने फ्रेंच पुढे येणार काय ? येथे सेनापतींची चमक दिसली. थिएलमान व क्लाउजवित्स दोघेही पुढे आले. त्यांनी पायदळ पुढे आणून लढाईच्या पवित्र्यात उभे केले व तोफांची सरबत्ती करून फ्रेंचांची चढाई मोडून काढली. एवढेच नव्हे तर त्यांना माघार घ्यायला लावली.

## ब्लूशरचे शौर्य

मात्र ला हाये, लिग्नी आदी खेड्यांतील प्रशियनांची अवस्था बिकट होती. अनेक प्रशियन सैनिकांचा दारूगोळा संपला होता. आणि नेपोलियनशी १० हजार राखीव फौज होती. यातच विख्यात गार्ड पथके होती. त्यांनी हल्ला सुरू करताच प्रशियनांची तारांबळ उडाली. मात्र अंधार पडत चालल्याने रणांगणावर गोंधळही बराच माजला होता. जे घोडदळ शिल्लक होते त्यानिशी ब्लूशर फ्रेंचांवर चालून गेला. पण त्याचा खास घोडा गोळा लागून कोसळला व त्याच्याच शरीराखाली ब्लूशर सापडला. ब्लूशर आपल्या साहाय्यक अधिकाऱ्यास ओरडला. 'नेस्तित्स, मी मेलो रे!' फ्रेंच घोडेस्वार जवळून धावत होते. कोणी अगदी नजीक आलाच तर त्याला कापून काढण्यासाठी नेस्तित्स तलवार फिरवीत सिद्ध होता. पण अंधारात फ्रेंचांना ब्लूशरची ओळख पटली नाही. थोड्याच वेळात फ्रेंचांना मागे हटविण्यात आले. काउंट नेस्तित्सने काही प्रशियन सैनिकांना थांबविले, त्यांच्या मदतीने घोड्याचे प्रेत बाजूला ढकलून ब्लूशरला मोकळे केले. त्याच्या अंगावर आपला झगा पसरून ठेवला.

ब्लूशर बेशुद्ध झाल्यामुळे निर्णयाची सर्व जबाबदारी ग्नायजनाऊवर पडली. माघार घेणे भागच होते. सर्वांनी वावरकडे जावे, असा आदेश देण्यात आला. अर्धीमुर्धी पथके, जशी जमली तशी वावरला धाडण्यात आली. क्लाउंजवित्सचे दल प्रशियन आघाडीच्या उजव्या बगलेवर होते. त्याला तात्काळ आणखी एका चढाईचा आदेश देण्यात आला. त्यामुळे रात्र असूनही लिग्नी ओढा ओलांडण्याच्या हेतूने छोटी प्रशियन पथके चालून गेली. प्रशियन सैनिकांनी फ्रेंचांवर गोळीबार सुरू केला. फ्रेंचांनीही पायदळ वा घोडदळासह प्रतिहल्ले केले. पण ते मोडून काढण्यात आले. दिवसभराच्या व रात्रीच्या सतत युद्धाने तिसऱ्या कोअरचे

सैनिक एवढे थकले होते की, ते जागीच कोसळून पडले व झोपी गेले. क्लाउजवित्सने लिहिले: ती रात्र म्हणजे महाभीषण अनुभव होता. मी केवळ एकदाच घोड्यावरून खाली उतरलो आणि तेही फील्ड मार्शल ब्लूशर यांना अहवाल लिहून पाठविण्यासाठी. मला वाटते, माझे डोक्यावरचे केस पांढरे झाले ते त्या रात्रीच! पहाटे उरलेले सैनिक जमवून क्लाउजवित्सच्या पथकाने माघार सुरू केली. लिग्नीची लढाई भीषण स्वरूपाची ठरली. नेपोलियनबरोबर दुसऱ्या दिवशी रणांगणाची पाहणी करण्यासाठी गेलेल्या एका फ्रेंच अधिकाऱ्याने वर्णन केले: अनेक ठिकाणी एकावर एक अशी तीन- तीन प्रेते होती. रक्ताचे पाट वहात होते. लिग्नीच्या मुख्य रस्त्यावरील चिखल लाल झाला होता व त्यात चुरा झालेली हाडे आणि मांसाचे गोळे मिसळले होते! त्या लढाईत प्रशियनांनी १६ हजार सैनिक गमावले. त्यातले अनेक ठार व काही कैद झाले. याखेरीज १० हजार सैनिक गणवेष टाकून पळून गेले. नेपोलियनचेही १२ हजार सैनिक निकामी झाले. याचा अर्थ हा विजय त्याला महागात पडला. काही समीक्षकांच्या म्हणण्याप्रमाणे, त्याने प्रशियन सेनेचा लगोलग पाठलाग केला असता तर ही किंमत वाजवी ठरली असती. पण नेपोलियनने थांबण्याचे ठरविले, ही फार मोठी चूक झाली.

सेनापती ब्लूशर रणांगणावर जखमी होऊन पडला होता. त्याला सहा मैल पिछाडीस नेण्यात आले. त्याचे सर्व शरीर ठेचाळले होते. त्याच्या शरीरावर ब्रँडी चोळण्यात आली आणि थोड्याच अवकाशात सेनापती महाशय शुद्धीवर आले. जे औषध आपल्या शरीरावर चोळण्यात आले, त्यापैकी थोडे पोटात घेण्यासाठी द्यावे अशी विनंती त्याने केली. डॉक्टरने ती नाकारली, पण थोडी शँपेन मात्र पुढे केली.

लिग्नीची लढाई चालू असतानाच, तेथून अवघ्या सहा मैलांवर फ्रेंच सेनेची अँग्लो- डच सेनेशी लढाई झाली. निवेले- नामूर व शार्लेरोई- ब्रसेल्स त्यांच्याकडे जाणारे रस्ते मिळतात, त्या चौकाच्या आसपास अँग्लो- डच सैन्य अडचणीत आले होते. पण फ्रेंच सेनापती मार्शल ने, द एरलाँ याच्या पथकाची वाट पहात बसल्याने अँग्लो- डच सैन्याचा सेनापती वेलिंग्टन याला आपल्या सैन्याची व्यवस्थित मांडणी करण्याची संधी मिळाली. रात्रौ ९ वाजता लढाई थांबली तेव्हा दोन्ही पक्षांनी प्रत्येकी ५ हजार सैनिक गमावले होते.

विशेष म्हणजे १६ जूनच्या लढायांबद्दल प्रत्येक पक्ष समाधानी होता. आपण प्रशियन सेनेचा पराभव केला असून आता आपण वेलिंग्टनवर तुटून पडू शकतो, असे नेपोलियनला वाटत होते. क्वात्रे ब्रास हे मोक्याचे ठाणे घेता आले नाही, तरी आपल्या पराक्रमामुळे प्रशियन व अँग्लो- डच सैन्य परस्परांत मिसळू शकणार नाही; त्या दोघांमध्ये आपण पाचर ठोकली आहे. असा मार्शल ने याचा विश्वास होता. आपले सैन्य एकत्रित असल्यामुळे आपण भक्कम स्थितीत आहोत, अशी वेलिंग्टनची भावना होती, तर आपले सैन्य अद्याप उत्तम अवस्थेत असल्याचे ब्लूशरला वाटत होते.

मात्र वेलिंग्टन व ब्लूशर यांच्यातील संदेशवहन असावे तसे कार्यक्षम नव्हते ते उघड झाले. लिग्नीच्या लढाईनंतरही काही काल तेथे काय झाले, हे वेलिंग्टनला समजले नव्हते. ब्लूशरने आपल्या माघारीची बातमी देण्यासाठी मेजर विंटरफेल्ड नावाच्या अधिकाऱ्यास पाठविले. नेपोलियनच्या सैनिकांच्या गोळीबारात तो जखमी होऊन पडला. ब्रिटिश पथकांनी त्याला आपल्या छावणीत आणले. वेलिंग्टनच्या छावणीत एक प्रशियन अधिकारी होता. त्याने मेजर विंटरफेल्डची भेट तो कनिष्ठ अधिकारी असल्यामुळे नाकारली. अखेर दुसऱ्या दिवशी खुद्द वेलिंग्टनचा अधिकारी कर्नल गॉर्डन स्वत: लिग्नीस जाऊन पाहणी करून आला तेव्हा ब्लूशरने माघार घेतल्याचे त्याला समजले. वेलिंग्टन उद्गारला: म्हाताऱ्या ब्लूशरने बराच मार खाल्ला नि तो वावरला गेला; आता आपणही माघार घ्यायला हवी! त्याने वॉटर्लूकडे कूच सुरू केले.

तिसऱ्या प्रशियन कोअरची अखेरची पथके व त्यांना संरक्षण देणारी घोडदळ पथके १७ जूनच्या सकाळपर्यंत लिग्नीतून बाहेर पडू शकली नव्हती. त्यामुळे त्या सकाळी त्यांच्यावर फ्रेंच घोडदळ केव्हाही तुटून पडेल, अशी भीती क्लाउजवित्सला वाटत होती. पण त्याची भीती खोटी ठरली. इकडे वेलिंग्टनच्या सैन्यातही गोंधळ माजला होता. पण अँग्लो- डच सेनेचा पाठलाग करण्याऐवजी मार्शल ने स्वस्थ बसून राहिला. १७ जूनला दुपारी नेपोलियन मार्शल नेच्या छावणीपाशी पोहोचला, तेव्हा शिपाई स्वयंपाकात व्यग्र असल्याचे त्याला दिसून आले. त्याने तत्काळ सैन्यास तयार होण्याचा हुकूम दिला. फ्रेंच सैन्य पाठलागास निघणार तो वादळी पावसास प्रारंभ झाला, व चिखलामुळे ब्रिटिशांच्या बगलेकडे फ्रेंच सैन्य जाऊ शकले नाही.

दोन्ही आघाड्यांवरील शत्रुसेना माघार कशी घेऊ शकल्या? नेपोलियन यावेळी आजारी होता नि खूप थकला होता, त्याचबरोबर सर्व निर्णय स्वत:च घेण्याचा त्याचा हट्ट, हा त्याची कारणे. मार्शल ग्राउची हा ४८ वर्षांचा शूर व अनुभवी सेनापती. प्रशियन सैन्य विस्कळित होऊन माघार घेत आहे हे त्याच्या टेहळणी पथकांनी त्याला कळविले होते. पाठलाग करण्याची त्याची इच्छा होती. पण कोठल्याही सूचना वा आदेश न देता नेपोलियन रणांगणावरून परतला होता. ग्राउची त्याच्या छावणीत पोहोचला तेव्हा नेपोलियन झोपला होता व त्याला उठविण्याची कोणाची हिंमत नव्हती. आणखी एक कारण म्हणजे नेपोलियनने ब्लूशरची हिंमत नीट अजमाविली नाही. लिग्नी येथील हिंस्र संग्रामानंतर ब्लूशर हिंमत बांधून फ्रेंचांच्या डोळ्यादेखत वेलिंग्टनच्या सैन्याशी हातमिळवणी करण्यासाठी जाईल, यावर त्याचा विश्वास नव्हता.

### वॉटर्लू व वावर

नेपोलियनला त्यावेळी शत्रूच्या हालचालींचा जसा पत्ता लागला नाही, तद्वत प्रशियन

सेनाधिकाऱ्यांनाही आपली बाकीची पथके कोठे आहेत त्याचा पत्ता नव्हता. थाइलमान व क्लाउजवित्स यांची पथके वावरच्या दिशेने चालू लागली होती तरी त्यांना सेनापती ब्लूशरकडून निश्चित आदेश आलेले नव्हते. मात्र ज. ब्युलोचे कोअर तीन मैलांवर आहे असे समजल्यावर त्यांनी आपल्या सैन्याला थोडी विश्रांती दिली. इतर कोअर कोठे आहेत याची ब्युलोलाही माहिती नव्हती.

लिग्नीच्या लढाईत ब्लूशर जखमी झाला व त्याला घाईघाईने औषधोपचारासाठी पिछाडीवर नेण्यात आले. तथापि, तो नेमका कोठे आहे. याचा ज. ग्नायजनाउलाही पत्ता नसल्यामुळे बराच काळ प्रशियन सेनाधिकारी गोंधळले होते. पण थोड्या खटपटींनंतर ग्नायजनाउची ब्लूशरशी भेट झाली. दुसऱ्या दिवशी सकाळी ७३ वर्षांचा ब्लूशर घोड्यावरून रपेट करण्याएवढा बरा झाला. त्याने ब्युलो व थिएलमान दोघाही सेनापतींना वावरला जावे असा आदेश धाडला.

थिएलमानच्या सेनेने थोड्या विश्रांतीनंतर वावरकडे कूच केले व ६तासांत १८ मैलांवरील ते ठाणे गाठले. प्रशियन सेनेची कूच चालू असताना त्यांच्यावर तुटून पडणे मार्शल ग्राउचीला शक्य होते. पण त्याला नेपोलियनचा आदेश हवा होता. त्याने एकूण परिस्थितीबद्दल नेपोलियनला संदेश पाठवून आदेश मागवला. तो संदेश नेपोलियनला १८ जूनच्या पहाटे दोन वाजता मिळाला. तो वेळपावेतो सर्व प्रशियन फौजा वावर ठाण्यात पोहोचून लढाईसाठी सज्ज झाल्या होत्या.

आपल्या सेना वावरेत योग्य वेळी पोहोचतील याची खात्री असल्यामुळे ब्लूशरचा आत्मविश्वास वाढला होता. वेलिंग्टनने त्याच्याकडे एका कोअरच्या (२ किंवा ३ डिव्हिजन्स सैन्य) मदतीची मागणी केली होती. ब्लूशरने त्याला दोन कोअर व आणखी थोडे सैन्य देऊ केले. या दोन कोअरखेरीज पहिले व तिसरे कोअर आपल्या मदतीसाठी कूच करण्यास सिद्ध राहील, असेही या प्रशियन सेनापतीने कळविले. ब्लूशरची इच्छा सर्व प्रशियन सैन्य वेलिंग्टनच्या मदतीला नेण्याची होती. तथापि मार्शल ग्राउचीने पिछाडीवर हल्ला केला, तर त्याच्या बंदोबस्तासाठी त्याने थिएलमानचे कोअर वावरमध्येच ठेवले. ग्राउचीला अडकवून ठेवावे, नेपोलियनला जाऊन मिळण्याची संधी त्याला देऊ नये, त्याचबरोबर ब्लूशरच्या मदतीला जाणाऱ्या प्रशियन सेनेला माघार घ्यावी लागली तर रस्ते मोकळे ठेवावेत, ही कामे या दलावर सोपविण्यात आली.

क्लाउजवित्सने या कामाच्या दृष्टीने आपल्या दलाची मांडामांड केली. सैनिकांना विश्रांती मिळाली होती व त्यांचे मनोधैर्य उत्तम होते. पावसामुळे ते गारठले होते व अन्नाची थोडी टंचाई होती. पण त्याला इलाज नव्हता. फ्रेंच सैन्याने सकाळ वाया घालविली. तिकडे वेलिंग्टन व नेपोलियन यांची लढाई वॉटर्लूच्या भूमीवर सुरू झाली होती (१८ जून, सकाळी ११ वाजता). वेलिंग्टनला प्रशियन सेनेच्या मदतीची, तर नेपोलियनला मार्शल

ग्राउचीच्या कोअरच्या मदतीची जरूरी होती. ब्लूशरला आपल्या सेनेसह वॉटर्लूकडे जाणे शक्य नव्हते. तथापि, त्याचा वावरवरील हल्ला सुरू झाला तोच दुपारी चार वाजता !

ग्राउचीजवळ अधिक सैन्य होते व ते दमलेले नव्हते. त्यामुळे फ्रेंच सैन्याचा हल्ला जबरदस्त होता. डाइल नदीच्या एका तीरावर फ्रेंच तर दुसऱ्या तीरावर प्रशियन सैन्य होते. फ्रेंचांनी पूल ताब्यात घेण्यासाठी झेप घेतली, पण तेथे ठेवण्यात आलेल्या निष्णात प्रशियन नेमबाजांनी शेकडो फ्रेंचांना गारद करून पुलापर्यंत येऊ दिले नाही. मार्शल ग्राउचीने परिस्थिती पाहून दोन बगलांवर हल्ले चढविले. पण तेही प्रशियन सेनेने मोडून काढले. तरीही ग्राउची पुन:पुन्हा हल्ले चढवीत होता. रात्री दहा वाजण्याच्या सुमारास फ्रेंच सैन्याने डाइलच्या प्रशियन किनाऱ्यावर पाय ठेवला.

फ्रेंचांच्या या यशामुळे प्रशियन बगला धोक्यात येण्याचा संभव होता. म्हणून क्लाउजवित्सला सैन्य मागे घ्यावे लागले. या दिवसात उशिरापर्यंत सूर्यप्रकाश असतो. पण दहा वाजून गेल्यामुळे प्रकाश कमी होत चालला होता, व तोफांच्या सरबत्तीमुळे सर्वत्र काळा धूर दाटला होता. पावसामुळे जमिनीवर तर रबरबाट झाला होता. तरीही, फ्रेंचांना पुन्हा नदीच्या दुसऱ्या काठावर ढकलून देण्यासाठी प्रशियन सेनेने अंधारातच हल्ला चढविला.
आता तोफांचा व बंदुकीचा मारा अंगावर घेण्याची पाळी त्यांच्यावर आली. अनेक प्रशियन ठार झाले. पुलाच्या दोन्ही बगलांवरील प्रशियन सैन्याची अवस्थाही कठीण झाली होती.

वॉटर्लूची लढाई नेपोलियनच्या पराभवाने १८ जूनला रात्री ८ वाजताच संपली होती. पण थिएलमान व क्लाउजवित्स यांच्या तिसऱ्या कोअरला निश्चित अशी बातमी मिळायला १९ जूनच्या सकाळचे १० वाजले. ही वार्ता ग्राउचीला समजली म्हणजे तो माघार घेऊ लागेल, असा विचार थिएलमानने केला व बचावाऐवजी चढाईचा आदेश आपल्या पथकांना दिला. तथापि, प्रशियन सैन्य फ्रेंचांच्या तुलनेत निम्मे होते व दिवसभराच्या व रात्रीच्या लढायांनी ते दमले होते. त्याचप्रमाणे ग्राउचीने स्वत:च चढाईची योजना आखली होती. तीन डिव्हिजन्स गोळा करून त्याने हल्ला सुरू केला. २८ फ्रेंच बटालियन्सविरुद्ध १० प्रशियन बटालियन्स असा हा लढा होता. फ्रेंच सैन्याच्या लाटा एकामागोमाग एक येऊन प्रशियन सेनेवर आदळत होत्या. प्रशियन तोफा अनेकांचे बळी घेत होत्या, तरीही फ्रेंच पुढे सरकत होते. प्रशियन सेनांची माघार थांबण्याचे लक्षण दिसेना. परिस्थिती याप्रमाणे निकराला आली असताना, थिएलमान व क्लाउजवित्स यांना एक युक्ती सुचली. त्यांनी आपल्या सैन्यात वॉटर्लू येथे अँग्लो– प्रशियन विजयाची बातमी पसरविली: अरे, बुड्ढा ब्लूशर विजयी झाला! नेपोलियन माघार घेत आहे नि दोस्त सैनिक त्याचा पाठलाग करीत आहेत!! प्रशियन सैनिकांना चेव आला व बचावाऐवजी चढाईसाठी त्यांनी उड्या घेतल्या. काही काळ फ्रेंचांना त्यांनी मागे हटविले, पण त्यांच्यापाशी पुरेसे सैन्य नव्हते व कुमकही येण्यासारखी नव्हती. परिणामी थोड्याच वेळात त्यांना माघार घेणे भाग पडले. क्लाउजवित्सने नंतर लिहिले,

माघार घेऊन सैन्य वाचवावे व ग्राउचीला पराभवाची वार्ता समजून त्याने माघार सुरू केली की, त्याच्यावर हल्ला चढवावा असा माझा विचार होता.

### क्लाउजवित्सवर ठपका

अखेर ज्या वावरसाठी दिवसरात्र लढाई चालू होती, ते वावर प्रशियनांनी सोडून दिले. प्रशियन सैन्य लढत होते तरी फ्रेंच रेट्यासमोर लुवरेच्या दिशेने मागे हटणे त्यांना भाग पडले. दरम्यान, ग्राउचीच्या हाती वाटर्लूची भीषण वार्ता पक्केपणी आली. त्याने चढाई थांबवून माघारीचा विचार चालू केला. ग्राउचीचे सैन्य प्रशियन सेनेपेक्षा दुप्पट वा अधिक संख्येने असूनही त्याला वावर त्वरेने काबीज करून नेपोलियनच्या मदतीसाठी जाता आले नाही, याची जी कारणे दिली जातात, ती म्हणजे प्रशियन सैन्याची जिद्द, थिएलमान, व क्लाउजवित्स यांनी उभारलेली उत्कृष्ट बचाव ठाणी व अल्प राखीव सैन्याचा त्यांनी केलेला कुशल वापर.

मात्र प्रशियन सैन्याने धडाडीने ग्राउचीचा पाठलाग केला नाही, याचा ठपका खुद्द सेनापती थिएलमानने क्लाउजवित्सला दिला.

क्लाउजवित्सचा एक चरित्रकार रॉजर पार्किन्सन म्हणतो: एकट्या क्लाउजवित्सलाच याबाबत जबाबदार धरणे योग्य ठरणार नाही. प्रशियन सेनापती पर्च हाही ग्राउचीशी लढत होता. त्याने तरी तात्काळ पाठलाग कोठे सुरू केला? त्याने सांगितले की, माझे सैनिक थकले होते. त्यांना भोजन, विश्रांती व दारूगोळा याची जरूरी होती. यापेक्षा वाईट अवस्था थिएलमानच्या सेनेची होती. सलग चार रात्री त्यांना झोप मिळाली नव्हती.

खुद्द नेपोलियन २० जूनला पॅरिसला पोहोचला, व २५ जूनला त्याने मालमैंसनकडे माघार घेतली. वॉटर्लूनंतर ब्लूशरने प्रशियन सैन्य गोळा करून ग्राउचीचा जबरदस्त पाठलाग सुरू केला. रात्रंदिवस प्रशियन पायदळ पायपीट करीत होते. क्लाउजवित्स म्हणतो: या पायपिटीने सैनिक एवढे दमले की, काही थकून अतिश्रमाने मेले; तर काहींनी स्वत:ला गोळ्या मारून घेतल्या.

मार्शल ग्राउचीने अत्यंत कौशल्याने माघार घेतली. वाटेत झालेल्या चकमकीत त्याचे चार हजार सैनिक ठार झाले व १६ तोफाही त्याला गमवाव्या लागल्या. पण शत्रूला त्याने स्वत:ची कोंडी करू दिली नाही. पॅरिसमध्ये तो शिरला तेव्हा नेपोलियन तेथे नव्हता, तरी त्याने जमेल ती तयारी करून राजधानी लढविण्याचे ठरविले. शेवटच्या दोन दिवसांच्या अटीतटीच्या चकमकीमध्ये क्लाउजवित्सही होता. अखेर ३ जुलै रोजी पॅरिसने शरणागती पत्करली.

नेपोलियन युग समाप्त झाले. फ्रेंचांना लक्षात राहील अशी शिक्षा करावी, असे ब्लूशर व ग्नायजनाउ यांच्यासह अनेक प्रशियनांचे मत होते. प्रशियन सैन्याला पॅरिसने दहा कोटी फ्रँक



अनुक्रमणिका

खंडणी द्यावी, सर्व प्रशियन शस्त्रास्त्रांच्या नूतनीकरणाचा खर्च द्यावा व प्रत्येक प्रशियन जवानाला दोन महिन्यांच्या पगाराएवढी बक्षिशी मिळावी, अशा मागण्या ब्लूशरने केल्या, तर नेपोलियनला अटक करून त्याला गोळ्या घालाव्यात, असे ग्नायजनाउचे मत होत दोन्ही मागण्या ब्रिटिश मध्ये पंडल्यामुळे मान्य झाल्या नाहीत. नेपोलियन ब्रिटिशांना शरण गेला. त्याची रवानगी सेंट हेलेना बेटावर करण्यात आली.

क्लाउजवित्सला मात्र ब्लूशर व ग्नायजनाउ दोघांचाही अतिरेक नापसंत होता. अनेक प्रशियन अधिकारी हाव सुटल्यासारखे वागत होते. क्लाउजवित्सने मारीला लिहिले: युद्धानंतरचे हे प्रकार संपावेत ही माझी कळकळीची इच्छा आहे. ज्येष्ठ प्रशियन सेनाधिकाऱ्यांचे वागणे उदारतेचे नाही.

इतिहासकारांच्या मते, क्लाउजवित्सचा हा अनुभव महत्त्वाचा ठरला. त्याने आपल्या ग्रंथात युद्धावर राजकीय नियंत्रण असणे अत्यावश्यक आहे, यावर जोर दिला आहे. युद्ध सुरू झाले की, युद्धाचे प्रशासन सेनापतीवर सोपवून राजकारण्यांनी पडद्याआड जावे हे मत ह्याने भक्कमपणे फेटाळून लावले. ज्या लष्करी श्रेष्ठींना आपल्या हाती सर्व सत्ता असावी असे वाटते, ते धोकादायक चूक करीत आहेत असे क्लाउजवित्स म्हणतो, याचे कारण त्याचा पॅरिसमधील अनुभव. फ्रेंचांकडे नि:शस्त्रीकरणाची मागणी करण्यात शहाणपण नाही; कारण त्यामुळे फ्रेंच जनता कालांतराने आपल्याप्रमाणेच सूडाने पेटेल, असे त्याचे मत होते.

### अनेक सन्मान

नेपोलियनची सेंट हेलेना बेटाकडे रवानगी झाल्यानंतर बऱ्याच दिवसांनी म्हणजे २० नोव्हेंबर रोजी दोस्तांचा फ्रान्सशी तह झाला. तोपर्यंत क्लाउजवित्स पॅरिसमध्येच होता. मारीही तेथे आली होती. तहानंतर त्याची कॉबलेंझ येथे नेमणूक झाल्याने तो जर्मनीत परत आला. कॉबलेंझ येथील त्याचा काळ सुखाचा गेला. पुढे रशियातील लढायांमधील शौर्याबद्दल झारने त्याला मानाची तरवार बहाल केली. आयर्न क्रॉस हे अत्यंत गौरवशाली प्रशियन शौर्यपदक त्याला मिळाले व स्वीडिश लाल गरुड व तरवारही त्याला देण्यात आली. जानेवारी १८२७ मध्ये क्लाउजवित्स कुटुंबाच्या उमरावपदावर (फॉन) राजे विल्हेल्म यानी अधिकृत शिक्कामोर्तब केले.

मात्र, क्लाउजवित्सच्या सर्वच आशा, आकांक्षा पूर्ण झाल्या नाहीत. लंडनमध्ये प्रशियाचा राजदूत म्हणून जाण्याची त्याची इच्छा होती. लष्करात सुधारणा आणण्याच्या त्याच्या कल्पनांनाही नेपोलियनच्या पराभवानंतर फारसा प्रतिसाद मिळाला नाही. त्याची नेमणूक वॉर अॅकॅडमीचा डायरेक्टर या पदावर झाली.

युद्ध प्रबोधिनीचा संचालक या नात्याने क्लाउजवित्सने छात्रांमध्ये रस घेतला नाही. त्यांच्यापासून तो एवढा अलिप्त असे की, क्वचितच कोणाला त्याची माहिती झाली असेल.

त्याच्या पूर्वचरित्राबद्दलही कोणाला माहिती नव्हती. याचा परिणाम काही अफवा उठण्यात झाला. त्याचे नाक काहीसे जांभळे होते. चेहऱ्याचा रंग लाल होता. त्यामुळे सकाळपासून तो मद्याच्या बाटलीवर वाकलेला असतो, असे विद्यार्थी बोलत. चेहऱ्याचा रंग व नाकाचा रंग या १८१२ सालच्या रशियातील हिवाळी मोहिमेच्या त्याला लाभलेल्या देणग्या होत.

मात्र युद्धप्रबोधिनीत न दिसणारा हा संचालक आपल्या बंगल्यातील अभ्यासिकेत सतत लिहीत बसलेला असे. नेपोलियनची १७९६-९७ सालची मोहीम, त्याच्या १७९९ मधील स्वित्झर्लंड व इटलीतील मोहिमा, १८१२ तील रशियाची मोहीम, १८१४ व १५ सालातल्या मोहिमा, यांची टिपणे तो बनवीत होता. त्याचप्रमाणे फ्रेड्रिक द ग्रेट, गुस्टावस अडॉल्फस् , ब्रन्सविकचा फर्दिनांद वगैरेंची चरित्रेही तो तयार करीत होता. याचवेळी 'ऑन वॉर' या ग्रंथाचे लेखन चालू होते. यापैकी काही प्रसिद्ध करावे, असे मारी अनेकदा सांगे. पण अद्याप बरेच लेखन अपुरे राहिले आहे. सध्याच ते प्रसिद्ध केले तर गैरसमज होतील, असे सांगून क्लाउजवित्स प्रसिद्धी टाळत असे.

१८२४ ते ३० या सहा वर्षांच्या काळात क्लाउजवित्सने सर्व लक्ष 'ऑन वॉर' या आपल्या ग्रंथावर केंद्रित केले होते, तरीही या ग्रंथाचे आपल्या मनासारखे पुनर्लेखन त्याला पूर्ण करता आले नाही. आपल्या लिखाणाबाबत अनेक गैरसमज होतील, अशी भीती त्याला वाटे. १८३० साली त्याला लष्करी वैज्ञानिक व तंत्रविषयक आयोगाचे सदस्यत्व देण्यात आले. त्यासाठी त्याला वारंवार प्रवास करावा लागणार होता. यामुळे यापुढे आपणास एका जागी बसून ग्रंथावरच लक्ष केंद्रित करणे शक्य होणार नाही, हे ओळखून त्याने आपल्या लिखाणाचे शक्य तेवढे उत्तम वर्गीकरण केले व विविध विषय वेगवेगळ्या पाकिटांत समाविष्ट करून त्यांना लेबले लावली. एक प्रकारे त्याने स्वत:च्या लिखाणाचा निरोप घेतला, असे म्हणता येईल. कारण यानंतर पुन्हा त्याने ही पाकिटे उघडली नाहीत.

'३० सालच्या सुमारासच युरोपातील वातावरण तापत चालले होते. फ्रान्स, बेल्जियम, जर्मनीचे काही भाग, इटली स्वित्झर्लंड व पोलंड या देशांत क्रांतिकारी उठाव झाले. स्पेनमध्ये यादवी युद्ध सुरू झाले. या उठावांचा फायदा घेऊन फ्रान्स पुन्हा एकदा युरोपवर आक्रमण करील, अशी भीती क्लाउजवित्सला वाटत होती. मात्र, या घटनांनी त्याला नवा जोम आला होता, फ्रान्सला पुन्हा एकदा लोळविण्याची संधी मिळेल, अशी त्याला आशा होती. हे त्याचे विचार तो आपल्या मित्रमंडळीत बोलून दाखवी व मारीलाही पत्रांमधून कळवी.

तथापि, फ्रान्समधील वातावरण शांत झाले व पोलंडमधील उठावाबाबत प्रशियाने केवळ प्रेक्षकाची भूमिका घेतली. या निष्क्रियतेमुळे क्लाउजवित्सची निराशा पुन्हा उफाळून आली. त्यातच पूर्व युरोपात कॉलऱ्याच्या साथीने थैमान घातले व त्याचे अनेक स्नेही व हितचिंतक मरण पावले. त्याचा स्नेही ज. स्टाइन व फील्ड मार्शल ग्नायजनाउ या दोघांचाही मृत्यू झाला, व राजे फ्रीडरिश यांनी ग्नायजनाउचा उचित मृत्योत्तर सन्मान न केल्यामुळे

खंडणी द्यावी, सर्व प्रशियन शस्त्रास्त्रांच्या नूतनीकरणाचा खर्च द्यावा व प्रत्येक प्रशियन जवानाला दोन महिन्यांच्या पगाराएवढी बक्षिशी मिळावी, अशा मागण्या ब्लूशरने केल्या, तर नेपोलियनला अटक करून त्याला गोळ्या घालाव्यात, असे ग्नायजनाउचे मत होत दोन्ही मागण्या ब्रिटिश मध्ये पंडल्यामुळे मान्य झाल्या नाहीत. नेपोलियन ब्रिटिशांना शरण गेला. त्याची रवानगी सेंट हेलेना बेटावर करण्यात आली.

क्लाउजवित्सला मात्र ब्लूशर व ग्नायजनाउ दोघांचाही अतिरेक नापसंत होता. अनेक प्रशियन अधिकारी हाव सुटल्यासारखे वागत होते. क्लाउजवित्सने मारीला लिहिले: युद्धानंतरचे हे प्रकार संपावेत ही माझी कळकळीची इच्छा आहे. ज्येष्ठ प्रशियन सेनाधिकाऱ्यांचे वागणे उदारतेचे नाही.

इतिहासकारांच्या मते, क्लाउजवित्सचा हा अनुभव महत्त्वाचा ठरला. त्याने आपल्या ग्रंथात युद्धावर राजकीय नियंत्रण असणे अत्यावश्यक आहे, यावर जोर दिला आहे. युद्ध सुरू झाले की, युद्धाचे प्रशासन सेनापतीवर सोपवून राजकारण्यांनी पडद्याआड जावे हे मत ह्याने भक्कमपणे फेटाळून लावले. ज्या लष्करी श्रेष्ठींना आपल्या हाती सर्व सत्ता असावी असे वाटते, ते धोकादायक चूक करीत आहेत असे क्लाउजवित्स म्हणतो, याचे कारण त्याचा पॅरिसमधील अनुभव. फ्रेंचांकडे नि:शस्त्रीकरणाची मागणी करण्यात शहाणपण नाही; कारण त्यामुळे फ्रेंच जनता कालांतराने आपल्याप्रमाणेच सूडाने पेटेल, असे त्याचे मत होते.

### अनेक सन्मान

नेपोलियनची सेंट हेलेना बेटाकडे रवानगी झाल्यानंतर बऱ्याच दिवसांनी म्हणजे २० नोव्हेंबर रोजी दोस्तांचा फ्रान्सशी तह झाला. तोपर्यंत क्लाउजवित्स पॅरिसमध्येच होता. मारीही तेथे आली होती. तद्नंतर त्याची कॉबलेंझ येथे नेमणूक झाल्याने तो जर्मनीत परत आला. कॉबलेंझ येथील त्याचा काळ सुखाचा गेला. पुढे रशियातील लढायांमधील शौर्याबद्दल झारने त्याला मानाची तरवार बहाल केली. आयर्न क्रॉस हे अत्यंत गौरवशाली प्रशियन शौर्यपदक त्याला मिळाले व स्वीडिश लाल गरुड व तरवारही त्याला देण्यात आली. जानेवारी १८२७ मध्ये क्लाउजवित्स कुटुंबाच्या उमरावपदावर (फॉन) राजे विल्हेल्म यानी अधिकृत शिक्कामोर्तब केले.

मात्र, क्लाउजवित्सच्या सर्वच आशा, आकांक्षा पूर्ण झाल्या नाहीत. लंडनमध्ये प्रशियाचा राजदूत म्हणून जाण्याची त्याची इच्छा होती. लष्करात सुधारणा आणण्याच्या त्याच्या कल्पनांनाही नेपोलियनच्या पराभवानंतर फारसा प्रतिसाद मिळाला नाही. त्याची नेमणूक वॉर ॲकॅडमीचा डायरेक्टर या पदावर झाली.

युद्ध प्रबोधिनीचा संचालक या नात्याने क्लाउजवित्सने छात्रांमध्ये रस घेतला नाही. त्यांच्यापासून तो एवढा अलिप्त असे की, क्वचितच कोणाला त्याची माहिती झाली असेल.



अनुक्रमणिका

त्याच्या पूर्वचरित्राबद्दलही कोणाला माहिती नव्हती. याचा परिणाम काही अफवा उठण्यात झाला. त्याचे नाक काहीसे जांभळे होते. चेहऱ्याचा रंग लाल होता. त्यामुळे सकाळपासून तो मद्याच्या बाटलीवर वाकलेला असतो, असे विद्यार्थी बोलत. चेहऱ्याचा रंग व नाकाचा रंग या १८१२ सालच्या रशियातील हिवाळी मोहिमेच्या त्याला लाभलेल्या देणग्या होत.

मात्र युद्धप्रबोधिनीत न दिसणारा हा संचालक आपल्या बंगल्यातील अभ्यासिकेत सतत लिहीत बसलेला असे. नेपोलियनची १७९६– ९७ सालची मोहीम, त्याच्या १७९९ मधील स्वित्झर्लंड व इटलीतील मोहिमा, १८१२ तील रशियाची मोंहीम, १८१४ व १५ सालातल्या मोहिमा, यांची टिपणे तो बनवीत होता. त्याचप्रमाणे फ्रेड्रिक द ग्रेट, गुस्टावस अडॉल्फस् , ब्रन्सविकचा फर्दिनांद वगैरेंची चरित्रेही तो तयार करीत होता. याचवेळी 'ऑन वॉर' या ग्रंथाचे लेखन चालू होते. यापैकी काही प्रसिद्ध करावे, असे मारी अनेकदा सांगे. पण अद्याप बरेच लेखन अपुरे राहिले आहे. सध्याच ते प्रसिद्ध केले तर गैरसमज होतील, असे सांगून क्लाउजवित्स प्रसिद्धी टाळत असे.

१८२४ ते ३० या सहा वर्षांच्या काळात क्लाउजवित्सने सर्व लक्ष 'ऑन वॉर' या आपल्या ग्रंथावर केंद्रित केले होते, तरीही या ग्रंथाचे आपल्या मनासारखे पुनर्लेखन त्याला पूर्ण करता आले नाही. आपल्या लिखाणाबाबत अनेक गैरसमज होतील, अशी भीती त्याला वाटे. १८३० साली त्याला लष्करी वैज्ञानिक व तंत्रविषयक आयोगाचे सदस्यत्व देण्यात आले. त्यासाठी त्याला वारंवार प्रवास करावा लागणार होता. यामुळे यापुढे आपणास एका जागी बसून ग्रंथावरच लक्ष केंद्रित करणे शक्य होणार नाही, हे ओळखून त्याने आपल्या लिखाणाचे शक्य तेवढे उत्तम वर्गीकरण केले व विविध विषय वेगवेगळ्या पाकिटांत समाविष्ट करून त्यांना लेबले लावली. एक प्रकारे त्याने स्वत:च्या लिखाणाचा निरोप घेतला, असे म्हणता येईल. कारण यानंतर पुन्हा त्याने ही पाकिटे उघडली नाहीत.

'३० सालच्या सुमारासच युरोपातील वातावरण तापत चालले होते. फ्रान्स, बेल्जियम, जर्मनीचे काही भाग, इटली स्वित्झर्लंड व पोलंड या देशांत क्रांतिकारी उठाव झाले. स्पेनमध्ये यादवी युद्ध सुरू झाले. या उठावांचा फायदा घेऊन फ्रान्स पुन्हा एकदा युरोपवर आक्रमण करील, अशी भीती क्लाउजवित्सला वाटत होती. मात्र, या घटनांनी त्याला नवा जोम आला होता, फ्रान्सला पुन्हा एकदा लोळविण्याची संधी मिळेल, अशी त्याला आशा होती. हे त्याचे विचार तो आपल्या मित्रमंडळीत बोलून दाखवी व मारीलाही पत्रांमधून कळवी.

तथापि, फ्रान्समधील वातावरण शांत झाले व पोलंडमधील उठावाबाबत प्रशियाने केवळ प्रेक्षकाची भूमिका घेतली. या निष्क्रियतेमुळे क्लाउजवित्सची निराशा पुन्हा उफाळून आली. त्यातच पूर्व युरोपात कॉलऱ्याच्या साथीने थैमान घातले व त्याचे अनेक स्नेही व हितचिंतक मरण पावले. त्याचा स्नेही ज. स्टाइन व फील्ड मार्शल ग्नायजनाउ या दोघांचाही मृत्यू झाला, व राजे फ्रीडरिश यांनी ग्नायजनाउचा उचित मृत्योत्तर सन्मान न केल्यामुळे

क्लाउजवित्सच्या विषण्णतेत भर पडली. राजपत्रात ग्नायजनाउच्या गौरवार्थ अत्यंत त्रोटक माहिती देण्यात आली. मारीला लिहिलेल्या पत्रांत क्लाउजवित्स म्हणतो: राजेसाहेबांच्या वागणुकीने माझा आनंद नि धैर्य समाप्त झाले (सप्टेंबर १८३१).

नोव्हेंबरात क्लाउजवित्स ब्रेसलाउला परतला. मारीही तेथे रहावयास आली. आपल्या नवऱ्याची प्रकृती सुधारली असून तो उत्साही बनला आहे असे तिला वाटले. त्याला फिरून लेखनाकडे वळता येईल, अशी आशा मारीला वाटू लागली. पण नियतीची इच्छा निराळी होती. १६ नोव्हेंबर रोजी भोजनाच्या वेळेपर्यंत तो काम करीत होता. मग त्याला अस्वस्थ वाटू लागले. डॉक्टर आले व त्यांना सौम्य कॉलऱ्याचा संशय आला. तथापि अवघ्या ९ तासांनी क्लाउजवित्सची इहलोकीची यात्रा समाप्त झाली (१६ नोव्हेंबर, १८३१). डॉक्टरांच्या मते तो अशक्त झाला होता व त्याची जीवनेच्छा नाहीशी झाली होती.

ब्रेसलाऊच्या लष्करी दफनभूमीत त्याचे अंत्यसंस्कार झाले. विचित्र भाग असा की, ज्या पोलिश लोकांची त्याला घृणा होती, त्याच देशाला हे गाव पुढे देण्यात आले.

क्लाउजवित्सच्या मृत्यूची दखल 'सायलेशियन झायटुंग' व 'स्टाटस झायटुंग' या पत्रांनी घेतली व त्याच्या गुणांचा उचित गौरव केला. विशेष म्हणजे युवराज फ्रीडरिश विल्हेल्म यांचे मारीला भावपूर्ण पत्र आले. पण त्याही पलीकडे राजे फ्रीडरिश विल्हेल्म यांनी एका 'कॅबिनेट ऑर्डर'द्वारा सायलेशिया प्रांताचे सेनापती जनरल झायथेन यांना एक शोक- संदेश पाठविला. त्यात म्हटले होते: प्रशियन सेनेची मोठी हानी क्लाउजवित्स यांच्या निधनाने झाली असून ती भरून निघणे अवघड आहे. मी तर त्यामुळे विषण्ण झालो आहे! राजे विल्हेल्म यांनी क्लाउजवित्ससंबंधात काढलेले हेच एकमेव गौरवोद्गार. फिल्ड मार्शल ग्नायजनाउलाही हा मान राजेसाहेबांनी दिला नव्हता.

मारीचे तर सर्वस्वच हरपले होते. मूलबाळ नसल्यामुळे कार्ल हेच तिचे सर्वस्व होते तिच्या दु:खाची कल्पना न केलेली बरी. तरीही ती आपल्या कर्तव्याला चुकली नाही. आपल्या पतीच्या लिखाणाच्या पाकिटांचे गठ्ठे तिने उपसले व त्याचे वाङ्मय पद्धतशीरपणे लावून ते प्रसिद्ध केले. तो वेळपावेतो क्लाउजवित्स कोणाला ज्ञात नव्हता असे नाही. नेपोलियनविरोधी लढायांत भाग घेऊन अनुभवसमृद्ध बनलेला जर्मन सेनाधिकारी, मंडळाचा एक बुद्धिमान सदस्य, प्रशियन सैन्याच्या पुनर्घटनेचा एक शिल्पकार व रणनीतीचा उचित आवाका असलेला लष्करी तज्ज्ञ म्हणून तो ज्ञात होता, पण केवळ प्रशियन लष्करातील छोट्या गटाला. मारीने त्याचे वाङ्मय प्रसिद्ध करून त्याला जागतिक कीर्ती प्राप्त करून दिली. एवढेच नव्हे, तर पुढील अनेक दशकांतील सेनापतींची मने त्याच्या ग्रंथाने जणू भारून टाकली.

१८३० सालापासून क्लाउजवित्स फ्रान्स- प्रशिया युद्धाची जणू वाट पहात होता. पण प्रत्यक्षात ते युद्ध झाले १८७० साली - म्हणजे ३९- ४० वर्षांनंतर. तथापि ते झाले तेव्हा

बव्हंश जर्मन सेनापती क्लाउजवित्सच्या शिष्यवर्गापैकी होते. ३०- ३१ साली फ्रँको-प्रशियन युद्ध झाले असते, तर क्लाउजवित्सच्या हाती जे लागले असते, त्यापेक्षा कितीतरी पट अधिक त्याने ७० साली मिळविले. बर्लिन लष्करी ॲकॅडमीचा तो संचालक होता, त्यावेळी २०- २२ वर्षाचा एक अधिकारी तेथे छात्र होता. क्लाउजवित्स हा इतरांप्रमाणेच सामान्यातच जमा होणारा अधिकारी आहे, असे त्याचे त्यावेळी मत झाले असणार. पण हेलमूथ फॉन मोल्टके प्रशियन सैन्याचा सरसेनापती बनला व १८७० साली फ्रान्सविरुद्ध त्याला चढाई करावी लागली, त्यावेळी तो क्लाउजवित्सचा कट्टर शिष्य बनला होता मायकेल हॉवर्ड हा लष्करी लेखक म्हणतो की, क्लाउजवित्सच्या तत्त्वांनुसारच १८७० सालचे फ्रँको- प्रशियन युद्ध लढले गेले.

मारीने क्लाउजवित्सचे सर्व लिखाण बाहेर काढले व ते तपासून सुसंगतपणे लावण्यास प्रारंभ केला. तिला तिचे बंधू हाइनरिश याने या कामी साहाय्य केले. जन. ग्रॉवेन व मेजर ओएत्सेल यांनीही मदत केली. ओएत्सेलने पुन्हा संशोधन करून नकाशे दुरुस्त केले. यामुळे ३० जून १८३२ मध्ये क्लाउजवित्सच्या लिखाणाचे पहिले खंड प्रकाशनासाठी सिद्ध झाले.

मारीने प्रस्तावनेत लिहिले: अशा प्रकारच्या लिखाणाच्या संपादनात एका महिलेचा हातभार लागला याचे लोकांना आश्चर्य वाटेल. पण माझ्या पतीचा हाच सततोद्योग होता. हे लिखाण पूर्ण व्हावे ही त्यांची इच्छा होती. पण ते प्रसिद्ध करण्याचे काम तुझे आहे, असे ते थट्टेने म्हणत. कदाचित मृत्यूची चाहूल त्यांना लागली असावी. आता त्यांच्या मृत्यूनंतर हे लिखाण प्रसिद्ध करणे माझे कर्तव्य बनले आहे.

मारीने दहा खंडांपैकी आठ खंड तयार केले. यापैकी पहिले तीन म्हणजे त्याचा सर्वोत्तम युद्धग्रंथ (ऑन वॉर). चौथा खंड नेपोलियनच्या १७९६- ९७ च्या इटॅलियन मोहिमेबद्दल; ५ व ६ हे खंड १७९९च्या नेपोलियनच्याच स्वित्झर्लंड व इटलीतील मोहिमांबद्दल, सातवा १८१२, १८१३ व १८१४ मधील शस्त्रसंधी होईपर्यंतच्या नेपोलियनच्या युद्धाबद्दल व आठवा १८१५ सालच्या वॉटर्लू मोहिमेबद्दल आहे. ९ व १० खंड नंतर प्रसिद्ध झाले, त्यांत निष्णात सेनापतींच्या मोहिमांचे विवेचन आहे. हे सेनापती म्हणजे गुस्तावस्ट अडॉल्फस, नुरेन व फ्रेड्रिक द ग्रेट. याखेरीज क्लाउजवित्सने आपला गुरू शॉर्नहॉर्स्ट याचे चरित्र, १८०६ सालपूर्वीचा प्रशियाचा इतिहास व काही राजकीय निबंधही लिहिले. या निबंधात अपवादात्मक वेगळेपण आढळते, असे तज्ज्ञांचे मत आहे.

क्लाउजवित्सच्या लिखाणाचा प्रारंभ मात्र १८०५ सालीच झाला. बर्लिनच्या लष्करी विद्यालयातून सर्वप्रथम येऊन तो उत्तीर्ण झाला. काही दिवसांनी शॉर्नहॉर्स्टने त्याची जर्मनीतील एका विख्यात लष्करी नियतकालिकाच्या संपादकाकडे शिफारस केली. त्या नियतकालिकात क्लाउजवित्सचा पहिला लेख प्रसिद्ध झाला. हा लेख हाइनरिश ब्युलोच्या सिद्धांतांना आव्हान देणारा होता. ब्युलो त्या काळी जर्मनीत नेपोलियनच्या युद्धपद्धतीचा

भाष्यकार मानला जाई, व त्याचे वाचक मोठ्या संख्येत होते. याच कालात जोमिनी नावाचा स्विस गृहस्थही मोठ्या प्रमाणावर लष्करी विषयांवर लिखाण करी. त्याने नेपोलियनबरोबर काम केले होते. त्याच्या लिखाणावरही क्लाउजवित्सने हल्ले चढविले.

'ऑन वॉर' या ग्रंथाखेरीज क्लाउजवित्सने जे लिखाण केले, ते बव्हंशी सावध व नि:पक्षपाती आहे, असे जाणकारांचे मत आहे. प्रशियाच्या विजयाचे वर्णन करताना तो उल्हसित झालेला दिसला, तरी लष्करी शास्त्र विकसित व्हावयाचे असेल, तर इतिहास अचूक हवा, असे त्याचे मत होते. त्याने आपल्या लिखाणात प्रशिया व प्रशियन यांच्यावर अनेकदा कोरडे ओढले आहेत. वॉटर्लू व वॉटर्लूपूर्व लढायांबद्दल लिहिताना त्याने प्रशियन सेनापती ज. ब्लूशर याच्या वर्तणुकीवरही कडक टीका केली आहे. ब्लूशरच्या बेडर शौर्यावर क्लाउजवित्स फिदा होता, हे येथे लक्षात ठेवावयास हवे.

आपल्या पतीचा अल्पवयातील मृत्यू व त्याच्या प्रचंड लिखाणाच्या संपादनाचे काम याचा मारीच्या प्रकृतीवर अनिष्ट परिणाम झाला: आठव्या खंडाचे संपादन करून तो प्रकाशनासाठी दिल्यानंतर तिची प्रकृती झपाट्याने खालावत गेली व २८ जानेवारी, १८३६ रोजी तिचे देहावसान झाले. ब्रेसलाऊ येथे पतीच्या थडग्याशेजारीच तिचे दफन करण्यात आले.

क्लाउजवित्सची प्रसिद्धी पसरत चालली होतीच. त्यातच प्रशियन सैन्याचे सामर्थ्य वाढत चालले व प्रशियन जनरल स्टाफ या संस्थेचा उदय झाला, तेव्हा हा क्लाउजवित्सच्या शिकवणुकीचा परिणाम असला पाहिजे, अशी हवा पसरली व त्याचे नाव युरोपात दुमदुमू लागले. प्रशियन सेनेच्या १८७० मधील फ्रान्सवरील विजयांनंतर तर त्याचे नाव जगभर झाले. सर्व पाश्चात्त्य देशांच्या लष्करी नि राजकीय वर्तुळांत त्याच्या युद्ध या ग्रंथाचे वाचन व चिंतन होऊ लागले. त्याच्या ग्रंथाच्या ब्रिटिश अनुवादक कर्नल एफ्. एन. मॉड याने आपल्या अनुवादाच्या प्रस्तावनेत लिहिले: युरोपमधील प्रत्येक देशाच्या कवायतीच्या नियमांचा मूलाधार क्लाउजवित्सचा हा ग्रंथ आहे. अपवाद केवळ इंग्लंडचा !

जर्मन सेनापती मोल्टकेने १८७०– ७१ साली फ्रान्सवर मिळविलेल्या दैदीप्यमान विजयामुळे क्लाउजवित्सच्या ग्रंथातील संदेशाबाबत मोठमोठ्या सेनापतींची जी समजूत झाली ती थोडक्यात अशी: सर्व राष्ट्रांनी प्रचंड सेनादले उभारून शत्रुसैन्याचा संपूर्ण नायनाट करण्यासाठी ती सदैव सिद्ध ठेवली पाहिजेत. फ्रेंच मार्शल फॉश हा पहिल्या युद्धाच्या प्रारंभी फ्रेंच व्यूहरचनेचा एक महत्त्वाचा शिल्पकार होता, तर युद्धाच्या अखेरच्या अवस्थेत तो दोस्त सेनेचा सर्वोच्च सेनापती होता. क्लाउजवित्सच्या तत्त्वज्ञानाचे सार म्हणून तो लिहितो: रक्त हे विजयाचे मूल्य आहे. एक तर तुम्ही रक्त ओतले पाहिजे किंवा युद्धाचा विचार सोडून दिला पाहिजे. फॉश पुढे लिहितो – यासाठी, आधुनिक युद्धाला एकच प्रतिपादन ठाऊक आहे. ते म्हणजे डावपेचात्मक वास्तव तथा लढाई. यासाठी विशाल व्यूहरचना कोणती तर सर्व

उपलब्ध सैन्य व शस्त्रसामुग्री एकत्र आणून या सर्वांना लढाईत लोटणे.

क्लाउजवित्सला आपल्या ग्रंथाबद्दल समाधान नव्हते. त्याची पत्नी मारी हिला त्याचे कागदपत्र तपासताना एक टिपण सापडले. त्यात तो म्हणतो: "सर्व प्रकरणे पुन्हा नीट तपासून, आधीच्या सिद्धांतांना अधिक पुरावे देऊन, मात्र पाल्हाळ काढून टाकून एकूण ग्रंथ सध्यापेक्षा छोटा व बांधीव करावा, अशी माझी इच्छा आहे." आपला ग्रंथ २-३ वर्षात विसरला जाऊ नये व या विषयात रस असणाऱ्याला तो पुन्हा वाचावासा वाटेल अशा प्रकारचा व्हावा, अशी माझी महत्त्वाकांक्षा आहे, असेही त्याने पुढे लिहिले आहे.

स्वत:च्या ग्रंथाविषयी लेखक अत्यंत विनम्र होता. मारीचा भाऊ हाइनरीश फॉन ब्रुहल याला जे टिपण सापडले, त्यात तो म्हणतो: "माझ्या पहिल्या सहा प्रकरणांची उत्तम प्रत आता झाली असली, तरी माझ्या दृष्टीने ते साधनसामुग्रीचे एकत्रीकरण आहे. त्याला योग्य आकार नाही व म्हणून ते दुरुस्त करून पुन्हा लिहिले पाहिजे."

याच ओघात तो पुढे लिहितो : "माझ्या मृत्यूमुळे ग्रंथलेखनात खंड पडला, तर जो ग्रंथ उरेल त्याला निश्चित स्वरूप न दिलेल्या कल्पना असे म्हणावे लागले. मात्र त्यामध्ये गैरसमजाला भरपूर वाव असल्यामुळे त्यावर नाना प्रकारची टीका झाल्यावाचून राहाणार नाही."

क्लाउजवित्सची आपल्या ग्रंथाबद्दल काहीही कल्पना असो, त्याचा 'ऑन वॉर' हा ग्रंथ साऱ्या जगात एक अभिजात ग्रंथ म्हणून सर्वमान्य झाला आहे. मॅकिअॅवेलीचा 'द प्रिन्स', फ्रॅन्सिस बेकनचा 'द फिलॉसॉफी ऑफ सायन्स', अॅडॅम स्मिथचा 'द वेल्थ ऑफ नेशन्स', डार्विनचा 'द ओरिजिन ऑफ स्पीशिज', आणि कार्ल मार्क्सचा 'दास कॅपिटाल' या अभिजात वैचारिक ग्रंथाच्या पंक्तीत 'ऑन वॉर' हा ग्रंथही बसविला जातो.

( 'क्लाउजवित्सची युद्धमीमांसा' या दि. वि. गोखले यांच्या मॅजेस्टिक प्रकाशन या संस्थेतर्फे प्रसिद्ध होणाऱ्या ग्रंथातील काही भाग. )

---

# स्त्रीला हवे असते काय ?

# सवंगडी शोधण्याच्या क्रियेची मूलतत्त्वे-त्याचे डावपेच

– प्रतिभा टिल्लू

(Origins of mating behaviour)

The evolution of Desire srategies of human mating

— David M. Buss

निसर्गाशी आणि एकमेकांशीही एकमेळाने राहणारे लोक कुठेतरी आहेत ही कल्पना आपण कधीच सोडून दिली नाही. पाश्चिमात्य संस्कृतीचा भ्रष्ट करणारा पगडा आपल्यावर नसेल तर आपणही कदाचित तेच करू. **—मेलविन कोन्नर**

**अविचारी का जगावे?**

(Why the reckless survive)

माणसाच्या सवंगडी मिळवण्याच्या क्रियेची आपल्याला गंमत वाटते, गावगप्पा चटकदार होतात, पण त्याचवेळी ती आपल्याला अस्वस्थ करून टाकते. माणसाच्या दुसऱ्या कुठल्याही हालचालींसंबंधी कुठल्याही संस्कृतीत इतक्या चर्चा, इतके कायदे, इतकी कर्मकांडे केली जात नाहीत. जोडीदार शोधण्याच्या क्रियेच्या महत्त्वाच्या घटकाशी समजूत फारकत घेते. कधीकधी जोडीदार शोधताना, स्त्रीपुरुष शारीरिक आणि मानसिक पीडा देणाऱ्या जोडीदाराचीच निवड करताना आढळतात. जोडीदाराला आकर्षित करण्याचे प्रयत्न बरचेदा विपरीत परिणाम करतात. जोड्यांमध्ये वादंग भडकतात व दोषारोप, निराशा, मनोभंग इत्यादींनी गाडी उताराला लागते. जन्माच्या सोबतीच्या आणाभाका असूनही निम्म्याहून अधिक जोडप्यांचा घटस्फोट होतो.

दु:ख, फसवणूक आणि नुकसानी एका बाजूला आणि काल्पनिक हळूवार प्रेम दुसऱ्या बाजूला अशी स्थिती होते. 'सच्चा प्रेमाच्या' कथा ऐकत आम्ही मोठे होतो आणि आमचा निष्ठावंत असा 'एकुलता एक सहचर' शोधायला सुरुवात करतो. एकदा का तो सापडला की आपण त्याच्याशी आनंदाने लग्न करू आणि 'नांदू सौख्यभरे' असे आपण मानतो. पण वास्तव आणि आपल्या श्रद्धा ह्यात जमीन अस्मानाचे अंतर असते. घटस्फोटाच्या टक्केवारीवर ओझरती नजर टाकली तरी ३० ते ६० टक्के घटना ह्या विवाहबाह्यसंबंध, मत्सर संताप ह्यांच्या उद्रेकाने घडलेल्या आढळतात. आणि मग बऱ्याचशा जोड्यांचा भ्रमनिरास झालेला दिसून येतो.

जोडीच्या नात्यातल्या अपयशाचे चिन्ह म्हणजे बेबनाव आणि फारकत. ह्या गोष्टी म्हणजे वैवाहिक आयुष्यातली विकृती आणि विपरीत स्थिती. व्यक्तिगत कमतरता, असंमजसपणा, मंदबुद्धी, इच्छाशक्तीचा अभाव किंवा दूरदृष्टीचा अभाव जोडीदार शोधताना होता एवढेच आपल्याला समजते. पण हा विचारच पूर्णपणे चुकीचा आहे. जोडीदारांची भांडणे हा अपवाद नव्हे, नियमच आहे. स्त्रीने नाकारल्यामुळे पुरुषाचा होणारा संताप किंवा घरसंसारात मदत न करणाऱ्या पुरुषामुळे स्त्रीच्या पदरी आलेली दारुण निराशा ह्या दोन टोकांमध्ये तो सामावलेला आहे. सोपा खुलासा करायचा असेल तर अशी विपर्यस्त विधाने त्रासदायक ठरतात. भांडणात मनुष्य स्वभावाबद्दल अधिक खोल, दूरगामी असे काही तरी गुंतलेले असते. ज्याचे आपणास पूर्ण आकलन होत नाही. माणसाच्या जीवनातील प्रेमाच्या मध्यवर्ती भूमिकेमुळे हा प्रश्न अधिक अवघड बनतो. प्रेमाचा अनुभव घेत असताना त्या जादूने आपण भारून जातो आणि त्यात आपण बुडालेले नसतो तेव्हा आपल्या कल्पनाशक्तीचे वारू स्वैर उधळलेले असतात. काव्य, संगीत, साहित्य, आकाशवाणी श्रुतिका, प्रणयकथा ह्यातून प्रेमापासून निर्माण झालेल्या दु:खाचे पूर वहात असतात. त्या ठिकाणी दुसरी कोणतीही भावना नसते. पाश्चिमात्य सुखासीन वर्गाला वाटतं की प्रेम ह्या भावनेचा शोध त्यानीच लावला. खरं तर प्रेम ही गोष्ट पुरातनच आहे. सगळ्या प्राचीन संस्कृतीतल्या लोकांनी त्याचा अनुभव घेतलेला आहे. आणि त्यासाठी खास शब्द निर्माण केलेले आहेत. प्रेमाच्या ह्या व्यापकपणामुळे आपल्याला त्याच्या आणाभाका, नजाकत, वासना यासह प्रेम हे मानवी आयुष्यात अटळ आहे हे अधिक चांगल्याप्रकारे जाणता येते. मानवी जीवनातला विरोधाभास आपल्याला समजला नाही तर सामाजिक आणि वैज्ञानिक अशा दोन्ही दृष्टीनी तो आपल्याला महाग पडेल. प्रेमासाठी आसुसून आणि हे नातेसंबंध जुळावेत म्हणून माणूस आपल्या आयुष्याची महत्त्वाची वर्षे जोडीदारासाठी फुकट का घालवतो हा अवघड प्रश्न विज्ञानाच्या अपुरेपणामुळे अनुत्तरिच राहातो. सामाजिक दृष्ट्या– जोडीदाराचे वागणे घरीदारी जेव्हा क्रूर किंवा चमत्कारिक होते तेव्हा ह्या विषयातल्या आपल्याच अज्ञानामुळे आपण निराश होतो, हताश होतो, मूक वेदना सोशित राहातो.

अत्यंत गाढ प्रेम आणि अत्यंत जवळिकीचे संबंध ह्यात वादंग कसे निर्माण होतात. ह्याचा शोध घ्यायला हवा. आपली स्वप्ने आणि सत्य ह्यांची सांधेजोड करावी लागेल. स्वप्ने जुळवून घ्यावी लागतील. ज्या भूतकाळात आपल्या मनाची व शरीराची घडण झाली, जोडीदार शोधण्याची आणि टिकून राहाण्याची योजना आखली गेली त्या विकासाच्या प्रवास काळाकडे दृष्टी टाकली तरच हा विरोध आपल्याला उलगडेल.

शंभर वर्षापूर्वी चार्ल्स डार्विनने समागमाचे गूढ उकलणारे क्रांतिकारी विवरण देऊ केले होते. स्वत:चे अस्तित्वच धोक्यात आणू शकतील अशा प्रकारची गुणवैशिष्ट्ये प्राण्यांनी विकसित केलेली होती. ती पाहून डार्विन कोड्यात पडला होता. त्याची जिज्ञासा जागृत झाली



अनुक्रमणिका

होती. पंखाचे प्रशस्त पिसारे, काळविटांची लांबचलांब शिंगे, प्राण्यांचे सर्वच प्रदर्शनीय अवयव हे सर्वच टिकून रहाण्याच्या दृष्टीने महाग पडणारेच आहेत. शिकाऱ्याला आवतण देणारे म्हणजेच मृत्यूलाच बोलावणे धाडणारे हे मोरांचे मोठाले पिसारे टिकले कसे आणि एकजात सगळ्याच मोरांजवळ राहिले कसे ह्याचे त्याला आश्चर्यच वाटत राहिले. उत्तरादाखल डार्विन म्हणतो की मोराचे पिसारा हलवून नाचणे त्याच्या प्रजोत्पादनासाठी आवश्यक आहे. वांछित मादीच्या प्राप्तीसाठी, इतर मोरांबरोबरच्या स्पर्धेत टिकून राहाण्यासाठी आणि मोराची आनुवंशिक वैशिष्ट्ये टिकवून धरणारे पुनरुत्पादन करण्यासाठी मोर ह्या पिसाऱ्याचा उपयोग करतो. गुणधर्माची उत्क्रान्ती टिकून राहाण्याच्या उपयुक्तेपेक्षा पुनरुत्पादनाच्या उपयुक्ततेसाठी अधिक होते. म्हणून तिला लैंगिक निवड म्हणतात.

डार्विनच्या मते लैंगिक निवड दोन स्वरूपात होते. एका प्रकारात एकलिंगी प्राणी आपापसात लढतात आणि जेता दुसऱ्या लिंग प्रकारच्या प्राण्यांचा लैंगिक सर्वेसर्वा असतो. एकमेकांवर शिंगे रोखून लढण्याच्या पावित्र्यात असलेले काळवीट हे त्याचे वैशिष्ट्यपूर्ण उदाहरण आहे. ह्या प्रकारच्या स्पर्धेत यश मिळवून देणारी वैशिष्ट्ये ताकद, बुद्धीमत्ता किंवा दुसऱ्याला आकर्षित करण्याचा गुण हे उत्क्रान्त होतात कारण जेते अधिकवेळा समागम करू शकतात आणि आपली गुणसूत्रे अधिक्याने प्रसारित करू शकतात. हा झाला एक प्रकार. दुसऱ्या प्रकारात एक विशिष्ट लिंगी प्राणी एखाद्या विशिष्ट गुणासाठी सहचराची निवड करतात. त्यामुळे हे गुण असलेल्यांना अधिक वेळा समागमासाठी निवडले जाते व स्वाभाविकच त्याची गुणसूत्रे जोमाने विस्तारित होतात. हे विशिष्ट गुण नसलेल्या प्राण्यांना वगळले जाते, त्यांचा वंश नाहीसा होतो. चमचमणारा पिसारा असलेल्या मोरांचीच निवड लांडोरी करतात आणि अनाकर्षक पिसारा असलेले मोर ह्या उत्क्रान्तीच्या धुरोळ्यात केव्हाच नाहीसे होतात. आज मोरांना सुंदर पिसारा आहे कारण उत्क्रान्तीच्या इतिहासात लांडोरीनी फक्त चमकदार आणि रंगीबेरंगी पिसाऱ्याच्या मोरांनाच जवळ केले आहे.

लैंगिकतेसंबंधी डार्विनचा सिद्धान्त दोन मार्गदर्शक तत्त्वांनुसार मांडला जातो. – जोडीदाराची निवड आणि जोडीदारासाठी स्पर्धा. उत्क्रान्तीमधले टप्पे ह्या दोन गोष्टींवर अवलंबून आहेत. जी मादी ह्या सगळ्या प्रकारात निष्क्रिय राहाते त्या मादीलाच ह्यात निवडीचे स्वातंत्र्य अधिक आहे म्हणून हा सिद्धान्त पुरुष शास्त्रज्ञांनी वर्षानुवर्षे जोरदारपणे नाकारला. आणखी एका कारणासाठीही प्रचलित मत प्रवाहाबरोबर जाणाऱ्या शास्त्रज्ञांनी हा सिद्धान्त नाकारला. मनुष्य स्वभावाचा लवचिकपणा आणि अतुलनीयता ह्यांचे महत्त्व कमी करून मनुष्य स्वभाव सहज प्रवृत्तींवर अवलंबून असतो अशा प्रकारचे चित्रण ह्या सिद्धान्तामध्ये केले गेलेले होते. संस्कृती आणि जाणिवा ह्यामुळे आपण ह्या उत्क्रान्तीच्या रेट्यातून मोकळे राहातो. १९७० च्या उत्तरार्धात आणि १९८० च्या सुरुवातीला लैंगिक निवडीचा हा सिद्धान्त उपयोगात आणला जाऊ लागला. मी आणि माझे सहकारी ह्यांनी

मानसशास्त्र व मानववंशशास्त्र ह्या क्षेत्रात तात्विक चर्चेच्या स्वरूपात ही सुरुवात केली. जोडीदार शोधण्यासाठी स्त्रीपुरुषांनी योजलेले डावपेच आणि माणसाची तरल लवचिकता ह्यांचे स्पष्टीकरण देण्याचा प्रयत्न करणाऱ्या ह्या यंत्रणेची, उत्क्रान्तीमधून निर्माण झालेल्या मानसशास्त्रीय अंत:स्त्रोतांची ओळख पटवून घ्यायचा आम्ही प्रयत्न केला. ह्या नव्या पद्धतीला उत्क्रान्तीचे मानसशास्त्र म्हणतात.

मी जेव्हा ह्या क्षेत्रात काम सुरू केले तेव्हा माणसाच्या प्रत्यक्ष सवंगडी शोधण्याच्या वर्तणुकीबद्दल फारच थोडे ज्ञात होते. जनसंख्येच्या तुलनेत शास्त्रीय पुराव्यांच्या बाबतीत अगदी नैराश्यपूर्ण दुरवस्था होती. उत्क्रान्तीचे महत्त्वाचे सिद्धान्त सांगणारा कोणताही दस्तऐवज वैज्ञानिक पद्धतीने सिद्ध केलेला नव्हता. समागमाच्या काही इच्छा ह्या सार्वत्रिक स्वरूपाच्या आहेत का? हे कोणालाच माहीत नव्हते. काही खास लक्षणे ह्या वेगवेगळ्या संस्कृतीमधल्या लोकांमध्ये होती की वेगवेगळ्या संस्कृती ह्या निवडीमागे प्रभावशाली ठरत होत्या? समागमाची मानवी वर्तणूक ही उत्क्रान्तीच्या तत्त्वाप्रमाणे चालते का ह्याची सखोल पहाणी करण्यासाठी मी जुन्या मानसशास्त्रीय पद्धती सोडून दिल्या. अगदी सुरुवातीला मला फक्त हेच तपासायचे होते की समागमाच्या ह्या भावनेमागे उत्क्रान्तीतून आलेल्या काही सहज प्रवृत्तीच प्रचलित आहेत का? उदाहरणादाखल असे की पुरुष 'यौवन' आणि 'शारीरिक सौंदर्य' ह्याच सहचराच्या गोष्टींना महत्त्व देतो का? उलट स्त्री फक्त पुरुषाच्या 'सामाजिक दर्जा' आणि 'आर्थिक सुस्थिती' ह्यानांच महत्त्व देते का? हे इप्सित मनात ठेवून मी अमेरिकेतील १८६ विवाहित प्रौढांच्या आणि १०० अविवाहित कॉलेज युवकांच्या मुलाखती घेतल्या.

पुढची पायरी म्हणजे या अभ्यासाने जे मानसशास्त्रीय तत्त्वज्ञान खुले झाले आहे ते म्हणजे आमच्या मनुष्यप्राणी वर्गाचा गुणधर्म आहे का हे तपासून पहाणे. समागमाची इच्छा आणि मनुष्याच्या इतर प्रवृत्ती ह्या जर उत्क्रान्तीमधून निर्माण झालेल्या असतील तर फक्त अमेरिकेतच नव्हेत तर सार्वत्रिक स्वरूपात त्या सापडायला हव्यात. म्हणून अन्य संस्कृतीमध्ये सवंगडी कसे निवडले जातात हे शोधून काढण्यासाठी मी आंतरराष्ट्रीय स्वरूपाची पाहाणी केली. सुरुवातीला या पहाणीमध्ये काही युरोपिअन देश जर्मनी व नेदरलँडसह होते. पण लवकरच माझ्या लक्षात आले की युरोपियन संस्कृतींमध्ये बरेचसे घटक समान असू शकतात. त्यामुळे ते उत्क्रान्तीच्या मानसशास्त्रीय तत्त्वांबदल अचूक पडताळा देऊ शकणार नाहीत. अधिक विस्तृत अभ्यासाच्या हेतून मी पुढल्या पाच वर्षांच्या काळात सदतीस संस्कृतींमधील, ऑस्ट्रेलिया ते झांबिया या सहा खंडातले व पाच द्वीपकल्पांवरचे असे एकूण पन्नास सहकारी घेतले. या माझ्या स्थानिक सहकाऱ्यांनी त्यांच्या त्यांच्या देशी भाषेत समागमाच्या इच्छेसंबंधीच्या प्रश्नावल्यांचे आयोजन केले. आम्ही मोठ्यामोठ्या शहरांची नमुना पहाणी केली. उदा. ब्राझीलमधले, रिओ– द– जानिरिओ आणि साओपावली, चीनमधले

शांधाय, भारतातले बंगलोर आणि अहमदाबाद, इस्त्रायलमधले जेरुसालेम आणि तेलअवीब आणि इराणमधील तेहरान. ह्या शहरी लोकांप्रमाणेच आम्ही खेडुतांचेही मत अजमावले – गुजरात राज्यातले भारतीय आणि दक्षिण आफ्रिकेतले झुलू. तसेच उच्चशिक्षित व अशिक्षित ह्या दोहोंनाही समाविष्ट केले. वय वर्षे चौदा ते सत्तरपर्यंतच्या सगळ्या प्रतिक्रियांचा समावेश केला. भांडवलदारी, साम्यवादी, समाजवादी अशा वेगवेगळ्या राजकीय प्रणाली असणाऱ्या देशांचाही ह्यात समावेश केला. सगळ्या महत्त्वाच्या जातीय, धार्मिक आणि वांशिक समुदायांना प्रतिनिधित्व दिले. थोडक्यात संपूर्ण जगभरातून जवळजवळ १०,०४७ लोकांची आम्ही पहाणी केली.

स्त्रीपुरुष समागमाच्या इच्छेचा अभ्यास करणारा, यापूर्वी क्वचितच हाती घेतलेला एवढा प्रचंड अभ्यास म्हणजे केवळ सुरुवात होती. हे संशोधन माणसाच्या सहजीवनाशी सगळ्या अंगाने निगडित होते. एकमेकांना ठरवून भेटणे, विवाह, विवाहबाह्यसंबंध आणि घटस्फोट. सध्याच्या ज्वलंत सामाजिक प्रश्नांशी म्हणजेच लैंगिक छळ, घरगुती गैरवर्तन, बीभत्स विकृत वाङ्मय आणि पैतृकसत्ता पद्धती इत्यादींशी ते जुळणारे आहेत. सहजीवनाचे जेवढे म्हणून पैलू आहेत ते कळावेत म्हणून मी नव्या पत्रास योजना सुरू केल्या आणि त्यात हजारो लोक गुंतविले. ह्या अभ्यासात व्यायामशाळेत जोर बैठका काढताना जोडीदार शोधणाऱ्या, कॉलेजच्या आवारात जोडीदार शोधणाऱ्या, वेगवेगळ्या वयात डेटिंग करणाऱ्या, लग्नाला पाच वर्षेच होत असलेल्या जोडप्यांचा, घटस्फोट घेऊन विभक्त झालेल्या जोडप्यांचा, अशा सगळ्या प्रकारच्या स्त्रीपुरुषांचा समावेश होता.

ह्या सगळ्या अभ्यासाचे निष्कर्ष परस्परविरोधी होते आणि म्हणून ते माझ्या सहाकाऱ्यांना संभ्रमात टाकणारेच ठरले. बऱ्याच वेळा हे निष्कर्ष परंपरागत विचारपद्धतींना धक्कादायक होते. स्त्रीपुरुष समागमाच्या प्रस्थापित मानसशास्त्रीय समजुतींपेक्षा हे निष्कर्ष अगदीच वेगळे होते. काल्पनिक सिद्धान्त, जुनाट वैज्ञानिक सिद्धान्त ह्यांच्यावर विसंबून न रहाता ह्या नव्या शास्त्रीय पद्धतीने मिळविलेल्या पुराव्यांच्या आधारे ह्या भिन्न स्वरूपाच्या मतांमधून मानवी समागमाचा एक सुसूत्र सिद्धान्त मांडण्याचा माझा प्रयत्न हे ह्या माझ्या प्रयत्नांचे एक उद्दिष्ट आहे. समागमाबद्दल जे मला गवसले ते तितकेसे चांगले-नाही. लैंगिक सुखासाठी जी भयानक धडपड चालते ती पाहून मी थक्क झालो. याच सुखासाठी माणसे आपल्या शत्रूची नालस्ती करतात. विरुद्ध लिंगी माणसाची फसवणूक करतात आणि अगदी स्वत:च्या सहचरालाही कमी लेखतात. ही माहिती मला अस्वस्थ करणारी आहे. समागमामध्ये चढाओढ, भांडणे, लबाडी, लपवाछपवी ह्या गोष्टी नसतील तर ते मला जास्त आवडेल. पण शास्त्रज्ञाला आवडत नाहीत म्हणून संशोधनाची साधने बाजूला सारता येत नाहीत. असे असले तरी मानवी समागमाच्या अस्वस्थ करणाऱ्या बाजूला सामोरे जाऊनच त्याचे कठोर परिणाम थोडे तरी सह्य केलेच पाहिजेत.

**लैंगिक डावपेच**

डावपेच म्हणजे ध्येय साध्य होण्यासाठी अवलंबाव्या लागणाऱ्या पद्धती किंवा प्रश्न सोडविण्याचा एक मार्ग ! मानवी समागम, अद्भुतता, स्त्रीपुरुष प्रेम ह्या गोष्टींमध्ये डावपेच अंगभूतच आहेत असे मानणे हे थोडेस चमत्कारिक वाटेल. पण आपण सहचराची निवड अशी पटकन करीत नाही. सवंगड्याला आकर्षित करताना आपण उतावळेपणाही करीत नाही. कंटाळा आला आहे एवढ्याकरिता आपण आपल्या स्पर्धकाची मानहानी करीत नाही. सवंगडी शोधण्याची क्रिया ही एक डावपेचाचीच क्रिया आहे आणि आमचे डावपेच हे यशस्वी समागमामध्ये येणारे अडथळे दूर करण्यासाठीच आहेत. लोक हे अडथळे कसे दूर करतात हे जाणून घ्यायचे असेल तर लैंगिक डावपेचांचे विश्लेषण आपणास करता यायला हवे. समागमाच्या रणक्षेत्रावर टिकून राहायचे असेल तर हे डावपेच फारच महत्त्वाचे आहेत.

अस्तित्व टिकवून धरणे आणि पुनरुत्पादन करणे ह्या दोन प्रश्नांच्या उत्तरादाखल बदलत्या परिस्थितीशी जुळवून घेणारी लवचिकता विकसित करणे हा एकच मार्ग आहे. विकासाच्या हजारो वर्षांच्या प्रवासात निसर्गानेच आपल्या शरीरात भुकेची यंत्रणा निर्माण केली. शरीराच्या घटकांना पोषक द्रव्ये पुरवणारी ही यंत्रणा आहे. सायसाखरेची चव जिभेच्या रूचिग्रंथीना समजल्यामुळे काय खावे ह्याची जाणीव आली. (शेंगा आणि बोरं तोंडात टाकावीत पण घाणमाती तोंडात घालू नये). घर्मेंद्रिये आणि शिरशिरी येणे ह्यामुळे अतिउष्ण अतिशीत हवामानात शरीराची काळजी घेतली जाते. लुटारूंशी किंवा आक्रमकाशी हाणामारी करावी की चक्क पळून जावे ह्या प्रेरणा भीती आणि राग ह्या मानवी भावनांमुळे मिळतात. शरीरात निर्माण होणारे रोग आणि बांडगुळे (Parasite) झगडा करणारी अतिशय गुंतागुंतीची ही रोग प्रतिबंधक शक्ती निर्माण झाली. नैसर्गिक विरोधामुळे अस्तित्वावरच घाला ठरणाऱ्या संकटाना तोंड देण्यासाठी ह्या जुळवाजुळवी हा माणसाने काढलेला मार्ग आहे– टिकून रहाण्यासाठीच्या तडजोडी. ज्यांना हे योग्य गुणधर्म विकसित करता आले नाहीत ते जगूच शकले नाहीत.

वरील विवेचनाच्या संदर्भात, समागमाच्या संबंधींच्या समस्यांवर लैंगिक डावपेचांचा मार्ग स्वीकारावा लागतो. आमच्या विकास होत असलेल्या भूतकाळी जे सहचराबरोबर यशस्वीपणे जमवून घेऊ शकले नाहीत. ते आमचे पूर्वज बनले नाहीत. (त्यांना वारसच निर्माण झाला नाही) आजे, पणजे, खापरपणजे असे कैक पिढ्यांचे पूर्वज आपल्याला सगळ्यांनाच आहेत. पुनरुत्पादनाच्या हेतूने सहचराबरोबर ते योग्य काळ राहिले. प्रतिस्पर्ध्यांना दूर ठेवण्यात त्याना यश मिळाले. पुनरुत्पादनामध्ये अडथळे होऊ शकतील अशा सगळ्याच गोष्टींना त्यानी दूर सारले आणि अशा प्रकारे त्यानी यशस्वीपणे पुनरुत्पादन केले. ह्या यशोगाथांचा वारसा आमच्या धमन्यातून वहात आहे.



अनुक्रमणिका

आपली सहचरची गरज अशा प्रकारची आहे हे जाणून घेणे किंवा आपल्या स्पर्धका-बरोबर उत्तम लढत देणे ह्यासाठी डावपेचांची आखणी करावी लागते. खरे तर प्रत्येक विशिष्ट तडजोडीची समस्या सोडविण्यासाठी गरजेप्रमाणे प्रत्येक लैंगिक डावपेचाची बेतणी केली जाते. एखाद्या विशिष्ट जोडीदाराला प्राधान्य, प्रेमाची जाणीव, समागमाची इच्छा किंवा मत्सरभाव अशा प्रकारची मानसशास्त्रीय कारणे प्रत्येक लैंगिक डावपेचामागे असतात. बांधेसूदपणा, लैंगिक रुचीच्या खुणा, किंवा मूलभूत व्यभिचाराची, बेइमानीपणाची सूचना ह्या बाह्यजगातील संदर्भासंबंधी प्रत्येक मानसशास्त्रीय यंत्रणा ही संवेदनशील असते एवढेच नव्हे तर आमच्या स्वत:बद्दलच्या ह्या बातम्यांसंबंधीही ती जागरूक असते. उदा. ज्याला काही प्रमाणात तरी इच्छा आहे अशी दुसऱ्या सहचराला आकर्षित करू शकण्याची आपली कुवत किती आहे हे ही ह्या यंत्रणेला ठाऊक असते. समागमाच्या संदर्भात कोणत्या प्रकारच्या प्रश्नांना स्त्रीपुरुषांना सामोरे जावे लागले ह्यावर असलेले आवरणाचे थर खरवडून काढणे आणि ह्या प्रश्नांच्या सोडवणुकीसाठी, त्यातून मार्ग काढण्यासाठी त्यांनी जे गूढ असे लैंगिक डावपेच विकसित केले. परिस्थितीशी आपल्या अभ्यासासाठी जुळवून घेतले. त्याच्यावरचे पटल दूर करणे हा ह्या अभ्यासामागचा हेतू आहे.

समागमाच्या समस्या सोडविण्यासाठी 'लैंगिक डावपेच' हे जरी योग्य असे रूपक असले तरी ते दिशाभूल करणारे आहे कारण हे डावपेच जाणीवपूर्वक आखावे लागतात असे ह्यातून सूचित होते.

लैंगिक डावपेचांसाठी जाणीवपूर्वक योजनाबद्धता किंवा जागरुकता यांची गरज नसते. शरीराचे तपमान नीट राखण्यासाठी घर्मेंद्रिये ही एक योजना आहे. पण तपमान नियंत्रित राहाण्यासाठी योजनाबद्धता किंवा जागरुकता असावी लागत नाही. पियानो वाजविणाऱ्या स्त्रीला हाताची अचानक जाणीव झाली तर कदाचित तिच्या वादनात अडथळा येईल. लैंगिक डावपेच कर्त्याच्या जाणिवेशिवायच बरेचदा व्यवहारात वापरले जातात.

### सहचराची निवड

लोकांना सगळ्याच विरुद्ध लिंगी व्यक्तींबद्दल सारख्याच प्रमाणात आकर्षण वाटते असे कुठेही घडत नाही. सर्वत्र काही खास गुणी सवंगड्यांना प्राधान्य दिले जाते आणि इतरांना बाजूला सारले जाते. ज्याप्रमाणे इतर सर्व इच्छा वासना अस्तित्वात आल्या. अगदी तशाच लैंगिक इच्छासुद्धा निर्माण झाल्या. जगण्यासाठी कोणते अन्न खावे हाच प्रश्न लक्षात घेऊया. बेरी, फळे, शेंगा, मांस, धाण, माती, विषारी वनस्पती, डहाळ्या, विष्ठा ह्या व अशा अनेक पदार्थांपैकी पोटात काय जाऊ देणे इष्ट ठरेल हा माणसाच्या दृष्टीने अगदी यक्ष प्रश्नच होता. समजा आपल्याला चवीचे ज्ञानच नसते तर— अगदी योगायोगाने काहीजणांनी पक्क फळे, ताज्या शेंगा आणि प्रथिने व जीवनसत्वे पुरविणारे अन्न खाल्ले असते. बाकीच्यांनीही केवळ योगायोगानेच कुजलेले मांस, कुजकी फळे, आणि विषारी द्रव्ये पोटात

ढकलली असती. ज्यांनी सकस अन्न खाल्ले तेवढेच आपले पूर्वज शिल्लक राहिले.

आपल्या खाण्याच्या सवयी, आवडी ह्या विकासाचा घटनाक्रम सिद्ध करणाऱ्याच आहेत. आपण पिष्टमय, स्निग्ध, क्षारयुक्त, प्रथिनयुक्त पदार्थ अगदी चवीने खातो. उलटपक्षी कडू, आंबट आणि विषारी पदार्थांबाबत आपल्याला शिसारी येते. पण ह्या अन्नाच्या आवडी निवडीमुळे जिवंत राहाण्याचा, अस्तित्व टिकवून धरण्याचा मूळ कठीण प्रश्न सुटला आहे. ह्या आवडी निवडीमुळेच आपल्या पूर्वजांची परिस्थितीशी जुळवून घेण्याची अवघड समस्या सुटली आणि म्हणूनच आपण आजवर त्या अगदी तंतोतंत सांभाळून आहोत.

आपली जोडीदारासंबंधीची आवड निसर्गाशी जुळवून घेण्याच्या हेतूशी मिळतीजुळती असते; हे जरी खरे असले तरी त्या आवडी केवळ अस्तित्वासाठीच असत नाहीत. अग्नीपासून ऊब मिळवण्यासाठीची घडपड; कुटुंबियांसाठी शिकार मिळवण्याची धडपड; शेंगा, बोरे इ. फळे आणि वनस्पती गोळा करणे; आणि धोकादायक प्राणी आणि मानवीशत्रू यांपासून स्वसंरक्षण करणे – या पद्धती वापरून आपले पूर्वज कैक वर्षापूर्वीपासून कसे राहात आले आहेत याची कल्पना करता येते. समजा आपण सहचराची निवडच अशी केली की जो कबूल केलेली साधनसामुग्री, जीवनावश्यक वस्तू आणून देण्यात अपयशी ठरला, जो त्याचवेळी दुसरीकडे घरोबा करून होता, जो अत्यंत आळशी, कामचुकार होता, ज्याच्याकडे शिकारीचे कौशल्य नव्हते, किंवा जो मारहाण करीत होता; तर त्या सहचरामुळे आपले टिकून रहाण्याचे प्रमाण कमीकमी होत जाईल, आपले प्रजोत्पादनच धोक्यात येईल. ह्याच्या अगदी उलट ज्या जोडीदाराने भरपूर सामुग्री आणून दिली, आपले व आपल्या चिल्यापिल्याचे संरक्षण केले. आपल्या कुटुंबासाठी आपला वेळ, शक्ती आणि प्रयत्न खर्च केले तर ती फारच उत्तम गोष्ट ठरेल. आपल्या पूर्वजांनी जोडीदार निवडताना स्वत:च्या इच्छांचे भान ठेवून आणि शहाणपणाने निवड केली. ही निवड करताना ताकदीने जगण्याच्या आणि पुनरुत्पादनाच्या क्रियेचा विचार ज्यांनी केला त्याचे परिणाम आज दिसत आहेत. त्यांचे वारसदार म्हणून आपण आज त्यांच्याचसारख्या इच्छा जवळ बाळगून आहोत.

पुष्कळशा प्रजातींमध्ये सवंगड्याची निवड करण्याची पद्धत विकसित स्वरूपात असलेली दिसते. आफ्रिकन बाया हा पक्षी (weaver bird) हे त्याचे सुरेख उदाहरण ! ह्या बाया पक्ष्याला जेव्हा आजूबाजूला एखादी मादी आहे असे वाटते तेव्हा त्याच्या तिला आकर्षित करणाऱ्या हालचाली सुरू होतात. लगेच तो त्याने नवीन बांधलेल्या घरट्याकडे तिचे लक्ष वेधण्याचा आटोकाट प्रयत्न करतो. त्यासाठी तो 'खाली डोके वर पाय' करून स्वत:ला उलटे टांगून घ्यायलाही कमी करीत नाही. स्वत:चे पंख अत्यंत उत्साहाने हलवित रहातो. जर त्या परीक्षेत तो उतरला तरच मादी घरट्याजवळ येते, आत शिरते, घरट्यासाठी वापरलेले सामान नीट निरखून पहाते. जवळजवळ दहा मिनिटे ती त्या घरट्यात चोंची मारते आणि ते घरटे ओढूनही पहाते. ही सगळी पहाणी चालू असताना नर जवळपास राहून तिला

साद घालीत असतो. कोणत्याही क्षणी तिला असे वाटले की हे घरटे तिच्या गरजा भागविण्यासारखे नाही .तर त्याच क्षणी ती दुसऱ्या नराच्या घरट्याची तपासणी करायला चालती होते. ज्या नराचे घरटे अनेक माद्यांकडून नाकारले जाते, तो परत परत नवे घरटे बांधीत राहतो. उत्तम घरटे बांधण्याचे कौशल्य असलेल्या नरालाच पुनरुत्पादनासाठी स्वीकारून मादी तिच्या पुढे भविष्यात येऊ शकणारे संरक्षणाचे आणि पुरवठ्याचे प्रश्न इथेच सोडवून टाकते. इतर बाया पक्षी समोर येणाऱ्या कोणत्याही नराला जवळ करतात, फक्त अफ्रिकन बाया ह्या खास निवडीमुळे विकसित होत गेले.

'बाया' पक्षिणी प्रमाणे स्त्रियासुद्धा योग्य ते 'घरटे' असलेल्या पुरुषालाच प्राधान्य देतात. विकासाच्या इतिहासकाळात स्त्रियांना तोंड द्याव्या लागलेल्या समस्यांपैकी एकीचा विचार करू या. जो पुरुष दीर्घमुदतीसाठी हे नातेसंबंध जोडायला तयार होईल त्याचीच निवड करणे, एखादा माणूस जो पळपुट्या, लहरी, भटक्या, भ्रमरवृत्तीने बायकांच्या मागेमागे फिरणारा आणि चंचल मनोवृत्तीचा आहे, त्याला एखाद्या स्त्रीने सवंगडी म्हणून निवडले आणि मग ना त्याची कोणतीही मदत, ना संरक्षण, ना पैसा अशा अवस्थेत त्याच्यापासून झालेल्या मुलांना तिला एकटीला वाढवावे लागले; कदाचित दुसऱ्या पुरुषाने हे सगळे तिला दिलेही असते. अशा विश्वासू माणसाची निवड केली असती की जो बांधिलकी मानायला तयार आहे तर त्याची मुले जगण्याची आणि जोमाने वाढण्याची अधिक शक्यता होती. त्यामुळे जो पुरुष अशी बांधिलकी मानायला तयार होता आणि तशी त्याची कुवत आहे अशी चिन्हे दर्शवित होता अशा पुरुषाला निवडण्याची क्षमता स्त्रीमध्ये हजारो वर्षांपासून विकसित होत गेली-जशी बाया पक्षिणींमध्ये उत्तम घरटे बांधणाऱ्या नरालाच निवडण्याची ! अन्नाची आवडनिवड, रुची, अरुची ह्यामुळे अस्तित्वाचा महत्त्वाचा प्रश्न सुटला; ह्या प्राधान्य देण्याच्या पद्धतीमुळे प्रजोत्पादनाचा प्रश्नही सुटला.

पुरुषाला मात्र नेहमीच दीर्घमुदतीसाठी स्वत:ला बांधून घेणे हवे असते असे नाही. जराशी मजा, तात्पुरता व्यभिचार, एखादे लफडे हे काहीकाही वेळा स्त्रीपुरुष जाणूनबुजून मिळवतात. मात्र असे करताना आश्चर्यकारक वाटावे अशा त्यांच्या गरजा बदलतात. भागीदारी तात्पुरती की कायमची ह्यावर हा महत्त्वाचा निर्णय अवलंबून असतो आणि हा निर्णय हीच लैंगिक डावपेचांची मुद्याची गोष्ट असते.

**या विवेचनात पुढील गोष्टींचा दस्तऐवज असेल –**

(१) सगळ्या जगभर सवंगड्यांची निवड करताना विशिष्ट गुणधर्मासाठी जे महत्त्व स्त्रीपुरुष दर्शवितात ते गुणधर्म,

(२) प्रत्येक लिंगाच्या वेगवेगळ्या आवडीमागचे विकासाचे तर्कशास्त्र आणि

(३) सहज लैंगिक संबंधांकडून बांधिलकीने सवंगड्यांशी नाते संबंध जुळवायचा ठरवल्यावर काय बदल होतात, ते बदल.

**सवंगड्याला आकर्षिणे**

जोडीदाराची अपेक्षा पूर्ण करू शकणारे गुणधर्म ज्या माणसांकडे असतील त्या माणसांना खूपच मागणी असते. एखाद्या खोलगट घळीत असलेले बेरीचे झुडूप हेरगिरी करून शोधणे हे प्रत्यक्ष बेरी खाण्यासाठी पुरेसे नाही. त्याप्रमाणे ह्या गुणधर्माचे नुसते कौतुक जोडीदार मिळवायला पुरेसे ठरत नाही. मनोवांछित जोडीदार मिळविण्यासाठी स्पर्धा जिंकणे ही पुढची पायरी आहे. समागमाच्या काळात, समोरासमोर लढत देऊन प्रतिस्पर्ध्याला नामोहरम करण्यासाठी कॅलिफोर्नियाच्या किनाऱ्यावरील समुद्रहत्ती आपले तीक्ष्ण सुळे वापरतात. बरेचदा त्यांचा हा तंटाबखेडा आणि गुरगुराट अहर्निश चालू असतो. ह्या क्रूर स्पर्धेचे बळी ठरलेल्या गलितगात्र पराभूतांना ह्या किनाऱ्यावर ओरखडे आणि जखमा घेऊनच वावरावे लागते. मात्र हे त्याचे काम इथे संपत नाही. त्याच्या जनानखान्यात दाखल झालेल्या डझनाहून अधिक संख्येने असलेल्या माद्यांच्या संपूर्ण क्षेत्रावर त्याला चक्कर मारावीच लागते. पुनरुत्पत्तीच्या चक्रामध्ये असलेले त्याचे हे महत्त्वाचे स्थान टिकवून धरण्यासाठी चुकार माद्यांना कळपात परत आणणे आणि समागम करण्याचा चोरटा प्रयत्न करणाऱ्या इतर नरांना त्यापासून परावृत्त करणे; हे ही त्याला करावे लागते.

कैक पिढ्यांपासून अधिक मजबूत, अधिक धिप्पाड आणि जास्तच लबाड असलेल्या नर समुद्रहत्तींनाच जोडीदारीण मिळवण्यात यश आले आहे. धिप्पाड, आक्रमक नरांनी प्रजोत्पादनाची ही क्रिया स्वत:च्या ताब्यात घेतली आणि स्वत:ची ही वैशिष्ट्यपूर्ण गुणसूत्रे पुढच्या पिढीला बहाल केली. आज प्रत्यक्षात असे दिसते आहे की नरसमुद्रहत्तींचे वजन ४००० पौंड म्हणजेच मादीच्या वजनाच्या चौपट आहे. अभ्यासकांना तर असे भय वाटते प्रत्यक्ष लैंगिक संबंधात ह्या वजनामुळे मादी चिरडून देखील जाईल.

असे असूनही मादी हत्तीण जेत्यांबरोबरच राहाणे पसंत करते आणि ही स्वत:ची गुणसूत्रेच आपल्या मुलींकडेही पाठवते. अर्थातच धिप्पाड, मजबूत जेते निवडल्यामुळे तिचे मुलगेही आकार आणि ताकद ह्याबाबतीतली नराची गुणसूत्रे घेऊन जन्माला येतात. ५टक्के नर ५५टक्के माद्यांवर पहिल्यापासूनच अधिकार गाजवीत आले आहेत. हे निवडीचे दबावतंत्र अगदी आजही चालू आहे. लहानखुरे, अशक्त, बुजरे नर मादी मिळवूच शकत नाहीत आणि विकासाच्या गतीत ते कुठच्या कुठेच नाहीसे होतात.

फक्त इतर नरांचा पराभव करून समुद्रहत्तींचा मार्ग मोकळा होत नाही. त्यांची निवड मादीच्या हाती असते. एखादा लहानसा नर जर जुगण्याचा प्रयत्न करीत असेल तर मादी आरडाओरड सुरू करते. सावध झालेला जेता लगेच असेल तिथून झेपावत येतो, धमकावणीच्या सुरात त्याच्यामागे डोके पुढे करून धावत जातो, आपली रूंद छाती फुलवतो. बहुतेक वेळेला हे एवढेच लहानशा नराला पुरेसे होते व तो काढता पाय घेतो. नरांच्या स्पर्धेमागे मादी करीत असलेली नराची निवड हे एक प्रमुख कारण आहे. माद्यांना जर लहानसा नर चालत असेल

तर त्या आरडाओरडा करून ताकदवान नराला सावधच करणार नाहीत. अर्थात निवडीचा प्रश्नच उरणार नाही. थोडक्यात मादीची आवड हे नरांच्या भांडणाचे मूळ कारण ठरते.

जोडीदार शोधतांना माणसाचे वागणे समुद्रहत्तींसारखे असत नाही. उदाहरणार्थ – ५ टक्के समुद्रहत्ती ८५ टक्के माद्यांवर हक्क गाजवतात. पण ९० टक्के हून अधिक पुरुषांना आयुष्यात केव्हा ना केव्हा जोडीदारीण मिळवता येते. समुद्रहत्ती माद्यांच्या जनानखान्यावर हुकूमत चालविण्यासाठी फार धडपड करतात; त्यामानाने हा एकाधिकार एखाद दुसऱ्या हंगामापुरताच मर्यादित असतो. माणसांच्या बाबतीत हा संबंध वर्षानुवर्षे टिकून राहिलेला दिसतो. समुद्रहत्ती व पुरुष ह्या दोघांमध्ये एकच गोष्ट समान आहे ती म्हणजे त्यांना मादीला / स्त्रीला आकर्षित करण्यासाठी स्पर्धेला तोंड द्यावे लागते. ज्या पुरुषाला हे जमत नाही त्याला हुसकावले जाते.

प्राणीजगतामध्ये जोडीदार मिळवण्यासाठी नरांना माद्यांपेक्षा प्रखर स्पर्धेला तोंड द्यावे लागते. काही प्रजातींमध्ये नर हे फुशारकी मारणारे, कर्कश आवाज करणारे, मोठ्ठा आव आणून रुबाब करणारे असे असतात. माद्यांमधील स्पर्धासुद्धा काहीकाही प्रजातींमध्ये अशीच तीव्र असते. पटास (Patas) जातीची माकडे आणि गेलाडा (gelada) बबून्स ह्या जातीतल्या माद्या इतर माद्यांना व नरांना जुगण्याच्या काळात भरपूर छळतात. जंगली रायसस (Rhesas) जातीच्या माकडिणी हवा असणाऱ्या नराला मिळवण्यासाठी तो दुसऱ्या मादीबरोबर असताना आक्रमक होऊन हल्ला करतात. सावाना (Savana) बबून्स माद्या फक्त लैंगिक गरजेसाठी नव्हे तर शारिरीक संरक्षण मिळावे म्हणून नराशी दीर्घकालीन संबंध जोडण्यासाठी ह्या स्पर्धेत उतरत असतात.

पुरुषांच्या स्पर्धेइतकी स्त्रियांची स्पर्धा चटपटीत नसली, किंवा तीव्रही नसली तरी ती सगळ्या मानवजातीच्या समागमाच्या पद्धतीवर आपला प्रभाव टाकून आहे. एच. एल. मेनकेन हा लेखक म्हणतो, "स्त्रिया जेव्हा चुंबन घेतात तेव्हा प्रतिस्पर्धी एकमेकांशी हस्तांदोलन करतात त्याची आठवण होते." भिन्न लिंगी व्यक्तीशी संबंध यावा म्हणून समलिंगी व्यक्ती एकमेकांशी किती आणि कशा चुरशीने वागतात हे ह्या विवेचनात दाखविले आहे. विरुद्ध लिंगी सभासद ज्या गुणांना प्राधान्य देतात त्यावर ह्या स्पर्धकांच्या युक्त्या प्रयुक्त्या अवलंबून असतात. ज्यांच्याजवळ दुसऱ्याला हवे असलेले गुण नसतात त्यांना बाजूला पडण्याचा धोका पत्करावा लागतो.

**सवंगडी कायमचा सांभाळणे**

जम बसविण्याच्या क्रियेत मिळालेला सवंगडी सांभाळणे, टिकवून धरणे ही मोठी समस्या असते. जोडीदार प्रतिस्पर्ध्याला आकर्षक वाटत राहिला हवाहवासा वाटत राहिला तर तो कदाचित आपल्या जोडीदारालाच पळवून नेईल आणि आकर्षित करण्याची, प्रणयाराधन करण्याची, बांधिलकी पत्करण्याची सगळी मेहनत पाण्यात जाईल. जोडीदार फुटण्याचीही शक्यता असते. थोडक्यात एकदा जोडीदार मिळाला की तो सांभाळावा लागतो.

(Placia Nearctica) ह्या लव्ह बग या नावाने ओळखल्या जाणाऱ्या कीटकाचीच गोष्ट

ह्या संदर्भात पाहू या. सकाळी सकाळी नर लव्ह बग घोळक्याने जमिनीपासून फूट दोन फुटावर तरंगत असतात. आणि मादी मिळवण्याची संधी शोधीत असतात. माद्या मात्र घोळका करीत नाहीत किंवा तरंगतही नाहीत. उलट सकाळी त्या हिरवळीतून बाहेर येतात आणि नरांच्या घोळक्यात मिसळून जातात. कधीकधी मादी घोळक्यात मिसळण्यापूर्वीच एखादा नर तिच्यावर झडप घालतो. नरांची आपसांत जुंपलेली असतेच, आणि एकाच वेळी दहादहा नर सुद्धा एकाच मादीच्या भोवती घुटमळत असतात.

यशस्वी नर मादीला घेऊन घोळक्यातून बाहेर पडतो आणि ती जोडी जुगण्यासाठी जमिनीवरून सरपटत जाते. इतर नर मादीच्या मागे मागे असतात. म्हणूनच की काय कोण जाणे नर पूर्ण तीन दिवस त्याच अवस्थेत मादीबरोबर राहतो – म्हणून त्याचं टोपण नाव – लव्ह बग. दीर्घकालीन जुगण्याची क्रिया हीच जोडीदार सांभाळण्याची क्रिया ठरते. अंडी घालण्याची वेळ येईपर्यंत मादीला चिकटून राहिल्यामुळे इतर नरांना तो आपोआपच दूर ठेवतो. प्रजोत्पादनाच्या कार्यासाठी इतर नरांना दूर ठेवून स्वत:ची मादी सांभाळण्यात त्याला यशस्वी व्हावे लागते.

वेगवेगळ्या प्रजाती हा प्रश्न वेगवेगळ्या मार्गाने सोडवतात. माणसे लव्ह बग प्रमाणे वागत नाहीत पण दीर्घकालीन नातेसंबंधाने हा प्रश्न सुटतो. जे पुरुष विकासाच्या काळात लैंगिक व्यभिचाराबद्दल बेफिकीर राहिले त्यांनी आपले पितृत्वच धोक्यात टाकले. जी मुले स्वत:ची नाहीत त्यांच्यासाठी आपला वेळ, पैसा, कष्ट उगाचच खर्च केले. जुन्या स्त्रियांनी मात्र जोडीदार बाहेरख्याली असला तरी त्याचे पालकत्व त्याला सोडू दिले नाही. मातृत्व १०० % निश्चित असते. चंचल नवऱ्यापासून स्त्रीला तिच्या मुलांसाठी पैसाअडका न मिळण्याची भीती असते. व्यभिचाराबरोबर दोन हात करण्यासाठी निर्माण झालेली एक मानसशास्त्रीय डावपेचाची पद्धत म्हणजे मत्सर! आपल्या जोडीदाराच्या अप्रामाणिकपणाच्या खुणा पाहून ज्या पूर्वजाना संताप येत असे, पण ज्यांनी जोडीदाराचा अप्रामाणिकपणा दूर करण्याचा प्रयत्न केला, त्यांना जे मत्सरी नव्हते. त्यांच्यापेक्षा अधिक फायदा झाला. जोडीदाराचा व्यभिचार ज्यांना रोखता आला नाही त्यांना प्रजोत्पादनाच्या दृष्टीने थोडे कमी यश मिळाले.

ज्या कृतींनी उघडउघडच नातेसंबध दुरावतील अशा प्रकारच्या अनेक कृती करायला मत्सराची भावना माणसाला भाग पाडते. लैंगिक मत्सराचेच उदाहरण घेऊ या. ह्या मत्सरामुळे अगदी भिन्न स्वरूपाच्या दोन गोष्टी निर्माण होतात. टेहळणी, पहारा किंवा हिंसाचार. एक प्रकारात मत्सरी पुरुष बायकोवर जागता पहारा ठेवील, ती जाते कुठे, येते कधी, ती जिथे गेली आहे असे तिने सांगितले आहे तिथेच ती गेली आहे का ह्याचा शोध घेणे, पार्टीमध्ये तिच्यावर बारीक नजर ठेवणे किंवा तिची पत्रे फोडून वाचणे ह्या गोष्टी करीत राहील. हे वागणे म्हणजेच टेहळणी . दुसऱ्या प्रकारात आपल्या बायकोबरोबर ज्याला पाहिला आहे त्या पुरुषाला दम देणे, त्याला ठोसे मारणे, मित्रांना घेऊन जाऊन त्याच्याशी मारामारी करणे किंवा त्यांच्या घरावर दगड मारणे. ह्या कृती म्हणजेच हिंसाचार, पहारा आणि हिंसाचार ह्या दोन्ही टोकाच्या गोष्टी

म्हणजे मत्सराचे प्रकटीकरण. जोडीदाराच्या बेइमानीचा प्रश्न सोडविण्याच्या ह्या पर्यायी पद्धती!

मत्सरही काही ताठ, न बदलणारी, स्थिर अशी सहज प्रवृती नाही त्यामुळे रोबो प्रमाणे यांत्रिक कृती मत्सराच्या बाबतीत होऊ शकत नाही. संदर्भ व परिस्थिती हयांच्या संदर्भात ती सतत बदलती असते. मत्सरामुळे दुसऱ्या काही प्रकारांनाही माणसे वागतात परिस्थितीनुसार मत्सराचे स्वरूप पालटते. मत्सरामुळे निर्माण झालेली परिस्थिती, त्यावेळच्या कृती, त्यावेळचे संदर्भ हया सगळ्या गोष्टींचा आढावा ह्या लेखनात घेतलेला आहे.

**जोडीदार बदलणे**

सगळेच जोडीदार सांभाळून ठेवता येत नाहीत, ते तसे ठेवू ही नयेत. जोडीदार मदत देण्याचे बंद करतो, लैंगिक संबंध तोडतो, शारीरिक छळ सुरू करतो त्यावेळी जोडीदाराच्या तावडीतून सुटण्याची आत्यांतिक गरज निर्माण होते. आर्थिक चणचण, लैंगिक व्यभिचार, क्रौर्य हया गोष्टी असतानाही जे जोडीदाराबरोबर राहतात. त्यांना त्यांच्या निष्ठेबद्दल साष्टांग नमस्कार असो पण अशा व्यक्तींना अयोग्य जोडीदाराबरोबर राहिल्याने योग्य गुणसूत्रे पुढच्या पिढीकडे पाठवण्यात अपयश येते. ज्या आपल्या पूर्वजांना आपले नुकसान कसे टाळावे ह्याचे ज्ञान होते त्यांचे आम्ही उत्तराधिकारी आहोत.

प्राणीजगतामध्ये आपल्या जोडीदारापासून सोडवणूक करून घेतल्याची उदाहरणे आहेत. रिंग जातीची कबुतरे सर्वसाधारणपणे एका विणीच्या काळापासून दुसऱ्यापर्यंत एकमेकांना धरून असतात. पण विशिष्ट परिस्थितीत ती एकमेकांची साथ सोडतात. जननक्षमतेच्या अभावामुळे ह्या कबुतरांमध्ये जवळजवळ २५% इतकी फारकत प्रत्येक मोसमात होते. एखाद्या विणीच्या हंगामात जर त्यांना पिल्ले निर्माण करता आली नाहीत तर ती दुसऱ्या जोडीदाराच्या शोधात जातात. जननक्षम नसलेल्या जोडीदाराला सोडून जाणे हे पुनरुत्पादनाच्या दृष्टीने कबुतराला आवश्यक वाटते.

निवड, आकर्षण, चांगला जोडीदार सांभाळणे ह्या सगळ्यासाठी आपण लैंगिक डावपेच विकसित केले आहेत, तशाच अयोग्य जोडीदाराला फुटवण्याच्याही युक्त्या शोधलेल्या आहेत. ज्ञात असलेल्या सगळ्या संस्कृतींमध्ये 'घटस्फोट' असल्याचे आढळून येते. विभक्त होण्यामध्ये अनेक मानसिक प्रक्रिया गुंतलेल्या असतात. जोडीदाराचा उपद्रव अधिक की त्याच्यापासून मिळणारा फायदा अधिक ह्याचा अंदाज बांधावा लागतो. दुसऱ्या भावी जोडीदाराच्या गुणावगुणांची छाननी केली जाते. नवा जोडीदार सध्याच्या जोडीदारापेक्षा उजवा आहे का ह्याचाही विचार करावा लागतो. ह्या सगळ्या इतकेच, नव्या जोडीदाराला आपण आकर्षित करून घेऊ शकू का? हा मुद्दा अधिक महत्त्वाचा ठरतो. हे नातेसंबंध तोडल्यामुळे आपण स्वत: आपली मुले आणि नातेवाईक ह्यांचे किती नुकसान होईल ह्याचेही गणित मांडले जाते. आणि ह्या सगळ्या विचारांचा परिपाक म्हणून जोडीदाराला सोडून जायचे की धरून राहायचे हे ठरविले जाते.

एकदा का जोडीदाराला सोडून जायचे ठरविले की दुसऱ्या मानसिक प्रक्रिया उचल खातात

दोन्ही बाजूच्या कुटुंबीयांना ह्या विवाह, विभक्ती वगैरे सगळ्या गोष्टीत रस असतो त्यामुळे ही मोठी अवघड व गुंतागुंतीची गोष्ट होऊन बसते. ही गुंतागुंत सोडवावी लागते. कुटुंबीयांशी तडजोड करावी लागते, विभक्त होणे पटवावे लागते. माणसाच्या नाटकीपणाचे युक्तिबाज नमुने प्रचंड प्रमाणात पाहायला मिळतात. स्वत:चा अप्रामाणिकपणा जाहीर करण्यासाठी बॅग उचलून बाहेर चालू लागणे की जेणेकरून जोडीदार चिडीला जाईल असे वागणे हा त्यापैकी एक नमुना!

अयोग्य जोडीदारापासून सुटका करून घेण्यासाठी विभक्त होणे हा उपाय बरोबर, पण हा उपाय म्हणजे नवा प्रश्न – दुसरा जोडीदार मिळणे विभक्त झालेल्याला सोपे जात नाही. सगळ्या सस्तन प्राण्यांप्रमाणे मनुष्यदेखील एकाच जोडीदाराबरोबर आयुष्य काढतो असे नाही. माणसे परत परत जोडीदार शोधण्याच्या सौद्यात शिरतात आणि निवड, आकर्षण, सांभाळणे ह्या यंत्रात सापडतात. शिवाय मध्ये बराच काळ गेला असेल तर वेगळेच प्रश्न समोर उभे राहतात. लोक वेगवेगळ्या वयात, वेगवेगळ्या जबाबदाऱ्या आणि जमेच्या बाजू घेऊन या सौदा बाजारात येतात. वाढीव संपत्ती आणि दर्जा क्वचित पूर्वी अप्राप्य असलेला जोडीदार मिळवूनही देतो. वृद्धत्व आणि पहिल्या जोडीदाराची मुले हे मात्र मोठे अडथळे ठरतात.

घटस्फोटित स्त्रीपुरुषांना ह्या व्यवहारात किती प्रकारचे अनुभव येत असतील. ह्याचा अंदाज करता येतो. मुले असतील तर स्त्री स्वाभाविकपणेच त्यांच्या संगोपनाची जबाबदारी स्वीकारते. नवीन लग्न संबंध जुळवताना आधीच्या जोडीदारापासून झालेली मुले ही 'खायला काळ. . . .' मानली जातात. मुले असलेल्या विभक्त स्त्रीला लग्न व्यवहारात पुरुषांच्या तुलनेत अधिक त्रास होतो. म्हणूनच पुरुषांच्या तुलनेत फारच थोड्या विभक्त स्त्रिया पुनर्विवाह करताना आढळतात. वय वाढेल तसतसे स्त्री पुरुषांमधले विवाहाच्या शक्यतांचे हे अंतर वाढतच जाते.

**ह्या विवेचनात खालील मुद्दयांवर स्पष्टीकरण केले आहे.**

(१) सुरुवातीपासून आजपर्यंतच्या कालावधीत जोडीदार शोधण्याच्या कल्पनेत किती बदल झाला आहे,

(२) कोणत्या बाह्यपरिस्थितीचा परिणाम होऊन स्त्रीपुरुष पुनर्विवाह करू शकतात.

**भिन्न लिंगी व्यक्तींमधील भांडणे –**

एका गटाची निवड, आकर्षण, सांभाळ, बदल हे जोडीदाराबद्दलचे लैंगिक डावपेच दुर्दैवाने दुसऱ्या गटात भांडणे निर्माण करायला कारणीभूत ठरते. विंचवाची मादी (Scorpian fly) खास नजराणा आणून दिल्याशिवाय नराला वश होत नाही. मेलेले कीटक जेव्हा तो खाण्यासाठी मादीला आणून देतो तेव्हा तिचे खाणे चालू असतानाच नर तिच्याशी जुगतो. ह्याचेवेळी तो तिच्या खांद्यावर सैलसर पकड ठेवून असतो. जणू काही त्याला वाटत असते की हे खाद्य उचलून मादी मध्येच पळून जाईल. ह्या संपूर्ण क्रियेसाठी त्याला पूर्ण वीस मिनिटे लागतात. त्यासाठी मादी गुंतून राहील एवढे वीस मिनिटे पुरणारे खाद्य शोधण्याचे कौशल्य नराजवळ



अनुक्रमणिका

असावे लागते. हे खाद्य कमी असेल तर खाणे संपताच मादी नराला दूर ढकलून देते. मात्र हे खाणे वीस मिनिटांपेक्षा अधिक वेळ पुरले तर नर लगेचच तिच्याजवळ ठरलेल्या अन्नासाठी तंडायला लागतो. खाणे कमी असो की अधिक ह्या नरमादीची दोन्ही वेळा भांडणे होतात.

साधनसामुग्री आणि लैंगिक संबंध ह्या विषयांवर स्त्री पुरुषांचेही खटके उडतात. जोडीदारासंबंधीच्या उत्क्रान्तीच्या मानसशास्त्रात एका गटाने अवलंबलेले लैंगिक डावपेच दुसऱ्या गटाच्या डावपेचाना अडथळा वाटू शकतात. त्याला डावपेचांची गुंतागुंत म्हणतात. तात्पुरत्या किंवा दीर्घपल्ल्यांच्या लैंगिक संबंधांमागच्या स्त्री पुरुषांच्या सहज प्रवृत्ती किती भिन्न असतात ते लक्षात घ्या. लैंगिक संबंधाला संमती देण्यापूर्वी आपण एखाद्याला कसे आणि किती ओळखत असले पाहिजे. ह्या बाबतीतही स्त्री पुरुषांमध्ये पूर्ण मतभिन्नता आढळते. अर्थात व्यक्तिगत भेद आणि अपवाद जमेस धरावेच लागतील. पुरुष असे संबंध सहज शोधीत असतात. उदाहरणार्थ – आकर्षक अपरिचित स्त्रीकडे पुरुष आपली इच्छा आणि राजीखुर्षी चटकन व्यक्त करतो. त्याच्या बरोब्बर उलट काही बांधिलकी नसेल तर स्त्री अपरिचिताला जवळजवळ नेहमीच नाकारते.

दोन्ही गटांच्या लैंगिक डावपेचांमध्ये मुलभूत फरक आहे. पुरुषांची ताबडतोबीची इच्छा पुरी व्हायची असेल तर स्त्रियांची दीर्घ प्रणयाराधनाची इच्छा डावलली जाते. बरेचदा या उलटही घडते. स्त्रियांच्या मनाप्रमाणे हे घडले तर पुरुष नाराज राहातो. ह्या भिन्न इच्छा व आवडींमुळे वादंग सुरू होतात.

लग्नाच्या शपथा घेतल्या म्हणून वादंग बंद होत नाहीत. विवाहित स्त्रियांची तक्रार असते की त्यांचे नवरे स्वत:कडे मोठेपणाची भावना घेऊन दुसऱ्याला कमी लेखणारे (Condecending), भावनाशून्य आणि अविश्वासार्ह आहेत तर विवाहित पुरुष म्हणतात की आमच्या बायका लहरी, नको एवढ्या परावलंबी आणि लैंगिक बाबतीत अंगचोर आहेत. दोन्हीही गट कमी अधिक प्रमाणातल्या व्यभिचाराबद्दल तक्रार करतात. ह्या सगळ्या तक्रारी विकासाच्या संदर्भात आलेल्या लैंगिक डावपेचांमुळे आपल्याला समजून घेता येतात.

दोन्ही गटातले वादंग हे भरपूर वाढणारे असले तरी अटळ नाहीत. परिस्थितिवशात भांडणे कमीही होतात आणि सुसंगती निर्माण करतात. आपली आयुष्ये अधिक उन्नत करण्याची, चांगले मार्ग शोधण्याची, काही डावपेच टाळण्याची तर काही आखण्याची अचाट ताकद आपल्याला लैंगिक डावपेचांच्या ज्ञानामुळे प्राप्त होते. ही भांडणे कमी करण्यासाठी हे लैंगिक डावपेच कसे असतात, ते कशामुळे निर्माण होतात हे जाणून घेणे अतिशय आवश्यक आहे. त्यामुळे ह्या लेखनात भांडणाचे मूळ शोधून त्यावर उपाय सांगण्याचा प्रयत्न केलेला आहे.

**संस्कृती आणि संदर्भ**

सध्या वापरात असलेल्या लैंगिक डावपेचांना सध्याचे स्वरूप प्राप्त होण्यामागे पूर्वापार निवडीचा प्रभाव हे एक कारण आहे. गत इतिहासकाळात ज्यावेळी हे डावपेच निर्माण झाले

त्यावेळेपेक्षा आजची परिस्थिती पूर्णपणे वेगळी आहे. पूर्वजांना खाण्यासाठी कंदमुळे, झाडपाला गोळा करावा लागत होता. मांस शिकार करून मिळवावे लागत होते. आजचा माणूस त्याचे अन्न सुपरमार्केटमधून किंवा हॉटेलमधून मिळवतो. नव्या शहरी माणसाचे लैंगिक डावपेचही आता बदलले. पूर्वीसारखे ओसाड गवताळ प्रदेश, गुंफा, शेकोट्या शोधून त्याला जोडीदार मिळवावा लागत नाही.उलट तो 'जिम'वर, पार्ट्यांमध्ये, संगणक माध्यमामधून, विवाहसंस्थांमधून जोडीदाराची निवड करू शकतो. असे असूनही लैंगिक डावपेच मात्र जसेच्या तसेच वापरले जात आहेत. जुने मानसशास्त्र तसेच टिकून आहे आणि नव्या वातावरणात ते तसेच वापरले जात आहे. कसे ते पाहू –

फास्टफूडच्या दुकानातून खाल्ल्या जाणाऱ्या अन्नाचे प्रमाण पहा. पूर्वापार चालत आलेल्या जगण्यासाठीच्या प्रयत्नांचे आजही आपण कसे पालन करतो हे त्या अन्नावरून लक्षात येते. आजही आपण बर्गर्स, शेक्स, फ्रेंच फ्राइज, पिझ्झा हे भरपूर प्रमाणात खातो, याचाच अर्थ आजही आपण स्निग्ध पदार्थ, साखर, प्रथिने आणि मीठ हे पदार्थ भरपूर प्रमाणात घेतो. फास्टफूडची दुकाने लोकप्रिय झाली कारण हे पदार्थ एकाच ठिकाणी, हव्या त्या स्वरूपात ह्या ठिकाणी आपल्याला उपलब्ध झाले. दुर्भिक्षाच्या काळात कशाला प्राधान्य दिले गेले, काय निवडले गेले ह्याची माहिती आपल्याला ह्या प्रकारांमुळे मिळते. प्रचंड प्रमाणात अन्न उपलब्ध झाले, तेही सहजी, त्यामुळे आपण आता गरजेपेक्षा अधिक अन्न खातो. हे अन्न पूर्वीच्या धडपडीला योग्य असले तरी सद्य परिस्थितीत ते आरोग्याला घातक ठरते आहे. वेगळ्या परिस्थितीत निर्माण झालेल्या रुची अरुचीच्या, आवडी निवडीच्या गोष्टींशी आपण तसेच बांधलेले राहिलो आहोत. विकासाचा वेग अतिशय मंद असतो. कित्येक शतकांपूर्वीच्या सवयी बदलायला प्रचंड वेळ लागतो. बदल मुंगीच्या पावलाने होतात. आपण काही कालचक्र फिरवू शकत नाही. त्यामुळे तेव्हा नेमकी काय परिस्थिती होती ते आपल्याला समजावून घेता येत नाही. आपल्या आवडीनिवडी, सापाबद्दलची भीती, मुलांचा लळा अशा काही गोष्टी ह्यासाठी खिडकीसारख्या उपयोगी पडतात. ह्यासाठीची आपली साधनेही जुन्या जगातल्या माणसांच्या साधनांसारखीच असतात.

जगण्याच्या डावपेचांसारखेच जोडीदार मिळवण्याचे डावपेचही जुनाट झाले आहेत. टिकून राहणे आणि प्रजोत्पादन ह्या दोन्ही दृष्टीने ते कुचकामाचे झाले आहेत. अेड्सच्या प्रादुर्भावामुळे लैंगिकसंबंध ही गोष्ट अस्तित्वालाच आव्हान ठरली आहे, मृत्यूला आमंत्रण ठरली आहे. पूर्वी तिचा संबंध मृत्यूपाशी नव्हता. विकसित झालेल्या डावपेचांचे ज्ञान झाल्यामुळे, ते कुठून, कसे आले आणि कोणत्या परिस्थितीत ते निर्माण झाले, ह्या सगळ्या ज्ञानामुळे आपल्या प्रचलित पद्धती आपण बदलू अशी आशा आहे का?

माणसाला मोठा आकर्षक फायदा मिळतो तो त्याची डावपेचांची यादी भरपूर मोठी आहे याचा ! शिवाय ती संदर्भानुसार अतिशय संवेदनक्षमही असते. अयशस्वी विवाह आणि घटस्फोट होण्याचा निर्णय ह्यांचा आपण विचार करू. जोडप्याच्या वादाचे स्वरूप, त्याची तीव्रता, एखाद्या जोडीदाराची भ्रमरवृत्ती, दोन्ही बाजूच्या नातेवाईकांचा रेटा, मुले असणे, मुलांची वये, त्यांच्या







गरजा आणि नवा जोडीदार मिळवता येण्याची शक्यता अशा अनेक गुंतागुंतीच्या गोष्टींवर हा घटस्फोट अवलंबून राहील. ह्या कठीण प्रश्नांची सोडवणूक करणे, त्यांचे महत्त्व ओळखणे ह्यासाठी माणसाने मानसशास्त्रीय संरचना तयार केली आहे.

फक्त व्यक्तिगतच नव्हे तर संपूर्ण संस्कृतीमध्ये, ज्या पद्धती ती संस्कृती स्वीकारते त्यानुसार, बदल होतात पुरुषांना बहुपत्नीकत्वाची परवानगी काही संस्कृती देतात तर दुसरी एखादी संस्कृती स्त्रियांना अनेक पती करू देते. 'एक सहचर – एका वेळी' म्हणणारी संस्कृती आहे तशीच 'मुक्त' व्यवस्था असणारी म्हणजे कधीही जोडीदार बदलेले जाऊ शकणारी संस्कृतीही अस्तित्वात आहेच. ह्या कायदा आणि संस्कृतीमध्ये बसणारे नियम जोडीदारासंबंधीचे डावपेच सहज स्वीकारतात. उदाहरणादाखल बोलायचं तर – एकाधिकार चालवण्याची कुवत असलेले पुरुष बऱ्याच स्त्रिया स्वत:च्या आधिपत्याखाली आणतील व आपल्या मुलाला जोडीदाराशिवाय रहावे लागेल म्हणून बहुपत्नीकत्वाची चाल असलेल्या समाजात पालक आपल्या मुलावर एकतरी स्त्री मिळवण्यासाठी दबाव आणतात. एक पत्नीव्रती समाजात पालकांना ह्या प्रश्नात फार कमी लक्ष घालावे लागते.

स्त्री पुरुषांचे गुणोत्तर प्रमाण किंवा उपलब्ध स्त्रिया व उपलब्ध पुरुष ह्यांचे एकमेकांशी प्रमाण हा महत्त्वाचा मुद्दा आहे. जेव्हा स्त्रिया आधिक्याने असतात तेव्हा पॅराग्वेच्या एक इंडियन्स प्रमाणे (Ache Indians of Paraguay) पुरुष एखादीशी बांधिलकी पत्करायला कांकू करतात कारण त्यांना इतरांशी संबंध जोडणे सहज शक्य होते. उलट जिथे पुरुष आधिक्याने आहेत अशा चीनमधल्या शहरातून किंवा व्हेनेझुएलाच्या हिवी जमातीत एक पत्नी, एक पती असा कायदाच आहे. तिथे घटस्फोटांचे प्रमाण अतिशय कमी आहे. ज्याप्रमाणे पुरुषांचे लैंगिक डावपेच बदलतात त्याप्रमाणे स्त्रियांचेही बदलतात किंवा ह्या उलटही घडते. दोन्ही गट उपलब्धीच्या प्रमाणावर अगदी विरुद्ध दिशेने आपले वागणे बदलीत असतात.

एका दृष्टीने पाहिले तर संदर्भ हेच सर्वस्व आहे. उत्क्रांतीच्या वाटचालीमध्ये हा संदर्भच आजचे आपले वागणे सांगतो. प्राचीन काळात जे संदर्भ वारंवार येतात त्यातून आपण विद्यमान काळात ज्या व्यूहरचना करतो त्या निर्माण झालेल्या आहेत. मानवी लैंगिक डावपेच समजण्यासाठी पुढील विवेचनात –

(१) निवडीचे प्रचलित दबाव

(२) जुळवून घेण्याची भूतकालीन समस्या

(३) मानसशास्त्रीय यंत्रणा किंवा त्यासाठी डावपेचांनी मिळवलेली उत्तरे

(४) काही खास उपाय शोधून काढणारे सध्याचे संदर्भ एवढ्यांचा विचार केलेला आहे.

**मानवी लैंगिकता समजावून घेण्यातले अडथळे**

डार्विनने १८५९ मध्ये जीवाची उत्पत्ती व रचना (Organizalion of life) स्पष्ट करणारी विधाने प्रथमच केली तेव्हा ह्या उत्क्रांतीच्या तत्त्वांनी लोकांना भयचकित केले आणि अस्वस्थही केले. त्यांच्या समकालीनांपैकी एक लेडी ॲशली, 'आपले पूर्वज अमानवी पण उच्च जातीय

प्राण्यांपैकी होते' हा त्याचा सिद्धांत ऐकून म्हणाली, "ही सोपपत्तिक मीमांसा खरी नसावी अशी आपण आशा करू या आणि जर ती खरी असेल तर ती सगळ्यांना ठाऊक तरी होणार नाही अशी आशा करू या." डार्विनच्या सिद्धांताचा जोरदार विरोध अगदी आजपर्यंत चालू आहे. हे अडथळे दूर झाले तरच आपल्याला लैंगिकतेबद्दल खरी आणि सखोल माहिती मिळेल. ह्यासाठी तरी घटना आणि ज्ञान ह्यामधले अडथळे दूर करावेच लागतील.

एक अडचण अगदी उघड आहे. आपल्या जाणिवा आणि ज्ञानेंद्रिये ह्या यंत्रणा नैसर्गिकरित्याच अशा निर्माण झाल्या आहेत की नजीकच्या काळात, आगेमागे घडणाऱ्या घटनांचा विचार आपण करू शकतो. त्यामुळे सेकंद, मिनिटे, तास, दिवस, कधी कधी महिने, क्वचित प्रसंगी वर्षे एवढ्याच काळातल्या घटना प्रसंगाचा विचार आपल्याला करता येईल. जगण्याचे प्रश्न सोडवण्यातच आपल्या पूर्वजांची सगळी शक्ती, सगळा वेळ खर्च झाला. अन्न, वस्त्र, निवारा मिळवणे, तो सुरक्षित राखणे, जोडीदार मैत्र जुळवणे, संघटित रहाणे, मानमरातब मिळवणे, लुटारू चाचांपासून स्वसंरक्षण करणे. ह्या तत्कालीन गोष्टीतच त्यांना गढून जावे लागत होते. उत्क्रांती हजारो पिढ्यांनंतर मुंगीच्या पावलाने इतकी हळू येते की आपणाला ती दृश्य स्वरूपात पहाता येत नाही. पदार्थ विज्ञान शास्त्रज्ञांनी कृष्णविवरे (Block holes) आणि अकरावी मिती (eleven dimentional universe) ह्या अमूर्त स्वरूपाच्या गोष्टी ज्ञानेंद्रियांनी जाणून घेतल्या, त्यासंबंधीचे सिद्धांत मांडले. अशा प्रकारची कल्पनेची झेप असली तरच इतक्या प्रचंड काळात घडणाऱ्या घटनांचा वेध घेणे शक्य होईल.

दुसरा महत्त्वाचा अडथळा म्हणजे आदर्शवाद. स्पेन्सरने एकदा डार्विनिअन समाजवाद मांडल्यानंतर राजकीय साध्याकरिता राजकारणी लोक जीवशास्त्रीय सिद्धान्त उपयोगात आणू लागले – माणसांची गळचेपी योग्यच आहे असे दाखवण्यासाठी, जातीची किंवा लिंगाची उच्चनीचता पटविण्यासाठी. माणसाच्या वर्तणुकीबद्दल जीवशास्त्रीय सिद्धांताचा गैरवापर इतिहासात भरपूर झाला. पण याचा अर्थ असा नव्हे की चैतन्यमय जीवासंबधीचे जैवक सिद्धांत आपण धुडकावून लावावेत. मानवी जोडीदार मिळवण्याची पद्धती समजण्यासाठी आपण आपली पूर्वपीठिका मनापासून मान्य करायला हवी. आणि त्या पूर्वजांचे आपण वंशज आहोत हे ही मान्य करायला हवे.

तिसरी अडचण म्हणजे निसर्गवाद्यांची भ्रममूलक कल्पना ! 'जे अस्तित्वात आहे ते अस्तित्वात राहिलेच पाहिजे' हा उत्क्रांतीच्या मानसशास्त्राला विरोध करणारा मुद्दा ! ह्या भ्रमामुळे निसर्गवादी मानवाच्या वर्तणुकीच्या शास्त्रीय विवरणाला नैतिक विधिनिषेधांचे खुलासे देऊन गोंधळ करतात. रोगराई, प्लेग, बांडगुळे, बालमृत्यू ह्या गोष्टी अस्तित्वात आहेतच. त्या नाहीशा करण्यासाठी किंवा कमी करण्यासाठी आम्ही सतत प्रयत्न करतो. मग निसर्गवाद्यांच्या म्हणण्याला मान देऊन त्या तशाच ठेवायला हव्यात का?

दुसरे उदाहरण पुरुषी मत्सराचे ! स्वत:चे पितृत्व अबाधित रहावे म्हणून पुरुष लैंगिक बाबतीत मत्सरी असतो. हा त्याचा मानसिक कावा आहे. ह्या मत्सरामुळे जगभर स्त्रियांना क्रूरपणा, मारहाण, खूनखराबा अशा प्रकारांना तोंड द्यावे लागते. सामाजिक जबाबदारी म्हणून पुरुषांची



अनुक्रमणिका

मत्सरग्रस्तता आणि त्याचे हे भयाकारी परिणाम कमी तर करायलाच हवेत. विकासाच्या इतिहासात 'मत्सर' ह्या भावनेला कुठेतरी स्थान आहे म्हणून ते मान्य करावे किंवा त्याचे परिणाम थंडपणे पहात राहावे असे तर नव्हे? काय टिकवून धरावे, काय नाहीसे करावे हे जनमताच्या मूल्यमापनाने ठरवले पाहिजे. विज्ञानाने किंवा निसर्गवाद्यांच्या 'अस्तित्व' भूमिकेतून नव्हे !

चौथी अडचण प्रतिनिसर्गवाद्याच्या अगदी उलट भूमिकेची ! काही माणसे अधिक तीव्र दृष्टीने पहातात. नैसर्गिक मानव म्हणजे निसर्गाशी वनस्पती, प्राणी आणि आपापसातही जुळवून घेणारा प्राणी. पितृसत्ताक पद्धती / भांडवलशाही ह्या सध्याच्या पद्धतीमुळे निर्माण होणाऱ्या युद्ध, आक्रमण आणि स्पर्धा ह्या गोष्टी, ह्या मुळातच शांतताप्रिय असणाऱ्या माणसांना भ्रष्ट वाटतात. पुरावा असो नसो, माणसे अशा प्रकारच्या सगळ्या गैरसमजुतींना चिकटून रहातात. २५ टक्के यनोमान इंडियन पुरुषांची हत्या यनोमान इंडियन पुरुषांकडूनच होते असे विधान मानववंशशास्त्रज्ञ नेपोलिअन छगनानने केले. हे पुराव्यासह केलेले विधानही, जे लोक हा समूह शांततेने नांदत आहे असे मानीत होते, त्यांच्याकडून नाकारले गेले. आपण आदर्शवादी चष्म्याने पाहायला लागलो की आपण कसे असावे हे आपल्याला दिसायला लागते. आणि परिस्थिती तशीच आहे असे मानणे हा प्रतिनिसर्गवाद्यांचा भ्रम !

पाचवा विरोध होतो तो विकसित मानसशास्त्राने मानलेल्या सिद्धांतामध्येच बदल व्हायला लागला की ! जोडीदार मिळवण्यासाठीचे डावपेच अक्षय, चिरस्थायी, अपरिवर्तनीयच असले पाहिजेत असे आपण मानतो आणि मग विचार करू न शकणाऱ्या आंधळ्या रोबोप्रमाणे आपणही जीवशास्त्राच्या प्रचलित नियमांनुसारच चालत रहातो. ह्यामुळे होते असे की चुकीच्या पद्धतीने माणसाची वर्तणूक दोन वेगळ्या गटात विभागली जाते – जीवशास्त्राने ठरवलेली वर्तणूक आणि परिस्थितिजन्य वर्तणूक. वास्तविक पहांता माणसाचे वागणे ह्या दोहोंचा परिपाक असते. प्रत्येक डी एन ए (DNA) वर वातावरण व संस्कृतीचा परिणाम होतो. प्रत्येक माणसाच्या आयुष्यात विकसित मानसशास्त्रीय यंत्रणेला सामाजिक आणि शारिरीक प्रेरणा पुरवते. प्रत्येक वागणूक ह्या यंत्रणेमुळे आणि त्यांच्या वातावरणातील प्रभावामुळे घडते. विकासाचे मानसशास्त्र खरा प्रतिक्रियावादी दृष्टिकोन व्यक्त करते. हा दृष्टिकोन ज्यापासून मानवाचे मानसशास्त्र निर्माण होते अशा ऐतिहासिक सांस्कृतिक, सुधारणावादी परिस्थितिजन्य घटकांचा शोध घेते आणि प्रचलित मानसशास्त्राला मार्ग दाखवते.

तत्त्वत: भोवतालच्या परिस्थितीचा परिणाम जवळजवळ सगळ्यांच्याच वागणुकीवर व्हायला हवा. पण प्रत्यक्षात घडते ते असे की ज्ञान आणि तंत्रज्ञान ह्यांच्यामुळे आपण फक्त काहीच प्रकार बदलू शकतो सगळे नव्हे ! बदल हवाच असेल तर प्रगत ज्ञानच आपल्याला बदलाच्या नव्या संधी उपलब्ध करून देईल. माणसे भोवतालच्या बदलाला अत्यंत संवेदनाक्षम असतात. कारण नैसर्गिक निवड संदर्भाशिवाय वागणुकीत प्रकट होतील अशा स्थिर भावना माणसात निर्माण करीत नाही. उत्क्रांतीविषयक जीवशास्त्र जोडीदार शोधण्याच्या कृतीचा मूळ अर्थ भविष्यकाळ अपरिवर्तनीय आहे असे आम्हाला सांगत नाही.



अनुक्रमणिका

सहावी खीळ बसते ती स्त्रीवादी चळवळीकडून बऱ्याचशा स्त्रीवाद्यांना काळजी वाटते की उत्क्रांतीचे सिद्धांत दोन्ही गटात –

(१) असमानतेचे तत्त्व मांडतील,

(२) स्त्री आणि पुरुष ह्या दोघांच्या भूमिकांवर बंधने घालतील,

(३) दोघांच्याही भूमिका साचेबंद करतील,

(४) सत्ता आणि साधने ह्यापासून स्त्रिया कायमच्या वंचित होतील,

(५) आजची परिस्थिती बदलण्याची शक्यता असलेला आशावाद वाढीस लावतील.

ह्या कारणांकरिता काही वेळा स्त्रीमुक्तिवादी मंडळी हे विकासाचे तपशील नाकारतात.

ज्या गोष्टीची ह्या सर्वांना भीति वाटते त्यापैकी कोणतीच गोष्ट जोडीदार शोधण्याच्या क्रियेच्या मानसशास्त्रात असत नाही. जवळजवळ सगळ्या क्षेत्रात आज स्त्री पुरुष समान आहेत. फक्त ज्याठिकाणी विकास होत असताना त्यांनी समायोजनाच्या वेगवेगळ्या पद्धती स्वीकारल्या तेवढ्यापुरते ते वेगळे पडतात. स्त्री पुरुषांची सवंगड्यासंबंधीची आवड एकदम वेगळी आहे. पण ह्या आवडीनिवडीमागची सहजप्रवृत्ती मात्र दोघांनाही सारखीच आहे.

उत्क्रांतीचे मानसशास्त्र सवंगडी शोधण्याच्या पद्धती स्पष्ट करते. पण गटाची वागणूक कशी असावी हे सांगत नाही. प्रत्येक गटाने कसे वागावे ह्यासाठी मार्गदर्शक तत्त्वेही सांगत नाही ह्या मानसशास्त्राला राजकीय कार्यक्रमही नाही. मात्र ह्या सिद्धांताच्या संदर्भात मजपाशी एखादी राजकीय पवित्रा म्हणा किंवा काही प्रश्न म्हणा, असले तर ते म्हणजे –

(१) लिंग वंश आणि लैंगिक डावपेच ह्यांना न मानणारी समानता असावी एवढीच आशा!

(२) माणसांच्या वर्तगुकींमधल्या फरकांसंबंधी सहनशीलता असावी.

(३) आनुवंशिकता / जीवशास्त्रीय हेतू मूलकतावाद (determinism) / पर्यावरणाचा प्रभाव न होणारा इत्यादी मुद्दे उत्क्रांतीच्या सिद्धांतासाठी चुकीनेही अडथळा म्हणून वापरले जाऊ नयेत.

एवढेच माझे म्हणणे आहे.

मानवी लैंगिक आयुष्यात उत्क्रांतीवादी मानसशास्त्राला विरोध होतो. त्याचे मूळ प्रणय, लैंगिक सुसंवाद आणि आमरण टिकणारे प्रेम याबद्दलच्या आदर्शवादी दृष्टिकोनात आहे. मी सुद्धा ह्या दृष्टिकोनाला चिकटून राहतो. असे करताना मानवी लैंगिक मानशास्त्रात 'प्रेम' ह्या गोष्टीला मध्यवर्ती स्थान आहे अशी माझी श्रद्धा असते. जोडीदाराच्या नात्यामुळे आयुष्याला आत्यंतिक समाधान लाभते आणि त्यांच्याशिवाय आयुष्य म्हणजे वाळवंट ठरते. तरीदेखील काही लोक जोडीदाराशिवाय सुखाने रहातात. परंतु आपण स्त्री पुरुष समागमासंबंधीची ही जी वस्तुस्थिती आहे ती गेली अनेक वर्षे सातत्याने नाकारली आहे. मतभेद, स्पर्धा, फेरफार, फसवणूक हे सगळे जोडीदार मिळवण्याच्या डावपेचाना व्यापून राहिले आहेत. जर आपल्याला जीवनाला व्यापू न शकणारे नातेसंबंध पहायचे असतील तर शहामृगाप्रमाणे वाळूत खुपसलेली आपली डोकी वर उचलून आपण हे सगळे पहायला हवे.



अनुक्रमणिका

# विज्ञान

## गणित विज्ञानाची भाषा

**चित्रा नित्सुरे**

"फक्त दहा चिन्हांच्या मदतीने सर्व संख्यांची अभिव्यक्ति करण्याची अभिनव पद्धत जर आम्हाला कोणी शिकवली असेल तर ती भारताने! या दहा चिन्हांना स्थानिक मूल्यावरोबरच विशुद्ध मूल्य पण असणे ही एक विलक्षण कल्पना आहे. मात्र अतिपरिचयामुळे की काय पण ही महत्त्वाची कल्पना आपल्याला फारच साधीसोपी वाटते. आपण तिच्या खऱ्या गुणवत्तेकडे काणाडोळा करतो. या पद्धतीच्या सुलभतेमुळे हर प्रकारच्या गणनक्रिया अतिशय सोप्या झाल्या आहेत. मनुष्योपयोगी शोधांमध्ये गणिताचा प्रथम क्रमांक लागतो. तो याच दशमान पद्धतीमुळे आर्कमिडीज व अपोलोनियससारख्या प्राचीन प्रतिभावंतांच्या नजरेतून देखील ही कल्पना निसटली होती याचं स्मरण झालं की दहा अंकांच्या दशमान पद्धतीचे मोठेपण आपल्याला प्रकर्षाने जाणवतं." **–लाप्लासे**

आता हे लिखाण करताना माझ्या कानात एका जुन्या कडव्याचे शब्द घुमत आहेत.

"वाचणे, लिहिणे आणि गणिते सोडविणे,

छडीच्या तालावर जमते शिकणे."

या प्रकरणात सर्वाधिक जुन्या तरीही अत्यंत कठीण वाटणाऱ्या विषयाची– अंक गणिताची– कहाणी सांगणार आहे. ही काही नेत्रदीपक यशाची, शौर्याची किंवा उदात्त त्यागाची कहाणी नव्हे. ही कहाणी आहे अंधारात ठेचकाळण्याची, अंधारात चाचपडत असतानाही प्रकाश वाटा नाकारण्याची, अपघाती शोधाची. ही कहाणी आहे पूर्वग्रह दूषित, सुधारणा शत्रूंची ही कहाणी आहे. परंपरेशी इमान ठेवताना नि:स्पृह न्यायाला लागलेल्या ग्रहणाची ही कहाणी आहे. रीतिरिवाजांच्या तालावर दीर्घकाळ नाचणाऱ्या विवेकाची. थोडक्यात, ही कहाणी आहे मानवाची.

लेखी हिशेब ठेवण्याची सुरुवात बहुधा मानवाकडे खाजगी मालमत्ता साठल्यावरच झाली असावी. आपली गुरं, इतर सामानसुमान यांचे मोजमाप ठेवण्याची गरज जेव्हा माणसाला भासली तेव्हाच हिशेबाची पद्धत जन्मली असेल यात शंका नाही.

सुरुवातीचे हिशेब अनेक प्रकारे ठेवले जात असत. कधी एखाद्या काठीवर किंवा झाडाच्या बुंध्यावर खुणा कोरल्या जात, खडक किंवा दगडावर ओरखडे उमटवले जात किंवा ओल्या मातीवर खुणा केल्या जात. अशा तऱ्हेने मानवाला ज्ञात असलेले अंक लेखी चिन्हांच्या रूपात



अनुक्रमणिका

प्रकट झाले. पुरातत्त्वीय संशोधनामुळे प्रागैतिहासिक मानवाच्या गुहांतील या नोंदी प्रकाशात आल्या आहेत. या गुहा युरोप, आफ्रिका तसेच आशिया खंडातही सापडल्या आहेत. हिशेब करण्याची कला मानवाने लेखन कला किंवा लेखी भाषेच्या आधी आत्मसात केली असावी असे पुरावे उपलब्ध आहेत. एवढेच काय तर अंकांची लेखी नोंद ठेवण्याचं तंत्र साधल्यानंतरच निरनिराळे ध्वनि देखील लेखी स्वरूपात मांडावे असं मानवाला. सुचलं असावं.

प्राचीन इजिप्त व सुमेरियातील लोकांनी सर्वप्रथम लेखी अंकांचा पद्धतशीर वापर केला. या दोन्ही देशात जे पुरावे सापडले आहेत ते एकाच काळातले म्हणजे ख्रिस्तपूर्व ३५०० वर्षांपूर्वीचे आहेत. याचा अर्थ दोन्ही संस्कृतीत लेखी हिशेबाची सुरुवात एकदम झाली असावी. या नोंदी तपासल्या तर त्यांच्या मार्गदर्शक नियमामधील विलक्षण साम्य पाहून आपण आश्चर्य–चकित होतो. यादेशात प्रचंड भौगोलिक अंतर असलं तरीही त्यांच्यात दळणवळण असण्याची शक्यता आहे. कदाचित् काठिण्याची किमान पातळी गाठण्याच्या व गणना पद्धती अधिकाधिक सुलभ करण्याच्या धडपडीतून त्यांची गणना पद्धती जन्मली असावी. गणना पद्धतीतील साम्य असण्याचं हेच कारण जास्त सयुक्तिक वाटतं. ताळा करण्याच्या नैसर्गिक प्रक्रियेलाच गणनेची शाखा फुटली असावी.

वस्तुत: प्राचीन बॅबिलोनियातील शिलालेख, पपायरस गवतावरील इजिप्शियन चित्रलिपी अगर चीनमध्ये आढळलेल्या नोंदीतील तऱ्हेवाईक चित्रे असोत या सगळ्यात एकच तत्त्व असल्याचं ठळकपणे जाणवतं ते म्हणजे मूळ संख्यांचं. नऊपर्यंतची प्रत्येक संख्या केवळ रेषांच्या समूहाने व्यक्त केली आहे. मोठ्या संख्यांसाठी तेच तत्त्व वापरलेलं दिसतं. अधिक मोठी एकके म्हणजेच दशक, सहस्त्र, शतक इ. साठी वेगवेगळी विशिष्ट चिन्हं वापरली आहेत.

अति प्राचीन काळापासून ब्रिटिश लोक आकडेमोडीसाठी एका खास लाकडी पट्टीचा वापर करत आले आहेत. या लाकडी पट्टीवर लहान मोठ्या खाचा केलेल्या असतात. लहान खाचा पाउंड स्टर्लिंग साठी तर मोठ्या खाचा दहा पाउंड, शंभर पाउंड अशा मोठ्या परिमाणासाठी वापरतात. ही लाकडी पट्टी देखील मूळ संख्यांच्या सिद्धांतावर आधारलेली आहे.

गणनेच्या आधुनिक पद्धतीचा विकास झाल्यानंतरही अनेक शतके या लाकडी पट्टीचा वापर का चालू होता हे एक कोडंच आहे. कालबाह्य झालेल्या या साधनाचा वापर करण्याच्या परंपरेला दुराग्रहाने चिकटून राहिल्यामुळे ब्रिटिश सरकारला किती जबरदस्त किंमत मोजावी लागली या विषयीचा एक किस्सा चार्ल्स डिकन्सने सांगितला आहे. तो येथे त्याच्याच शब्दात पाहूया –

"अनेक शतकांपूर्वी खाचा पाडलेल्या लाकडी पट्टीच्या साहाय्याने आकडेमोड करण्याची पद्धत अस्तित्वात आली. सरकार दरबारी, विमा कंपन्यांमध्ये देखील याच पट्टीचा वापर केला जात असे. एखाद्या वाळवंटी बेटावर, जेथे ऋतूंचा क्रम लक्षात येण्यासाठीदेखील एकही झाड नाही, कालगणना जितक्या ढोबळमानाने करता येईल, तितक्याच ढोबळमानाने ही लाकडी पट्टी गणना करू शकत असे. कारकुनाच्या, अधिकाऱ्यांच्या अनेक पिढ्या आल्या नि गेल्या



अनुक्रमणिका

पण लाकडी पट्टी वापरण्याच्या पद्धतीत काही बदल झाला नाही. कारकुनी कामकाजात, व्यवहारात या लाकडी पट्ट्या जणू काही घटनेचा आधारस्तंभ असल्याप्रमाणे घट्ट पाय रोवून होत्या. "टॅली" हे भारदस्त नाव घेऊन Elm वृक्षाच्या ढलप्यांवरच्या खाचात मिरवत! जॉर्जच्या (तृतीय) (१७३८-१८२०) शासन काळात, लेखणी, शाई, कागद, पाटी, पेन्सिल इ. शोधानंतरही या सनातन साधनाला चिकटून राहणे कितपत शहाणपणाचे आहे?" असा क्रांतिकारी मूलभूत सवाल कोणा एका भल्या माणसाने केल्याबरोबर लाल फितीत जखडलेली शासन यंत्रणा रागाने लालबुंद होऊन खडबडून जागी झाली. अजूनही बदलाची वेळ आली नाही का? नवीन साधनाला सरकार दरबारी प्रवेश मिळवून देण्यासाठी ही यंत्रणा आपल्या गतीने, आपल्या परीने कामी लागली. अखेर १८२६ साली या लाकडी पट्ट्या निकालात काढल्या गेल्या. नवीन गणना पद्धतीच्या वापराचा सरकार दरबारी श्रीगणेशा झाला. वापरात नसलेल्या या पट्ट्यांचा प्रचंड साठा वेस्टमिन्स्टर गोदामात पडून आहे याचा शोध तब्बल आठ वर्षांनी - १८३४ साली लागला. पुन्हा एकदा सरकारी यंत्रणा डोकं खाजवू लागली. वाळवीने खाल्लेल्या, जुन्यापुराण्या, सडलेल्या या लाकडी कपच्यांचे करायचे तरी काय? "लंडनमधील थंडीने कुडकुडणाऱ्या गोरगरिबांना हा लाकूड फाटा वाटून टाका. शेकोटीच्या उबेत त्या बिचाऱ्यांना काही घटका तरी सुख लाभू द्या." असा शहाणपणाचा सल्ला कोणीही दिला असता. पण "निरुपयोगी" शिक्का मिरवणाऱ्या या लाकडी पट्ट्या कायम निरुपयोगीच ठरल्या पाहिजेत, त्या कधीच उपयोगी ठरू शकत नाहीत, या खास सरकारी विचारसरणीचा व्हायचा तोच परिणाम झाला. "संपूर्ण गुप्तता पाळून" या पट्ट्या नष्ट कराव्यात अर्थात जाळून टाकाव्यात असा आदेश काढण्यात आला. हाउस ऑफ लॉर्डस्‌मधील एका शेगडीत त्या पट्ट्या जाळण्यात आल्याची वार्ता पसरली. हाउस ऑफ लॉर्डस्‌चे लाकडी पॅनेल या ज्वाळांच्या भक्ष्यस्थानी पडले. यामुळे हाउस ऑफ कॉमन्सचा भडका उडाला. दोन्ही सभागृहे भस्मसात झाली. नवीन सभागृह बांधण्यासाठी वास्तुविशारदांना पाचारण करण्यात आले. आणि अजूनही वीस लक्ष पाउंडहून अधिक असलेली या लाकडी पट्ट्यांची किंमत आपण चुकवत आहोत."

अंकांच्या प्राचीन लेखी नोंदी मूळ संख्यांच्या स्वरूपात होत्या. या उलट गणनेसाठी मात्र त्यांचे क्रमवाचक रूपच प्रचलित होते. प्रत्येक संख्या ही विशिष्ट वर्णाक्षराने व्यक्त केली जात असे.

अशा प्रकारचा पहिला पुरवा Phoenician (फिनिशियन) गणन पद्धतीत सापडतो. वाढत्या व्यापारामुळे गणना जास्त गुंतागुंतीच्या होऊ लागल्या होत्या. अशा वेळी या गणना अधिक आटोपशीरपणे, सोप्या रूपात मांडता याव्यात म्हणून ही पद्धत रूढ झाली असावी. हिब्रू व ग्रीक गणना पद्धतीचे मूळ याच फिनिशियन (Phoenician) पद्धतीत आहे. यात शंकाच नाही. ही पद्धत त्यांनी जशीच्या तशी स्वीकारली आहे. मुळाक्षरे व त्यांचे उच्चार यात काडीचाही बदल केला नाही.

दुसरीकडे आजही टिकून असलेली रोमन गणना पद्धत मात्र मूळ संख्या सिद्धांताकडे परतलेली दिसते. तरीही काही दशमान परिमाणांच्या वर्णाक्षर लेखनावर ग्रीक परंपरेचा ठसा उमटलेला दिसतो. उदाहरणार्थ दहा साठी ' X' , शंभर साठी 'C' तर हजारसाठी 'M' या अक्षरांचा वापर केला जातो. इथे (Chaldean) खालडियन व इजिप्शियन चित्रलिपीऐवजी वर्णाक्षरे वापरली असली तरी रोमन गणना पद्धत तिच्या मूळ संख्या सिद्धांतापासून ढळलेली नाही.

क्रमवाचक संख्या सिद्धांतावर आधारलेली ग्रीकांची गणना पद्धत व मूळ संख्यांच्या सिद्धांतावर आधारित रोमन गणना पद्धती– या दोन पद्धतींच्या मिलाफातून अखेर प्राचीन गणना पद्धतीचा विकास झाला. या दोन पद्धतींपैकी कुठली पद्धत श्रेष्ठ आहे? हा प्रश्न इथे अप्रस्तुत ठरतो, कारण निव्वळ वस्तूंच्या परिमाणांची नोंद ठेवण्याच्या मर्यादित उद्देशासाठी गणनक्रियेचा विकास झाला नव्हता. मूळ मुद्दा वेगळाच आहे. या दोन्ही पद्धतींपैकी कुठली पद्धत अंकगणिताच्या क्रियांसाठी जास्त सोपी व प्रभावी आहे हे तपासणे अधिक महत्त्वाचे आहे.

या निकषावर घासून पाहिले तर ग्रीक वा रोमन कुठल्याच पद्धतीला विशेष अग्रक्रम देता येणार नाही. सर्वसामान्य बुद्धिमत्ता असलेल्या व्यक्तीला देखील चटकन समजेल, दैनंदिन जीवनात सहज वापरता येईल असे अंकगणित विकसित करणे दोन्हीही पद्धतींना शक्य झाले नाही. याच कारणामुळे अंकांची नोंद ठेवण्याच्या टप्प्यापासून ते आजच्या स्थानिक मूल्यावर आधारित गणना तंत्राच्या अवस्थेपर्यंतचा गणित शास्त्राचा विकास अतिशय धिम्या गतीने झाला.

यावरून आकडेमोडीसाठी आवश्यक ते नियम शोधण्याचा प्रयत्नच केला गेला नव्हता असा गैरसमज मात्र कोणी करून घेऊ नये. मात्र आरंभीचे हे नियम अतिशय क्लिष्ट व गुंतागुंतीचे असावेत म्हणूनच त्याकाळी हिशेब, आकडेमोड करू शकणाऱ्यांचा समाजात दरारा असे. हे लक्षात घेतले पाहिजे. आकडेमोडीत तरबेज असलेल्या व्यक्तीला दैवी शक्तीचा वरदहस्त लाभला आहे असा विश्वास त्याकाळी समाजात दृढ होता. प्राचीन काळापासून गणिताचा व्यासंग करण्याचा आणि पर्यायाने गणिताचा विकास करण्याचा हक्क फक्त धर्मगुरूंनाच का होता हे कोडं आता उलगडतं. धर्मातील कर्मकांडाशी व गूढ प्रश्नांशी असणाऱ्या अंकगणिताच्या संबंधाविषयी अधिक विस्ताराने पुढे लिहिणारच आहे. Orient ओरिएंट या नावाने ओळखल्या जाणाऱ्या पूर्व आशियातील चीन, जपान भारत इ. देशांच्या संस्कृतीत धर्माच्या कलेकलेने विज्ञानाचा विकास झाला यात नवल वाटण्यासारखे काही नाही. परंतु सर्वज्ञानी ग्रीकांना देखील धर्माच्या शृंखला तोडून अंकगणिताचा विकास साधता आला नाही. अंक आणि त्यांची रूपे यांच्या गूढ सम्मोहनातून त्यांना स्वत:ला व पर्यायाने अंकगणिताला संपूर्ण मुक्ती कधीच मिळवता आली नाही.

आजही काही प्रमाणात आपण अंकाची हुकूमत मान्य करतो. एखाद्याचे गणितातील नैपुण्य तो किती जलद गतीने आकडेमोड करतो यावरूनच ठरविले जाते. "अच्छा, तर तुम्ही गणिती



अनुक्रमणिका

आहात! मग काय आयकर रिटर्नचे गुंतागुंतीचे हिशेब करणं म्हणजे तुमच्या डाव्या हाताचा मळ असणार!'' प्रत्येक गणितज्ञाला आयुष्यात निदान एकदा तरी अशा प्रश्नांना सामोरे जावे लागते. खरे तर या प्रश्नात नशिबाची एक क्रूर थट्टा दडलेली आहे. बहुसंख्य व्यावसायिक गणितज्ज्ञांचे वार्षिक उत्पन्न इतके कमी असते की अत्याधिक उत्पन्नामुळे उद्‌भवणाऱ्या अशा प्रश्नांपासून त्यांची आधीच सुटका झालेली असते.

पंधराव्या शतकातील एका जर्मन व्यापाऱ्याची कथा सांगितली जाते. या कथेची सत्यासत्यता पडताळून बघितलेली नाही पण तिच्या मार्मिकतेमुळे ती इथे कथन करण्याचा मोह होत आहे.

तर या व्यापाऱ्याला एक मुलगा होता. त्याला व्यापारविषयक उच्च शिक्षण द्यावे असा त्या व्यापाऱ्याचा इरादा होता. विद्यापीठातील एका जाणकार, अनुभवी प्राध्यापकांना त्याने या संबंधी मार्गदर्शन करण्याची विनंती केली. त्या प्राध्यापक महाशयांचे उत्तर मोठे मासलेवाईक होते. ''जर तुझ्या मुलाला गणिताचा अभ्यासक्रम फक्त बेरीज व वजाबाकीपुरता मर्यादित ठेवावा असं वाटत असेल तर हे शिक्षण कुठल्याही जर्मन विद्यापीठात मिळू शकेल. पण गुणाकार व भागाकाराच्या कलेत पारंगत व्हायचे असेल तर त्याने इटलीला जावे हेच खरे. कारण या दोन प्रगत कला त्याच देशात विकसित झाल्या आहेत व फक्त तिथल्या विद्यापीठातूनच यांचे शिक्षण दिले जाते.''

वस्तुत: गुणाकार व भागाकाराच्या प्राचीन पद्धतीत व आजच्या प्रचलित पद्धतीत त्यांच्या नावाव्यतिरिक्त काहीही साम्य नाही. उदाहरणार्थ प्राचीन गुणाकार म्हणजेच निरंतर दुप्पट करण्याची (Duplation) क्रिया होय. त्याचप्रमाणे प्राचीन भागाकार म्हणजे Mediation, (अर्थात मध्य काढणे) म्हणजेच संख्येची निमपट करणे. खालील उदाहरणावरून गुणाकाराचे प्राचीन स्वरूप स्पष्ट होईल.

| आधुनिक पद्धत | १३ व्या शतकातील पद्धत |
|---|---|
| 46 | 46 X 2 = 92 |
| X 13 | 46 X 4 = 92 X 2 = 184 |
| 138 | 46 X 8 = 184 X 2 = 368 |
| + 460 | |
| 598 | 368 + 184 + 46 = 598 |

आता आपल्या लक्षात येईल की मानवजात अनेक शतके अबॅकस किंवा टॅली सारख्या साधनांना अट्टाहासाने का चिकटून राहिली ते! आज एक चिमुरडं पोर देखील ज्या गणिती क्रिया सहजतेने आणि झटकन करू शकतं त्याच क्रिया करण्यास पूर्वी तज्ज्ञांची गरज भासत असे. शिवाय आज काही मिनिटातच सोडवता येणाऱ्या गणितांची उत्तरं मिळायला या तज्ज्ञांचे दिवसच्या दिवस खर्च होत असत ते वेगळेच!

आज सर्वसामान्य मनुष्य देखील अंकांशी लीलया खेळू शकतो. किचकट गणिती क्रिया



अनुक्रमणिका

प्रचंड वेगाने व अचूकपणे करू शकतो. अनेकदा मानवाच्या मेंदूच्या विकासाचा पुरावा म्हणून या घटनांकडे बघितलं जातं. पण अंदरकी बात जरा निराळीच आहे. त्या काळी आकडेमोडींचे नियमच खूप जटिल व अवघड होते. साध्या, सोप्या व नेमक्या रीती आत्मसात करण्याची क्षमता त्या नियमात नव्हती. आधुनिक स्थानमूल्यावर आधारित गणना पद्धतीमुळे हे सर्व अडथळे दूर झाले आणि किमान बुद्धिमत्ता असलेल्या व्यक्तीलादेखील अंकगणित सुगम वाटू लागले.

जीवनातील वाढती गुंतागुंत, उद्योग व व्यापार यांचा वाढता विस्तार, स्थावर- जंगम मालमत्तेची मोजणी, गुलामांची खरेदी विक्री, कर वसुलीची समस्या, सैन्याचे नियोजन इत्यादी सर्व जीवनावश्यक बाबींमध्ये गणनेची अधिकाधिक गरज वाटू लागली. कधी या गणना सोप्या असत तर कधी गुंतागुंतीच्या. एक मात्र निश्चित की मानवाची दहा बोटं या सर्व हिशेबासाठी अपुरी पडू लागली. जुन्या, ओबडधोबड, जराही लवचिकता नसलेल्या नियमांना या नवीन गरजा भागवणे अशक्य झाले. पाच हजार वर्षांचा प्रदीर्घ सांस्कृतिक इतिहास लाभलेल्या मानवाने यावर कशी मात केली असेल?

याचे उत्तर म्हणजे अगदी आरंभापासून मानवाला गणनेसाठी कुठल्या ना कुठल्या यांत्रिक उपकरणाची मदत घ्यावी लागली होती. स्थलकालानुरूप याचे रूप वेगळे असले तरी त्यातील सूत्र एकच होते. हे सूत्र काय होते याची कल्पना पुढील उदाहरणावरून येईल. मादागास्करमध्ये सैनिकांची मोजदाद ठेवण्यासाठी त्यांना रांगेने एका अरुंद बोळातून पाठवण्यात येई. प्रत्येक सैनिकासाठी एक खडा एका भांड्यात टाकला जाई. दहा खडे झाले कि दशक स्थानासाठी असलेल्या भांड्यात एक खडा टाकला जाई. दशकाच्या ढिगात दहा खडे जमले कि शतकासाठी एक खडा ठेवला जाई. इ. इ. सैनिकांची मोजणी पूर्ण होईपर्यंत ही क्रिया चालू राही.

या तंत्राची पुढची पायरी म्हणजेच अबॅकस किंवा गणना-पाटी! जिथे जिथे म्हणून हिशेब ठेवण्याचे तंत्र अस्तित्वात होते तिथे तिथे, त्या सर्व देशात कुठल्या ना कुठल्या रूपात ही साधने आढळली आहेत. अबॅकस म्हणजे उभ्या सळ्यांची रांग असलेली चपटी चौकट. यातील प्रत्येक सळई चढत्या क्रमाने दशमान एकक (एक, दश, शत, सहस्त्र, इ.) व्यक्त करते. प्रत्येक सळईत त्या त्या दशमान घटकाची किंमत दर्शवणारे मणी अगर चकत्या ओवलेले असतात. आता समजा ५७४ ही संख्या अबॅकस वर दाखवायची असेल तर पहिल्या सळईतले ४ मणी सळईच्या दुसऱ्या टोकाकडे नेतात. दुसऱ्या सळईतले सात व तिसऱ्या सळईतले पाच मणी दुसऱ्या टोकाकडे नेतात.

निरनिराळ्या देशातील अशा गणना पाट्या बघितल्या की त्यात फरक आढळतो तो फक्त सळ्या व मणी अगर चकत्या कुठल्या पदार्थापासून बनलेल्या आहेत एवढाच ! ग्रीक व रोमन सुटे मणी, खडे अगर चकत्या वापरत असत. चीनमधील "सुआन पॅन" (Suan Pan) या गणना पाटीत बांबूच्या लवचिक सळ्यांवर सरकते गोळे असत. रशियातील (Szczety) स्झेक्झेटी वर चीनमधील पाटीप्रमाणे लाकडी चौकटीत जाड तारा रांगेत बसवलेल्या असत व

त्यात सरकती बटणं ओवलेली असत. भारतातील प्राचीन धूळपाटी देखील या अबॅकसचेच रूप असावी. मणी अगर गोट्या यांची भूमिका धुळीत कोरलेल्या पुसता येण्याजोग्या खुणा पार पाडत असाव्यात.

अबॅकस (Abacus) या शब्दाची निश्चित व्युत्पत्ती काय ते ज्ञात नाही. सेमिटिक भाषेत Abae म्हणजे धूळ म्हणून हा शब्द सेमिटिक भाषेतून आला असावा असे एक मत आहे, तर आणखी एका मतानुसार याची व्युत्पत्ति ग्रीक भाषेतून झाली असावी कारण ग्रीक भाषेत Abax म्हणजे दगडी चीप. हे साधन ग्रीस देशात सर्वत्र वापरले जात असे. या साधनाचा उल्लेख हेरोडोट्स व पॉलीबियस यांच्या लिखाणातही आढळतो. हेरोडोट्स हा महान ग्रीक इतिहासकार होता. त्याला "इतिहासाचा जनक" असेही म्हटले जाते. पॉलीबियसने मेसेडोनियाचा राजा फिलीपच्या (द्वितीय) शासन कारभाराविषयी आपल्या हिस्टोरिया (Historia) या ग्रंथात टिप्पणी केली आहे. तो म्हणतो, "ज्याप्रमाणे गणना पाटीतील मणी गणना करणाऱ्या व्यक्तीच्या लहरीनुसार कधीतरी बुद्धिमत्तेचे तेजस्वी प्रतीक ठरतात तर कधी ते निव्वळ गोटे भासतात त्याप्रमाणे राजाचे दरबारी त्याच्या इशाऱ्यावर नाचताना कधी वैभवाच्या अत्युच्च शिखरावर असल्यासारखे भासतात तर पुढल्याच क्षणी ते अखिल मानवजातीच्या करुणेचा विषय असल्यासारखे वाटू लागतात."

आजही रशियातील खेड्यातून व चीनमध्ये सर्वत्र गणना पाटीचा वापर करतात. हे साधन अत्याधुनिक गणकयंत्राच्या स्पर्धेत आजही टिकून आहे. पश्चिम युरोप व अमेरिकेत मात्र हा एक कुतूहलाचा विषय बनला आहे. भारतातही फारच थोड्या लोकांनी ही गणना पाटी बघितली असेल. आता तर हिचे दर्शन चित्रातून देखील क्वचितच घडते. केवळ काही शतकापूर्वीच या साधनाचा आपल्या देशात सर्वत्र सर्रास वापर होत असे हे फार थोड्या लोकांना ठाऊक असेल.

स्थानिक मूल्याच्या आविष्कारापर्यंतचा आकडेमोडीचा इतिहास बघितला की या प्रगतीच्या अत्यल्प प्रमाणाशी ठेचकाळल्याशिवाय रहात नाही. तब्बल पाच हजार वर्षांच्या या कालखंडाने अनेक संस्कृतींचा उदय व ऱ्हास बघितला. प्रत्येक संस्कृतीने मागे ठेवलेल्या साहित्य, तत्वज्ञान, कला व धर्माच्या खुणा याने बघितल्या. पण मनुष्याला सर्वप्रथम अवगत झालेल्या पहिल्या वहिल्या हिशेबाच्या कलेत त्याने कुठवर मजल मारली? त्याची या क्षेत्रातील एकूण उपलब्धी किती आहे? तर अजिबात लवचिकता नसलेली एक क्लिष्ट गणना पद्धती व प्रचंड मर्यादा असलेले गणनापाटीसारखे एक साधन की ज्यामुळे साध्या साध्या गणिती क्रिया देखील तज्ज्ञांच्या मदतीशिवाय करता येत नसत. हे सर्व जाणूनही मानव हजारो वर्षं हे साधन वापरत राहिला. त्यात कुठलीही सुधारणा करण्याचा त्याने प्रयत्न केला नाही. निदान साधनाची उपयुक्तता वाढविण्याच्या दृष्टीने देखील एकही नवीन कल्पना त्याने लढवली नाही. हे सर्व अचंबित करणारे आहे.

ही टीका जरा कडक वाटतेय खरी. आजच्या अतिशय वेगवान प्रगतीची आणि भरगच्च

घटना मालिकेची फूटपट्टी वापरून आदिमानवाच्या प्रगतीचे, सिद्धीचे मूल्यमापन करणे चुकीचे आहे हेही कबूल. मध्ययुगातील इ. स. ५७० ते इ. स. ९०० हा कालखंड "काळे युग" (Dark Age) म्हणून ओळखला जातो. या कालखंडात जगभरात सर्व ज्ञानशाखांचा विकास खुंटल्यासारखा झाला होता. या काळात इतर सर्व क्षेत्रात प्रगतीची जी काही नगण्य हिरवळ उगवली होती त्या तुलनेत गणनेचे क्षेत्र मात्र ओसाड, सुस्त वाळवंटाप्रमाणे वाटते.

ही पार्श्वभूमी बघता याच युगाच्या आरंभीच्या शतकात काही अज्ञात हिंदू गणितींनी स्थानमूल्य सिद्धांतावर आधारित अंकगणिताचा जो शोध लावला, त्याचा गणिताच्या जागतिक इतिहासात मोठा वाटा आहे. या सिद्धांतामुळे आकडेमोडीची पद्धत आमूलाग्र बदलली. एवढंच नाही तर या सिद्धांताशिवाय गणिताचा विकासदेखील शक्य झाला नसता. शिवाय हा सिद्धांत इतका सोपा आहे की एखादा मठ्ठ विद्यार्थी देखील तो विनासायास ग्रहण करू शकतो. आपल्या संख्याभाषेतूनही हा सिद्धांत अल्पांशाने सूचित होत असतो. खरं तर असं वाटतं जणू गणनापाटीची क्रिया लिखित अंकांच्या भाषेत रुपांतरित करण्याच्या पहिल्या-वहिल्या प्रयत्नातूनच या स्थानमूल्याच्या सिद्धांताचा शोध लागला असावा. प्राचीन ग्रीसमधील थोर गणिती गणिताच्या प्रवासातल्या या महत्त्वाच्या टप्प्यावर थबकले देखील नाहीत ही वस्तुस्थिती बुचकळ्यात टाकणारी आहे. सैद्धान्तिक गणिताचे कूट प्रश्न तर्काच्या मदतीने सोडविण्यात ग्रीक गणिती नेहमी मग्न असत. त्यामुळे प्रत्यक्ष निरीक्षणे, प्रयोग करून नियमाची सत्यासत्यता तपासणे इत्यादि क्रियाविषयी त्यांच्यात काहीशी नावड निर्माण झाली होती. या नावडीचे पर्यवसान पुढे व्यवहारीपयोगी विज्ञान शाखांबद्दल प्रचंड तिटकारा वाटण्यात झाले. प्रत्यक्ष कृतीवर आधारित कुठलेही काम त्यांना बिनमहत्त्वाचे व क्षुल्लक वाटू लागले. म्हणूनच की काय त्यांनी आपल्या मुलांचे शिक्षणही गुलामांवर सोपवले? गुलामांचा जन्मच मुळी अगदी हलकी, क्षुल्लक कामे करण्यासाठी असतो अशी ग्रीक समाजाची भावना होती. पण हे सर्व खरे मानले तर ज्या देशाने जगाला भूमितीची महान देणगी दिली त्या देशात प्राथमिक स्वरूपाचे का होईना पण बीजगणित निर्माण होऊ शकले नाही हे कसे काय घडले? बीजगणिताचा शोध देखील भारतातच आणि तोदेखील साधारण स्थानमूल्य सिद्धांताच्या बरोबरीनेच लागावा हेही एक आश्चर्यच नाही का?

आपल्या आधुनिक गणन क्रियेच्या रचनेचे सूक्ष्म अवलोकन केल्यास कदाचित या प्रश्नाचे उत्तर सापडेल. स्थानमूल्य सिद्धांत म्हणजे कुठल्याही संख्येतील एखाद्या अंकाला त्याच्या नैसर्गिक मूल्याच्या जोडीने, इतर अंकाच्या तुलनेत असलेल्या त्याच्या स्थानाप्रमाणे मूल्य बहाल करणे. उदाहरणार्थ ३४२, ७२५ व २६९ या तीन संख्यांमध्ये २ या अंकाचे स्थानमूल्य अर्थात किंमत निरनिराळी आहे. पहिल्या संख्येत २चे स्थानमूल्य आहे २, दुसऱ्या संख्येत २० तर तिसऱ्या संख्येत २०० वस्तुत: ३४२ हे तीनशतक अधिक चार दशक अधिक दोन एकक याचे संक्षिप्त रूप आहे. ( 342 = 300 + 40 +2 ) हीच गणना पाटीची रचना असते. गणना पाटीत ३४२ ही संख्या पुढीलप्रमाणे दिसेल.

गणितातील आजच्या आपल्या अवस्थेपर्यंत पोचण्यासाठी गणना पाटीच्या या रचनेचे अंकांच्या भाषेत रूपांतर करणे पुरेसे आहे हे आधी सांगितले आहेच.

पण हो! एक अडचण आहे. गणना पाटीवर केलेली क्रिया लिहायची झाली की ≡ आणि = या खुणांचा अर्थ ३२,३०२,३००२,३०२० वगैरे काहीही होऊ शकतो. ही संदिग्धता टाळण्यासाठी, मधली रिक्तजागा भरण्यासाठी एखादी रीत शोधणे आवश्यक आहे. अर्थात रिक्त स्थान दर्शविण्यासाठी नवीन चिन्हाचा शोध लावणे आवश्यक आहे.

रिक्त स्तंभ निर्देशित करण्यासाठी आरंभी एक टिंब ( . , dot ) व नंतर एक छोटे लंबवर्तुळ ( 0 ) योजले गेले. यामुळे ३०२,३००२ या संख्यांमधील फरक लेखी स्वरूपात स्पष्ट करणे सापे झाले. उदाहरणार्थ –

302 = ≡ . =

3002 = ≡ . . =

आरंभी या चिन्हाचा उपयोग फक्त दोन अंकांच्यामधील रिक्त स्थान दर्शविण्याकरता केला जातं असे. संख्येच्या शेवटी हे चिन्ह वापर नसत. ख्रिस्तपूर्व १०० वर्षे ते इ. सन १५०च्या दरम्यान भारतात या पद्धतीचा आरंभ झाला. हा काही जाणीवपूर्वक लावलेला गणितातला शोध नव्हता. ही होती शुद्ध व्यावहारिक पातळीवर केलेली सोय. O या चिन्हासाठी हिंदूचा शब्द आहे. "शून्य" अर्थात रिक्त. या चिन्हाला "काही नाही" हा आजचा अर्थ फेरविचारांती चिकटवला गेला. व्यावहारिक अडचणींवर मात करण्याच्या दृष्टीने उचललेल्या या पावलाने अंकगणितात एका नव्या युगाचा श्रीगणेशा केला हे सर्वज्ञात आहे. खुद्द हिंदूंना मात्र आपल्या या योगदानाची महती संपूर्णपणे पटली होती की नाही कोण जाणे! हिंदूंनी ही देणगी अगदी सहजपणे गणिताला देऊन टाकली. याचं कारण म्हणजे हिंदूची गणिताविषयीची प्रज्ञा अनुभव व अंत:स्फूर्तीतून जन्म घेत असे. एखादी संकल्पना सुचली की ती व्यवहाराच्या निकषावर घासून तपासली जात असे. व्यवहाराच्या कसोटीवर खऱ्या उतरलेल्या कुठल्याही नवीन संकल्पनेसाठी त्यांना अनुमानसाध्य उपपत्तीची (Deductive Proof) गरज भासत नसे. या उलट ग्रीक पंडितांचा भर तर्कावर आधारित दाखले व पुराव्यांवर असे.

ग्रीकांच्या तुलनेने अप्रगत अशा हिंदूनी हा क्रांतिकारी शोध कसा लावला याचे समर्पक उत्तर देणे अशक्य आहे. पण या प्रश्नाचा मागोवा घेत उत्तर शोधण्याचा प्रयत्न करणे काही अवघड नाही. एक तर्क असा की प्राचीन ग्रीकमधील प्रतिभासंपन्न गणिती एका समृद्ध संस्कृतीचे घटक होते. या संस्कृतीची स्वत:ची, पूर्वापार प्रचलित अशी अंकलेखन लिपी अस्तित्वात होती. लांबलचक क्लिष्ट आकडेमोड करण्याची कधी मानवाला आवश्यकता भासेल अशी कल्पना त्या अंकलिपीच्या रचनाकारांना नसावी. त्यामुळे या अंकलिपीचा तिच्या सर्व मर्यादासकट वापर करणे या ग्रीक विद्वानांना भाग पडले असावे. मोठमोठ्या संख्यांचा व्यापारादि व्यवहारात सर्रास वापर सुरू होईपर्यंत ज्यांनी अंक लेखीस्वरूपात मांडले नसतील अशा समकालीन, अप्रगत

संस्कृतीनेच विकासाच्या दिशेने धाडसी पाऊल उचलणे स्वाभाविक होते. रोमन साम्राज्याच्या काळात मोठ्या प्रमाणावर आंतरराष्ट्रीय व्यापाराची सुरुवात झाली होती. हिंदू गणितींवर कर आकरणी, कर्ज, व्याज, मुद्दल यांचे हिशेब मांडण्याची वेळ वारंवार येत असे.

पुन्हा एकदा "शून्याचा वापर सर्व प्रथम व्यवहारी लोकांनी कां केला असावा? प्राचीन ग्रीक गणितज्ज्ञांना ही कल्पना कां सुचली नाही?" या प्रश्नांना वाचा फुटते. याचे उत्तर शोधण्यासाठी काही मोजक्या प्रतिभावंतांच्या बौद्धिक जडणघडणीवर लक्ष केंद्रित करून भागणार नाही. त्यासाठी हे प्रतिभावंत ज्या सामाजिक चौकटीत बंदिस्त होते, त्यांच्या विचारशक्तीच्या पायात परंपरेच्या ज्या शृखंला होत्या, त्यांची देखील दखल घ्यावी लागेल. आणखी एक तर्क असा की इ.सन १००सालापर्यंत भारतात जशी ऐतिहासिक परिस्थिती होती, तशा परिस्थितीचा टप्पा ग्रीकांनी फार पूर्वी ओलांडला असण्याची शक्यता आहे. आज कदाचित सोविएत रशिया किंवा अन्य देश इतिहासाच्या त्या टप्प्यात असतील. संस्कृतीच्या इतिहासात एखाद्या वळणावर एखाद्या 'रांगड्या' जमातीचा अवचित उदय क्रांती घडवून इतिहासाचे वळणच बदलून टाकतो. अशा 'रांगड्या' संस्कृतीतील "अडाणी" प्रथांची निवड करण्याचा इतिहासाचा उफराटा न्याय शहाण्यासुरत्या माणसांना संभ्रमात टाकतो. हे सार्वत्रिक सामाजिक सत्य ग्रीक गणितज्ञांना पचवता आले नाही. त्यांना ही निवड अविचारीपणाने केल्यासारखी वाटली.

शून्य अर्थात ० च्या शोधामुळे मानवी प्रज्ञा गणना पाटीच्या बंदिस्त चौकटीतून मुक्त झाली. रिक्त स्तंभासाठी योग्य चिन्हाची निवड होताच कागद, पाटी किंवा इतर कुठल्याही लेखन साधनावर "हातचा घेणे" हे गणना पाटीवरच्या समानार्थी क्रियेइतकेच सुलभ झाले.

या संख्या चिन्हाचा शोध लागल्याखेरीज गणिताचा विकास होणे शक्यच नव्हते. हे आता स्पष्ट झाले आहे. "काही नाही" किंवा "रिक्त" यासाठी चिन्ह शोधणे अगर संख्या म्हणून "रिक्त (पोकळी)" चा स्वीकार करणे ग्रीकांना शक्य नव्हते. त्यांना फक्त ठोस संकल्पनांचा विचार करण्याची सवय होती. अंकगणिताच्या चार प्राथमिक क्रिया असतात. बेरीज, वजाबाकी, गुणाकार व भागाकार. शून्याला संख्येचा दर्जा लाभल्याबरोबर या गणिती क्रियांचे नियमच बदलून गेले. उदाहरणार्थ –

| | | |
|---|---|---|
| $5 + 1 = 6$ | तर | $5 + 0 = 5$ |
| $5 - 1 = 4$ | तर | $5 - 0 = 5$ |
| $5 \times 1 = 5$ | तर | $5 \times 0 = 0$ |
| $5 \div 1 = 5$ | तर | $5 \div 0 = 0$ |

ही क्रियाच शक्य नसते. एकूण काय तर शून्याच्या आगमनाने आपली गणिती बैठक उद्ध्वस्त होईल या भीतीने ग्रीकांनी त्याचा स्वीकार केला नाही. शून्याचा शोध लावणाऱ्या अज्ञात हिंदूंनाही शून्य चिन्हाचा "काही नाही" असा अर्थ अभिप्रेत नव्हता. शून्य ही हिंदूंची संज्ञा "रिक्त" रिकामी जागा या साठी होती. त्यात "पोकळी" किंवा "काही नाही" असा

गर्भितार्थ नव्हता. सर्व बाजूंनी विचार करता शून्याचा शोध हा अपघात होता. गणना पाटीवरच्या नोंदी नि:संदिग्धपणे लिखित स्वरूपात ठेवण्याचा तो एक प्रयत्न होता.

हिंदूंचे ''शून्य'' आजच्या गणितातला 'Zero' म्हणून कसा रुजला हा सांस्कृतिक इतिहासाचा एक मनोरंजक अध्याय म्हणता येईल. दहाव्या शतकात हिंदूंचे अंकगणित अरबांनी स्वीकारल्यानंतर या शून्याचे त्यांनी ''सिफर'' हे अरबी भाषांतर केले. ''सिफर'' म्हणजे ''रिक्त''. इटली देशाचा या हिंदू , अरबी गणिताशी परिचय झाल्यावर या सिफरचे लॅटिनीकरण झाले व Zephirum हा शब्द योजला गेला. हे घडले तेराव्या शतकाच्या आरंभी. पुढील शंभर वर्षाच्या कालावधीत या शब्दात महदंतर घडले व इटालियन भाषेतला Zero जन्मला. याच सुमारास जॉर्डेनस नेमेरेरियम (Jordanus Nemerarium) जर्मन भाषेत हे अरबी गणित समजावून सांगण्याच्या प्रयत्नात होता. त्याने मूळ अरबी शब्द सिफर मध्ये किंचित बदल करून सिफ्रा (Cifra) म्हणून तो जर्मन भाषेत रूढ केला. एकोणिसाव्या शतकातील शेवटचा महान गणिती म्हणून ज्याचा उल्लेख करता येईल अशा गॉस याच्या लॅटिनमधील लिखाणात 'सिफ्रा' (Cifra) हा शब्द शून्य या अर्थाने वापरलेला आढळतो. यावरून युरोपमधील विद्‌वज्जनांच्या वर्तुळात ''सिफ्रा'' व त्यातूनच पुढे व्युत्पन्न झालेला झीरो 'Zero' हे शब्द शून्य या अर्थाने प्रचलित होते हे दिसून येते. इंग्रजी भाषेत सिफ्रा (Cifra) ने ''साइफर'' (Cipher) हे रूप घेतले आहे व त्यातील शून्य हा मूळ अर्थ ध्वनित होतो.

या नवीन चिन्हाकडे बघण्याचा सामान्य लोकांचा दृष्टिकोन मात्र जरा संशयमिश्रित होता. साइफर हा शब्द युरोपमध्ये रूढ झाल्यानंतरही सामान्य लोक याचा अर्थ गूढ सांकेतिक चिन्ह असाच लावीत असत. मात्र कालांतराने हा गर्भितार्थ हळूहळू लोप पावाला व साइफर आजच्या शून्य या अर्थाने वापरात आला. डिसाइफर (Decipher) म्हणजे सांकेतिक भाषेचा अर्थ लावणे या शब्दाच्या रूपात साइफरचा तत्कालीन अर्थ काय होता याची साक्ष पटते.

नवीन अंकगणिताच्या क्षेत्रात शून्याची कामगिरी सामान्य माणसांच्या नजरेतून सुटली नाही. शून्याचा परिचय झाल्यानंतर गणिताचा विकास झपाट्याने झाला. सामान्यजनांनी गणित ही ज्ञान शाखा व तिचे महत्त्वाचे लक्षण शून्य यांची एकरूपता मान्य केली. Ziffer, Chiffra इ. विविध रूपांपासून ते युरोपमध्ये सध्या प्रचलित Zero चा अर्थ ''सांकेतिक गूढ चिन्ह'' असा न राहता ''०, संख्यादर्शक शब्द'' हा अर्थ कसा प्राप्त झाला हे यावरून स्पष्ट होते.

सामान्यजनांनी ''०, संख्या दर्शक शब्द'' असा Cifra चा लावलेला अर्थ व विद्वानांना "Zero म्हणजे रिक्त'' हा अभिप्रेत असलेला Cifra चा अर्थ या दोन अर्थांनी काही काळ गोंधळ उडवून दिला होता. पंडितांनी या शब्दाच्या अर्थाचे पुनरुज्जीवन करण्याचा क्षीण प्रयत्न केला पण व्यर्थ! शून्यांक या त्याच्या अर्थाने तोपर्यंत खोलवर मुळे रुजवली होती. लोकमतापुढे नमते घेऊन तज्ज्ञांनी शून्याच्या सध्या प्रचलित असलेल्या अर्थाला अखेर मान्यता दिली व हा वाद संपुष्टात आला.

ॲल्गोरिथम (Algorithm) हा असाच एक मनोरंजक शब्द! हा शब्द आपण गणिती समस्या सोडवण्याच्या एका विशिष्ट क्रमवार क्रियांच्या समूहासाठी वापरतो. अनेक पायऱ्यांच्या या क्रमात आधीच्या पायरीमुळे पुढची पायरी ठरवली जाते. मात्र दहाव्या ते पंधराव्या शतकात हा शब्द स्थानमूल्यावर आधरित संख्या वाचनासाठी वापरला जात असे. ॲल्गोरिथम हा शब्द अल् कोरेस्मी ( Al Kworasmi) याचा अपभ्रंश आहे. अल् कोरेस्मी हा नवव्या शतकातील एक प्रसिद्ध, अरबी गणिती होता. युरोपमधील गणिताचे पहिले पुस्तक म्हणजे अल् कोरेस्मीच्या पुस्तकाचे लॅटिन भाषांतर होय.

स्थानमूल्यावर आधारित संख्यावाचन आता आपल्या अंगवळणी पडलं आहे. ते आपल्या जीवनाचा एक भाग झालं आहे. या पद्धतीचे श्रेष्ठत्व, अंक लिहिण्यात आलेला आटोपशीरपणा, त्यामुळे गणनक्रियेत आलेली सहजता व सफाई या सर्वांमुळे असं वाटतं की या पद्धतीचा स्वीकार एकमताने व उत्स्फूर्तपणे झाला असावा. पण अबॅकसचा पुरस्कार करणारे परंपरावादी गणिती व नवीन पद्धतीची बाजू उचलून धरणारे ॲल्गोरिस्ट (Algorists) यांच्यात अकराव्या शतकात सुरू झालेला वाद पंधराव्या शतकापर्यंत चालू होता. इतर कुठल्याही सुधारणेच्या मार्गात येणाऱ्या सर्व अडचणी, प्रतिक्रिया या बदलाच्या वेळी देखील सक्रिय झाल्या. काही ठिकाणी फक्त सरकारी कागदपत्रात अरेबिक संख्या पद्धतीचा वापर करण्यावर बंदी होती. तर काही ठिकाणी या संख्या पद्धतीस संपूर्ण मज्जाव होता. इतिहासाच्या अलिखित नियमाप्रमाणे अशाप्रकारे बंदी घालून अगर बहिष्कार टाकून अरबी संख्या पद्धती कधीच नष्ट करता आली नाही. उलट या पद्धतीचा गुप्तपणे प्रसार होण्यास मदतच झाली. इटलीच्या पुरातत्त्व विभागात तेराव्या शतकातले असे अनेक पुरावे मिळतात. त्याकाळी अनेक व्यापारी अरबी संख्या पद्धतीचा सांकेतिक भाषेसारखा वापर करीत असत.

या विरोधामुळे काही काळ का होईना पण या संख्या पद्धतीचा विकास खुंटला. प्रगतीचा वेग मंदावला. या संक्रमण काळात गणन कलेच्या क्षेत्रात लक्षणीय परिणाम साधणारी अगर स्वतःचे विशिष्ट मूल्य असणारी कुठलीच भरीव कामगिरी होऊ शकली नाही. अंकांचे बाह्य रूप मात्र टप्प्याटप्प्याने बदलत गेले. या बदलामागे देखील सुधारणेची निश्चित अशी प्रेरणा, दिशा नव्हती. तर त्याकाळी सर्व क्रमिक पुस्तके हस्तलिखित असल्यामुळे अंकांच्या रूपात बदल झाला. मुद्रण कलेचा शोध लागेपर्यंत अंकांना स्थायी रूप प्राप्त होऊ शकले नव्हते. मुद्रणकलेचा प्रभाव अंकांच्या रूपावर असा काही पडला आहे की पंधराव्या शतकात असलेले अंकांचे लेखी रूप आजही कायम आहे.

ॲल्गोरिस्टना (Algorist) अंतिम यश कधी मिळालं तो दिनांक काही निश्चित सांगता येणार नाही. सोळाव्या शतकाच्या आरंभी नवीन गणना पद्धतीचे श्रेष्ठत्व निर्विवादपणे सिद्ध झाले होते हे आपल्याला ठाऊक आहे. या काळापासून गणिताच्या प्रगतीत कसलेही अडथळे आले नाहीत. त्यामुळे दशमान पूर्णांक व अपूर्णांक यासाठीचे गणन क्रियांचे सर्व नियम व्यवहार

दृष्ट्या पूर्णत्वाला पोचले. आजही तेच नियम आपण शाळांमधून शिकवतो.

आणखी एक शतक लोटले आणि अबॅकसचे सर्व समर्थक असे काही विस्मृतीच्या पडद्याआड गेले की युरोपमधील अनेक लोक स्थानमूल्याधारित गणना पद्धती हा आपल्याच देशाने लावलेला शोध आहे असे ठासून सांगू लागले. एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धात जर्मनीत या अरेबिक अंकांना Deutsche म्हणून संबोधले जात असे. हेतू हा की परदेशात उगम पावलेल्या रोमन अंकांपेक्षा त्यांचे वेगळेपण स्पष्ट करता यावे.

अबॅकसबद्दल बोलायचे झाले तर पश्चिम युरोपमध्ये अठराव्या शतकात याचा मागमूसही आढळत नाही. मात्र एकोणिसाव्या शतकात अति विचित्र अशा परिस्थितीत याचा पुन्हा प्रसार झाला. नेपोलियनचा एक सेनापती व गणिती Poincelet ला रशियाच्या स्वारीवर असताना अटक झाली. पुढील अनेक वर्षे तो युद्धकैदी म्हणून अटकेतच रशियात होता. फ्रान्सला परतल्यावर इतर अनेक वस्तूंबरोबर त्याने अबॅकसची रशियन आवृत्ती स्वत:बरोबर आणली. पुढील अनेक वर्षे Poincelet ने आयात केलेली ही वस्तू "रानटी लोकांनी शोधलेले उपकरण" म्हणून कुतूहलाने, विस्मयाने बघण्याची एक प्रेक्षणीय वस्तू होऊन राहिली होती.

सबंध राष्ट्राचा असा स्मृतिभ्रंश झाल्याची उदाहरणे इतिहासात विपुलतेने आढळतात सुशिक्षितांपैकी आजही किती लोक हे जाणतात की अवघ्या चारशे वर्षांपूर्वीचा सामान्य माणूस बोटांच्या मदतीनेच गणना करत असे व गणना पाटी वापरणे ही फक्त व्यावसायिक गणितींची मक्तेदारी होती.

गणना पाटीवर रिक्त स्तंभात, सर्व शक्याशक्यता तपासून केलेली भारतीय शून्याची योजना हे गणितातील प्रगतीचे महत्त्वाचे वळण ठरले आहे. या योजनेशिवाय आधुनिक विज्ञान, उद्योग अगर व्यापारात झालेली प्रगती अशक्यच नव्हे तर अतर्क्य वाटते. या महान शोधाचा प्रभाव कधीच फक्त अंकगणितापुरता मर्यादित नव्हता. व्यापक संख्या संकल्पनेचा मार्ग सुकर करून देण्याबरोबरच गणिताच्या प्रत्येक शाखेत या शून्याने मूलभूत आणि म्हणूनच महत्त्वाची भूमिका बजावली आहे.

संस्कृतीच्या इतिहासात शून्याचा शोध हा मानवजातीने लावलेल्या अनेकविध शोधात सर्वात महान शोध म्हणून वेगळा शोभून दिसतो.

एक महान शोध! होय खरं आहे. पण मानवाच्या जीवनावर प्रभाव टाकणाऱ्या आरंभीच्या इतर शोधांप्रमाणे हा शोध म्हणजे अथक परिश्रम व कष्टाचे फळ नाही तर दैवयोगाने मिळालेले हे बक्षीस आहे.

---

चांगली पुस्तकं वाचणं म्हणजे गतकाळातील विद्वानांशी, प्रतिभावंतांशी संवाद साधण्यासारखंच आहे. **–रेने देकार्त**

# वास्तवापासून दूर

## श्री. ह. देशपांडे

'स्वर्ग लोकातून प्राप्त केलेले आणि मानवाच्या दृढ परिचयाचे झालेले संगीत हे सर्वश्रेष्ठ लौकिक सत्य होय.' जोसेफ अॅडीसन.

संगीत आणि इतर कलांचा आस्वाद घेण्याची बाब आपल्या सामान्य जीवन व्यवहारापासून काहीशी बाजूला ठेवली जाते. त्याच्यासाठी आपण वेगळा वेळ काढून ठेवतो आणि त्यात आपल्याला हवे ते मिळते की नाही हे पाहण्यासाठी मैफिलीत आणि कलादालनात हजेरी लावतो. अशिक्षित समाजात कलांचा संबंध सामान्य जीवनाशी अधिक जवळचा असतो. पाश्चात्य लोकांत मात्र त्यांचे विशिष्ट स्थान असून जीवनावश्यक समजण्यापेक्षा त्यांना ऐषारामाचे जणू स्वरूप येते. यामुळे संगीत आणि इतर कला या वास्तवापासून दूर किंवा त्याला पर्याय म्हणून त्यांना मानाव्या लागतील असाही असमंजस दावा करणे शक्य होते. त्यातल्या त्यात ह्या निष्कर्षाशी माझा अर्थातच विरोध आहे. तथापि काही मनोविश्लेषण विशारदांनीही तसेच मत मांडले असल्याने ते चुकीचे कसे आहे हे ठरविण्यासाठी त्यांचे विचार तपासणे गरजेचे वाटते.

'फ्राइड' हा भरपूर वाचन केलेला असामी होता. त्याला साहित्याची चव होती. शाळेत असताना वर्गात ओळीने सहा वर्षे तो पहिला असायचा. त्याच काळात 'लॅटीन' आणि 'ग्रीक' अभिजात वाङ्मयाशी त्याचा परिचय झाला. त्याने हिंदू, इंग्लिश, फ्रेंच तसेच काहीशा इटालियन आणि स्पॅनिश भाषांचा अभ्यास केला होता. 'शेक्सपिअर' आणि 'गोथे' हे त्याचे आवडते ग्रंथकार असत. पण 'डोस्टोएव्हस्की' हा शेक्सपिअरच्या फारसा मागे नव्हता. आणि त्याची 'ब्रार्ल्स कॅरामॅझोव' ही कादंबरी उत्कृष्ट कलाकृती आहे असे त्याचे मत होते. तो स्वत: एक शैलीकार लेखक म्हणून मानला जात असे. आणि साहित्याबद्दल एकदा त्याला पारितोषिकही मिळाले होते. शिल्प आणि काहीशी चित्रकलेतही त्याला गती होती. मात्र एवढे खरे की, संगीतात आपल्याला काही रस नाही, अशी कबुली त्याने आपल्या 'दि मोझेस ऑफ मायकेल अन्जेलो'च्या प्रारंभाच्या प्रस्तावनेत दिली आहे. त्याचा पुतण्या हॅरी लिहितो –

"संगीताचा त्याला तिटकारा वाटे आणि कामातली ती एक केवळ अडचण आहे असे समजत असे. तसे पाहिले तर सगळे फ्राईड कुटुंबच संगीताबाबतीत अरसिक होते."

असे वैगुण्य असूनही 'फ्राईड' हा सुसंस्कृत गृहस्थ होता. आपल्याला आवडणाऱ्या कलावंत आणि लेखकांचे त्याला कौतुक वाटत असे. कलावंतांविषयी त्याने केलेले मतप्रदर्शन हे प्रथम दर्शनी अप्रशस्त वाटले तरी ते त्यांच्या मनोविश्लेषणविषयक उपपत्तीचे द्योतक आहे हे लक्षात आले म्हणजे त्याचे नवल वाटणार नाही.

उपद्रवी संवेदनांपासून मुक्त व्हावे यासाठी माणसाचा जीव एकसारखा धडपडत असतो.



अनुक्रमणिका

अशी फ्राईडची मूलभूत कल्पना आहे. ह्या पुस्तकाच्या दुसऱ्या प्रकरणात उल्लेख केल्याप्रमाणे अशा बाह्य आणि आंतरिक संवेदनापासून सुटका करणारे मज्जासंस्था हे उपयुक्त साधन आहे. असा विचार त्याने मांडला आहे. ह्यावरून मग ठरते ते असे की, कोणताही ताण नसलेली, शांत अशी मनाची अवस्था, हीच आदर्श म्हणून म्हटली पाहिजे.

फ्राईडच्या म्हणण्याप्रमाणे अशा अवस्थेचा नमुना फक्त संतृप्त बालकांत मिळतो. आई आणि तिचे अपत्य यांच्या संदर्भात दोन्हीकडून प्रेरणा, जागृती आणि आल्हाददायक संमीलन आढळून येते. तथापि त्यांच्या मनोविश्लेषणाने जागृतीच्या अवस्थेकडे दुर्लक्ष करून केवळ संमीलनावर भर दिला आहे. त्यामुळे त्याने कल्पिलेले निर्वाण हे अर्भकावस्थेत आईच्या स्तनातून तारुण्यात संभोगाने, आणि अखेरीला शांतीचे आगमन सुचविणारे कबरस्थान यानेच लाभू शकते.

"आईच्या अंगावरचे बालक स्तनपान केल्यानंतर निद्रेच्या आहारी सुखाने जात असताना ज्यांनी पाहिले असेल, त्याच्या गालावरील स्मित पाहिले असेल, त्यांना ते चित्र त्यांच्या पुढील उमेदीच्या वयातील कामपूर्तीची पुसटशी का होईना जाणीव करून दिल्याखेरीज राहणार नाही."

कामवासनेच्या तृप्तीत स्त्रीपुरुषांच्या समाधानी जीवनाचा उगम असतो, असे आपले मत फ्राईड एकसारखे मांडीत आला आहे. तरीसुद्धा कामवासनेचे संपूर्ण शमन होणे हे अवघड आहे असेही तो म्हणतो. आपली संस्कृतीच जुलूम करते आणि व्यक्तिमनावरव बंधन लादते. मग या संस्कृतीचे आदर्श पाळायचे म्हणून त्याला आपल्या कामतृप्तीचे रूपान्तर कामविरहित अशा छंदात करणे भाग पडते. पण हा केवळ उपद्रवापासून स्वत:ला सांभाळून घेण्याचा प्रकार, एक सोज्वळ पर्याय असतो.

अर्धवेड्या माणसांना कामोपभोगापासून संपूर्ण समाधान लाभत नाही. याचे कारण त्यांच्यात बाल्यावस्थेतले कामावशेष तसेच राहिलेले असतात आणि ते त्यांना कामक्रियेमार्गात प्रौढपणापर्यंत येऊच देत नाहीत. मग हे अवशेष त्यांच्या वेडेपणाच्या लक्षणातून, स्वप्नातून आणि आभासामधून प्रकट होतात.

"वास्तवापासून अर्धवेडे मागे फिरतात, कारण त्यांना ते संपूर्ण वा विभागश: सहन होत नाही."

आभास हा माणसाच्या स्वच्छंद वृत्तीतून उद्‌भवतो असे फ्राईड म्हणतो. आणि दोन्हीमधूनही वास्तव नाकारले जात असल्याने अशा त्या बालिश क्रियांतून बाहेर पडले पाहिजे असे त्यांचे मत आहे. कलेचे सगळे प्रकार हे आभासावर आणि कलाकारांच्या कल्पकतेवर अवलंबून असल्याने कलाकार हे वेडसर माणसांच्या आसपास असतात असे फ्राईड म्हणत असल्यास नवल नाही.

'कलाकार हा मूलत: मनाने अंतर्मुख असून वेडसरपणापासून फारसा लांब नसतो. सामर्थ्यवान अशा मूळच्या संवेदनांनी तो अगोदरच गुदमरलेला असतो. त्याला लौकिक सत्ता, संपत्ती

आणि स्त्रियांचे प्रेम यांची हाव असते. पण ह्या गोष्टी प्राप्त करून घेण्याची कुवत त्याच्यापाशी असत नाही. परिणामी तो इतर असंतुष्ट माणसांप्रमाणे वास्तवापासून तोंड फिरवतो आणि आपल्या सगळ्या मनीषा आणि कामप्रेरणा आभासात्मक जीवनाकडे वळवतो. वेडसरपणाकडे झुकण्याचा त्याचा हा मार्ग असणार."

फ्राईडच्या मताने कलेचे आणि साहित्याचे एकूण एक प्रकार हे अतृप्त कामवासनेची रूपांतरे होत.

"कलाकार हा स्वभावत: वास्तवापासून मागे वळणारा माणूस असतो. याचे कारण वासनांची अतृप्ती त्याला सहन होत नाही. म्हणून तो आपल्या कामविषयक आणि इतर आकांक्षांना आभासात्मक वातावरणात मुक्त विहार करायला लावतो.

कलाकारांच्या मूळ कामसंवेदनांना अर्धवेड्याच्या प्रमाणेच अटकाव झालेला असतो. पण त्यांना इतर वरदान लाभलेले असल्याने ते आपल्या आकांक्षांना निर्मितीत वाट करून देतात. फ्राईडची मानवी स्वभावाबद्दलची' विचारसरणीही कामवासना आणि मृत्यू या दोन गृहितांवर आधारलेली असल्याने कला आणि विज्ञान यामधील निर्मितीला त्याने दुय्यम स्थान दिले आहे.

"कलावंताला आपल्या निर्मितीत आणि आभासाला पार्थिव रूप देण्यात मिळणारा किंवा विज्ञानवंताला समस्या सोडविण्यात वा सत्य सापडण्यात लाभणारा आनंद, हा एका गुण वैशिष्ट्याने युक्त असतो. ह्याचे वर्णन एकदा केव्हातरी मानसशास्त्रीय अध्यात्माच्या भाषेत करता येईल ....तूर्त मात्र असा आनंद निर्मल आणि उच्च प्रतीचा असतो, असे आपण अलंकारिकरीतीने म्हणू शकतो. पण नैसर्गिकरीत्या प्रेरित होणाऱ्या संवेदनांच्या समाधानापेक्षा त्याची प्रत खाली असते, कारण त्यात माणसाच्या शारीरिक अवस्थेत बदल होत नाही.

फ्राईडच्या ह्या विचारणीतून एक विचित्र निष्कर्ष निघतो. तो असा की, वास्तवाला अनुसरून कामवासनेची पूर्णपणे तृप्ती होत असल्यास संगीतासह कोणत्याही कलेला आधार निरर्थक ठरतो. अशा निष्कर्षातील अपुरेपणाची मी दुसरीकडे चर्चा केली आहे.

फ्राईडच्या स्वत:च्या लेखनातील संगीतासंबंधीचे उल्लेख तुरळक असून ते महत्त्वाचे सुद्धा नाहीत. तरीपण फ्राईडच्या अनेक अनुयायांना त्यांचा हा संगीताशी असहकार मान्य नाही आणि त्यांनी त्याचे मनोविश्लेषणात्मक विवरण करण्याचा प्रयत्न केला आहे.

फ्राईडचे मनोविश्लेषण हे माणसाच्या अगदी लहान वयातील मनोविकारांवर आधारलेले आहे. माणूस पुढे कितीही प्रौढ वा जाणता झाला तरी आपल्या या बाल्यावस्थेच्या भूतकाळातून बाहेर पडत नाही. त्यावेळची त्याची तोंडातूनच प्रकट होणारी कामप्रेरणा त्याच्या तरुणपणात धूम्रपान, पेन्सिल चघळणे किंवा स्वत:च तोंड वेडेवाकडे करणे यासारख्या लकबीत पुढे तशीच राहिलेली दिसते. माणसे थकून गेली असताना किंवा आजारी पडली म्हणजे ती आपल्या अगदी पूर्वीच्या बालभावनांत माघार घेतात. या ठिकाणचे गृहीत असे की, माणसाच्या प्रौढपणात त्याच्यावर लहानपणाचा भूतकाळ एकसारखा प्रभाव पाडीत असतो. आणि तो मोह त्याला



अनुक्रमणिका

टाळता येत नाही. कोणत्याही माणसाची पुरेशी भावनातीत वाढ होत नाही हे मनोविश्लेषणाला मान्य असले तरी अशी वाढ खुंटणे, प्रौढत्वाचे त्याला ओझे नको असणे, ही गोष्ट मात्र त्या शास्त्राला शोचनीय वाटते.

माणसाच्या बाल्यावस्थेत होणाऱ्या परागतीच्या संदर्भात संगीताचा भावनात्मक परिणाम काय होतो याचा खुलासा करण्याचा प्रयत्न काही मनोविश्लेषणतज्ज्ञांनी केला आहे. आईच्या अगर तिच्या लहान मुलाच्या कंठातून निघणारे आवाज हे त्या दोघांमधील निकटचा सहवास टिकवून ठेवतात. संगीत हे अशा स्फुट आवाजांतून उद्भवले असल्यास ते बाल्यावस्थेतील शब्द होत. वा शब्दपूर्ण संवादाचे प्रतीक असले पाहिजे, असा पक्ष त्या तज्ञांनी मांडल्यास तो समजण्यासारखा आहे. पण पटत मात्र नाही. उदाहरणार्थ कोहुट लिहितो.

"तथापि संगीत हा मानसिक प्रक्रियेचा शब्दबाह्य प्रकार असून तो माणसाच्या अनुभवाचे, परागतीतले प्राथमिक स्वरूप दाखवतो. त्याचबरोबर त्यात सामाजिक आणि सुंदरतेचे सत्य असेलही.

अशा मागील परागत अवस्थेला स्वतःवरचे कमालीचे प्रेम वा स्वयंकेंद्रितता, असे इतर तज्ज्ञ संबोधितात. म्हणजे त्या वेळेला माणसाचे स्वत्व हे बाह्य वास्तवापासून वेगळे झालेले नसते. आपल्या कित्येक पेशन्टना संगीत परत परत ऐकण्याची निकड होती असे पिचेस नॉयने म्हटले आहे. त्यातल्या काहींना फार पूर्वी गेलेल्या आईची आठवण व्हायची. त्यांना गमावलेल्या तान्हेपणातला स्वर्गीय आनंद पुन्हा हवा असायचा. आईने आपल्या प्रेमळ आणि आश्वासक आवाजात दिलेले अभय त्यांना संगीतात पाहिजे होते. पिंचेस नॉय असेही सांगतो की, त्याच्या काही पेशन्टना संगीताची चटक लागली होती. आणि ते मिळाले नाही तर ते दुःखी होत असत. अशी संगीताची खास हाव असली तरी त्यात त्यांना काही गती असते असे मानण्याचे कारण नाही. त्या दोन्हीत काहीसा संबंध असतो, एवढेच ! पिंचेस नॉयच्या तर्कानुसार अशा चटक लागलेल्या पेशन्टांना आपण व आई यांच्यातला तो पूर्वीचा भावनात्मक संवाद पुन्हा हवा असतो. उलट संगीतातील गती ही ध्वनी वा आवाजाला साद घालणाऱ्या संवेदनेत मुरलेली असते. अर्थात यासारखी विधाने ही प्रमाण म्हणून मानण्यापेक्षा केवळ ऐकून घ्यायच्या कला समजता येतील. कारण अशा विधानांना बऱ्याच हरकती घेता येतात. उदाहरणार्थ शब्दपूर्ण संवाद हा बाल्यावस्थेतच असतो हे म्हणणे टिकण्यासारखे नाही. आई आणि तिच्या लहानग्यातला संवाद हे स्वरमयतेचे प्राथमिक स्वरूप असते. मुलाचे त्यावेळचे आवाज, बोबडे बोल (पुढे संगीतात) स्पष्ट शब्दात विकसित होतीलही. म्हणून बोलण्यातली स्वरमयता ही बाल्यावस्थेतच असावी असे म्हणता येणार नाही. आपल्या मनातला अर्थ पोचविण्याकरता केवळ शब्द कधीच पुरे पडत नाहीत. शिवाय प्रौढांच्या बोलण्यात अशा स्वरमयतेचे स्थान वैशिष्ट्यपूर्ण असते. 'खरंच' हा उद्गार लक्षात आणल्यास त्यात आश्चर्य, गैरविश्वास, नाकबुली, उतावळेपणा, तिरस्कार असे कितीतरी भाव अभिप्रेत असतात. आणि त्यातला प्रत्येक भाव हा अनेक तऱ्हेच्या

स्वरांती कळवायचा असतो. नुसत्या शब्दाने हे साध्य होत नाही.

लहान मुलांच्या उजव्या मेंदूत दुखापत झाली असल्यास त्यांना आपल्या भावना नीट सांगता येत नाहीत. कारण त्यांचे बोलणे एकसुरी असते. तीच अवस्था स्वयंकेंद्रित किंवा भ्रमिष्ट प्रौढाचीही होते. त्यांचे बोलणे विचित्र वाटते. याचे कारण त्यात मनोविश्लेषण म्हणते त्या बालसदृश स्वरमयतेचा अभाव असतो. रूक्ष भावहीन बोलण्यात मेंदूची इजा वा तसा आजार संभवतो. त्याची पूर्ण बौद्धिक वाढ झालेली आढळत नाही.

अलीकडे माणसाच्या आवाजाचे हुबेहूब अनुकरण करीत असलेले कार्यक्रम कॉम्प्युटरकडून केले जातात. तरीसुद्धा सराईत रसिकांच्या लक्षात राहते ते असे की, यातल्या माणसाचा आवाज चांगला असला तरी त्यातून त्याला काही विशेष सांगायची इच्छा आहे, असे दुर्दैवाने दिसत नाही. प्रत्यक्ष गाणारा मात्र त्यात दाखल करतो ते स्वरमयतेचे बीज असते.

मागे सांगितल्याप्रमाणे प्रौढ वयात संभोग सुखाचा अनुभव घेतल्यानंतर एक शांतिपूर्ण तृप्ततेची भावना प्राप्त होते असे फ्राईडचे म्हणणे आहे. सांगितीक अनुभव आणि कामतृप्तीचा अनुभव यांत साम्य दाखविणे अर्थातच शक्य आहे. संगीतामुळे ते ऐकणाऱ्याच्या मनात कमालीचा उद्रेक होण्याबरोबर त्याच्या शरीराच्या हालचालीतही फरक पडत असतात. आणि ते संपल्यानंतर तसे शांत समाधानी वातावरण पसरणे शक्य आहे. पण अशी नेमकी घटना-परंपरा चॅम्पियनशिप टेनिस पाहाणाऱ्या उत्साही प्रेक्षकजनांतही आढळून येते. ह्यापैकी कोणताही अनुभव म्हणून कामभावनेशी जोडता येतो असे म्हणता येणार नाही. उद्रेक संपल्यावर लाभणारा विरंगुळा सगळीकडे सारखाच असतो. आणि तो माणसाच्या वा प्राणिमात्राच्या जीवनांत अनुभवाला आल्याखेरीज राहात नाही.

"कष्ट केल्यानंतरची झोप, वादळानंतरचा बंदराचा आसरा, काळजीतून सुटका आणि जगून झाल्यावरचा मृत्यू ह्या गोष्टी फार सुखावह असतात."

संगीत हे सागरसदृश भावनांना प्रेरित करते असे म्हणून काही विश्लेषणकर्त्यांनी फ्राईडची वरील विचारसरणी संगीताला लावली आहे. आईच्या अपत्याला आपण अलग आणि स्वतंत्र आहोत ही जाणीव होण्यापूर्वीच्या त्या दोघांच्या आनंदमय मीलनाचा भाव संगीत प्रकट करते अशी त्यांची कल्पना आहे. तथापि ती दोन कारणांनी चुकीची ठरते. एकतर संगीत हे सागरदृश्य अनुभव देत असले तरी तसा अनुभव व्यक्तीला क्वचितच मिळतो. शिवाय संगीताच्या प्रत्येक कार्यक्रमात तर तो फारसा प्रत्ययाला येतच नाही. दुसरे असे की सागरदृश्य अनुभवाचे साम्य संभोगसुखाशी वा दुसऱ्या व्यक्तीच्या मीलनाशी असत नाही.

सागरसदृश (ओशियानिक) ही संज्ञा फ्राईडला त्याचे मित्र रोमाँरोला यांच्या आलेल्या पत्रात प्रथम सापडली. फ्राईडने धर्माविरुद्ध केलेल्या 'दि फ्यूचर ऑफ ॲन इल्यूजन' The future of an illusion या पुस्तकातील टीका वाचून फ्राईडला धर्म भावनेचा मूलस्त्रोत समजलाच नाही असे रोलाँने म्हटले आहे. रोलाँच्या मताप्रमाणे ह्या भावनेचा उगम, नाहीतरी अनंत, अमर्याद,

अपरिमित, जणू सागरसदृश अशा माणसाला होणाऱ्या संवेदनेतून झालेला आहे.

या सागरसदृश भावाचे गूढवादी वर्णन करतात. त्यांच्या म्हणण्याप्रमाणे अशा भावस्थितीत माणूस हा जगताशी आणि स्वत:शी एकरूप होतो. अर्थात हा अनुभव त्याच्या एकट्यापुरता असून एकत्वाची जाणीव परमेश्वर वा विश्वाला उद्देशून असते आणि तिचा दुसऱ्या माणसाशी मीलन होण्याचा संभव असतो. 'सॉलिट्यूड' ह्या माझ्या पुस्तकात वर्डस्वर्थ, बाल्ट, व्हिटमन, एडमंड गॉस, ए.एल रौसे, आर्थर कोएस्लर, बर्नार्ड बेरन्सन, सी.एस.लेवीस आणि ॲडमिरल बोर्ड यांनी वर्णन केलेल्या सागरसदृश अनुभवांचा मी उल्लेख केलेला आहे.

फ्राईड ह्या भावनेला बाह्य जगाशी अतूट नाते असण्याची जाणीव असे समजतो. तो तिचे साम्य उत्कट प्रेम भावनेत म्हणजे, स्वत्व आणि वस्तुजात यांच्यामधील अंतर विरून गेले असल्याच्या मन:स्थितीत पहातो. अर्थात ही मन:स्थिती त्याच्या म्हणण्याप्रमाणे बाल्यावस्थेत परांगत होते; इतकी की त्यावेळी आईच्या स्तनाला चिकटलेले मूल अजून बाह्य जगाशी संबंधित झालेले नसते. फ्रॉईडच्या मताने हा सागरसदृश अनुभव त्याच्या बाल्यावस्थेतील आईशी होणाऱ्या संलग्नतेला सूचित करतो.

भावनात्मक अनुभवांतून होणारा उद्रेक आणि सागरसदृश मन:स्थिती या दोन्हीमध्ये फरक करणे मला महत्त्वाचे वाटते. दोन्हींना कधीकधी 'परमानंदाची अवस्था' असे उथळपणाने म्हटले जाते. पण उद्रेक म्हणजे सागरसदृश अनुभव नाही. कारण ह्या अनुभवात शांत स्थिती अपेक्षित असते. मागे उल्लेखिल्याप्रमाणे संगीत ऐकून भावनोद्रेक झाल्यानंतर विरंगुळा आणि तृप्त भावना निर्माण होते. पण संगीताला मिळणारा असा नेहमीचा प्रतिसाद सागरसदृश भावासारख्या अलौकिक स्थितीपासून फार दूर असणार.

संगीत चालू असताना काही वेळा आपण भारले वा झपाटले गेल्यासारखे वाटते. असे संगीतकार म्हणतात. ही एक प्रकारची विशिष्ट सुखावह अवस्था असून ती एकाद्या मादक द्रव्याच्या सेवनानेही येऊ शकते. संगीताशी एकजीव झाल्याचा अनुभवही येतो. इतका की ते जणू आपणहूनच प्रसृत होत जाते. म्हणजे तर संगीतकार यानेही स्वत:मधून बाहेर निघून गेल्यासारखा होतो. ह्या अवस्थेचे सागरसदृश अनुभवाशी साधर्म्य सांगता येईल. पण त्या दोन्हीत पुन्हा गुणात्मक फरक संभवतो. याचे कारण भारावलेल्या स्थितीत शांतपणाचा अभाव असतो.

मार्ग निटा लास्कीच्या एक्स्टसी ह्या पुस्तकावरून दिसून येते की तिच्या प्रश्नावलीला उत्तर देणाऱ्यांनी बहुतेक वेळा इतर कलांपेक्षा सुखकारक चेतना देण्याचे सामर्थ्य संगीतात अधिक असते, असे म्हटले आहे.

प्रश्नावलीला उत्तरे देणाऱ्या साहित्यिक गटात संगीत हेच चेतनादायी असते असे मत दिसून आले. सुखकारक चेतना देणाऱ्या गुणांचा आणि त्यांच्या परिणामांचा अभ्यास करण्यासाठी संगीत हाच अतिशय उपयुक्त विषय आहे, असे मला वाटते."

मोझार्टचे 'डॉन गिओव्हनी' हे द्वंद्वगीत ऐकताना कसे वाटले त्याचे वर्णन मला माहीत

असलेल्या एका गृहस्थाने केले आहे. त्याला ते गीत अगोदरच चांगले माहीत होते. तरी त्याला त्या गीताने एकदम घेरून टाकले. त्याच्या डोक्यात ते घुसले आणि त्या दिवसाचा काही वेळ तो बदलून गेला होता. आत्यंतिक आनंदाची एक शांत अवस्था तो अनुभवीत होता. त्या अवस्थेत तो सबंध मानवजातीशी, जगाशी आणि स्वत:शी एकरूप झाला होता. हयातभर संगीत ऐकणारा हा रसिक प्रथमच. सागरसदृश अनुभव देणारे संगीत ऐकत होता आणि त्याच्या म्हणण्याप्रमाणे उत्कृष्ट संगीत ऐकून होणाऱ्या शारिरीक उद्रेकापासून तो वेगळा होता.

"संगीत स्वत:च लिहू लागते. मग त्या ठिकाणी कोणी मजकूर सांगायला रचनाकार नसतोच. फक्त सूर काय सांगताहेत ते ऐकून घेणारा एक नोकर असतो. अशाच नेमक्या अनुभवाची मी वाट पाहतो आणि तो प्राप्त झाल्यावर आपल्याला सगळं काही मिळाले असे वाटते. माझ्याबाबतीत असा अनुभव मला ठाऊक असलेल्या वा कल्पना केलेल्या समाधानाच्या पलीकडे जातो. कारण त्या क्षणी माझ्या सभोवतीच्या जगाशी एकरूप झाल्यासारख्या सागरसदृश भावनेने मी भारून गेलेला असतो.

ह्या प्रकरणाच्या एका ठिकाणी, कामोपभोगासकट माणसाला इतर अनेक अनुभवानंतर येणाऱ्या उद्रेकानंतरचा विरंगुळा ही सामान्य गोष्ट आहे असा उल्लेख केला गेलेला आहे. तथापि याही बाबत लक्षात घ्यायला हवे ते हे की मार्गरिटा लास्की च्या तपासात असे दिसून आले की काम ही एक चेतनाशक्ती आहे. असे म्हणणारांनी सुद्धा ह्या दोन्हीत फरक केला आहे. संपूर्ण कामोपभोग झाल्यांनतरही 'परमानंद' होतोच असे नाही. याचं कारण 'परमानंद' हा विरंगुळ्यापेक्षा अगदीच वेगळा असतो.

उत्कृष्ट संगीताची तशीच यशस्वी मैफिल ऐल्यानंतर आपण तेवढ्यापुरते उचंबळून जातो. आपल्या काळज्या दूर होतात. आणि शोपेन हॉवर म्हणतो त्याप्रमाणे सगळ्या व्यथांतून आपण मुक्त होतो. हे खरंच आहे आणि कामोपभोगातून लाभणाऱ्या तृप्तीशी त्या अनुभवाचे साम्य असेलही. तरीसुद्धा सागरसदृश अनुभूतींशी मात्र त्याची नेहमीच तुलना होऊ शकत नाही.

मानसिक आजाराने ग्रस्त झालेले काही रुग्ण एखादे वेळी त्यांना आनंद झाल्यास त्याचे वर्णन आपण विधात्याशी तसेच निर्मित जगाशी एकरूप झाल्यासारखे करतात. वास्तविक या एक प्रकारच्या वेडसरपणात न आवरता येणारा लोभ झपाट्याने एकमेकाचे पाठलाग करणारे उलट सुलट विचार आणि भव्योदात्त आभास त्याचबरोबर चिडखोरपणा याची गर्दी झालेली असते. सामान्य माणसाला होणाऱ्या आनंदात ह्या विचित्र गोष्टी येत नाहीत. उलट झालेल्या आनंदाची, सुखावहतेची ते कौतुकाने आठवण करतात. शिवाय आपले मानसिक स्वास्थ त्यामुळे सुधारले आहे, असेही सांगतात.

तथापि वरील मानसिक आजाराबरोबर दुसरी एक अवस्था आढळते. यावेळी काही माणसे आपल्या आनंदाबद्दल बोलतात. ती तशी आजारी म्हणूनही ठरविलेली नसतात. पण त्यांचा बराचसा काळ विषण्णता, नैराश्य, वैफल्य यात व्यतीत होतो. हा अनुभव तर आनंदहीन

असणार. अशा अवस्थेला 'आत्म्याची अंधारी रात' असे धार्मिक लोक संबोधितात. हे वर्णन प्रत्यक्षापेक्षा अधिक परिणामकारक आहे. मार्गारिटा लास्कीला आपल्या 'परमानंद' या पुस्तकात हताशपणावर एक वेगळं प्रकरण समाविष्ट करावे लागले. याचे कारण दोन्ही अवस्था एकाच माणसात आढळून येतात.

तेवढ्यापुरते शांत वातावरणात नेऊन संगीत हे ते ऐकणाराला जीवनाच्या क्लेशापासून दूर ठेवते, असे काही तत्त्वज्ञानी लोकांचे म्हणणे आहे. हा विचार पुढे आपण चर्चेला घेणार आहोतच. तथापि संगीत हे भावनांचा उद्रेक निर्माण करते. या वास्तवाशी हा विचार जुळत नाही. असे असूनही संगीताचा काहीसा भाग 'वेगळ्या जगताशी' संबंधित असतो, हे खरेच आहे आणि या जगात संगीताचा रसिक वा श्रोता आपल्या कल्पनेने विहार करू शकतोही.

असे होत असताना ते शब्दात सांगणे जरूर असते. मग त्यासाठी ते संगीताच्या चालीत एखादे काव्य गाणे किंवा रचनाकारानेच आपल्या स्फूर्तीचा उगम कसा झाला असे सांगणे हे ओघाने येते. माझ्या मनात यावेळी बॉदलेअरच्या एल इन्व्हिटेशन ऑ व्हॉयेज या काव्याला दुपारची उत्कृष्ट चाल तशीच राचमनीनोव्हची 'दि ऑईल ऑफ दि डेड' ही परिणामकारक वृंदवादनातील स्वरमेलाची कविता आहे. बॉदलिअरचा प्रवास त्या विचित्र प्रदेशांत समाप्त होत असताना आपण त्याची कल्पना करू शकतो. पण तिथे जात मात्र नाही. राचमनीनोव्हची 'दि ऑईल ऑफ दि डेड' या काव्याची स्फूर्ति आर्नोल्ड बॉकलिन या स्विस कलाकाराच्या चित्राने झाली. ते चित्र एका अनिवासी बेटाचे असून त्यांत फक्त मेलेली माणसेच शांतपणे राहात असतात. बॉदलिअरच्या कल्पनेपेक्षा जास्त प्रत्ययकारी निर्वाणाचे ते दृश्य होते. कलाकार मात्र त्याला स्वप्नसदृश्य चित्र म्हणत असे. राचमनीनोव्ह हा हताश मन:स्थितीत असताना त्याला या चित्राचे आकर्षण वाटले असावे. कदाचित मृत्यूच्या स्निग्ध व्यथेतच माणूस दु:खापासून दूर होतो असा त्याचा विश्वास असावा. फ्राईड हा संगीताचा रसिक असता तर हे संगीत त्याला नक्कीच आवडले असते.

आभासाविषयीचे फ्राईडचे विचार चुकीचे असूनही ते पुन्हा अपुरे आहेत. पण त्यातूनही सृजनशीलतेला वाव मिळतो आणि त्यामुळे वास्तवाशी जुळवून घेण्याचे नवीन मार्ग सापडतात. इतर कलांप्रमाणेच संगीत सुद्धा जीवनाच्या क्लेशातून आपली तात्पुरती सोडवणूक करते. पण हा त्याचा अनेकांतला एक परिणाम आहे. आणि तो फारसा महत्त्वाचा तर नाहीच. जीवनाशी सन्मुख होण्याच्या विविध मार्गात मागे सांगितल्याप्रमाणे संगीत आपली सोबत करते. पण हा विषय अजून संशोधित झालेला नाही.

लेखकांप्रमाणेच संगीत-रचनाकारांना काल्पनिक प्रदेशाकडून स्फूर्ती मिळते. १९०३ साली जेव्हा दब्ल्यूसीने आपले 'सोइरी डान्स ग्रेनेड' हा पिआनो 'एस्टॅम्पेसचा' दुसरा गानप्रकार लिहिला त्यावेळी त्याची स्पेनबद्दलची माहिती सॅन सॅबास्टियनमध्ये राहिलेल्या फक्त एका दिवसापुरतीच होती. स्फूर्ती देणारा स्पेन हा त्याच्या कल्पनेतला होता. आणि तो तसाच पुढे

कायम राहिला. हे त्याने १९०६ ते १९०९ च्या दरम्यान रचलेल्या 'आयबेरिया' चे तीन भाग आणि 'इमेजेस' या वृंदवादनातील दुसरा भाग यावरून दिसून येते. स्पेनबद्दलचे तसेच अज्ञान राव्हेलचेही होते. त्याचे रॅपसोडी एस्पाग्नील हे वृंदगीत 'एल ह्यूरे एस्पाग्नोल' हा ऑपेरा आणि 'अल्बोराडा डेल ग्रॉथिओसो' हे पिआनो गीत ही सगळी त्याच काळातील होती. राव्हेलची आई शुद्ध स्पॅनिश बोलत असे आणि तिने आपला उमेदीचा काही काळ माद्रीदमध्ये व्यतीत केला होता. या रचनाकाराने मात्र स्पेनची सरहद्द कधी ओलांडली नव्हती. कीट्सच्या 'कल्पनेतील सत्यते'वर त्यांचा विश्वास आहे. त्यांना मॅम्युएलडी फालाने या दोन रचनाकारांनी केलेली प्रशस्ती वाचून आनंद होईल. त्या प्रशस्तीत एखादा भूप्रदेश माहीत नसतानासुद्धा बारकाईने आणि अधिकृतपणे त्याचे सत्य या रचनाकारांनी जाणून घेतले. याबद्दल त्यांना धन्यवाद दिलेले आहेत.

काल्पनिक प्रदेशाबद्दलचे दुसरे उदाहरण रोव्हलचेच आहे. त्यात त्याने शब्दांचा वापर सूचक म्हणून केला आहे. त्याची 'शेहेरा झाडे' ही गानकृति 'लिऑन' लेव्हेरेच्या तीन कवितांभोवती फिरते. तिला 'टिस्टान किंगसोर' असे वॅग्नेर पद्धतीचे नाव दिले आहे. आणि त्यातले एसियाचे वर्णन तर पर्शिया, हिंदुस्तान आणि चीन यांतील प्रत्यक्ष माहितीपासून फार दूर आहे.

हेलन जोर्डान मोरहेंन्जने एक हकीकत दिली असून तिच्यात स्फूर्तीसाठी वास्तवाची ताकद पुरेशी नसते. हा राव्हेलचा विश्वास प्रकट होतो.

"फेझ येथील डायरेक्टर ऑफ फाईन आर्ट्स मि. बोरीस मारलो" हे राव्हेलला एम्बसी आणि सुंदर बाग दाखवीत होते.

"तुम्हाला काही अरेबियन रचना करण्याची स्फूर्ती व्हावी असा हा परिसर आहे ना?" तो म्हणाला.

राव्हेलने लगेच उत्तर दिले.

'मी अरेबियन रचना केली, तर ह्यापेक्षा ती अधिक अरेबियन होईल.'

वाल्टर डी ला मरेन्ची विख्यात कविता 'अरेबिया' हे एक भावगर्भ कल्पित असून त्याचा त्या प्रत्यक्ष देशाशी काहीही संबंध नाही. वास्तविक तो वाळवंटाचा भूभाग असूनही मरे तिथे नसलेले, काळा केश संभार असलेले गायक हिरवळीचे नदीकाठ आणि संथ वहाणारे झरे याचेच वर्णन करतो. व्हॉधान, विल्यम्सची, सिनफोनिया ॲन्टार्क्टिका या नावाखालची सेव्हन्थ सिम्फनी हिचे स्फूर्तिस्थान कॅप्टन स्कॉटच्या तिकडच्या अखेरच्या मोहिमेत होते. पण अलिकडे जवळज़वळ सगळे जग नकाशात येऊन तपासले गेले आणि माणसाच्या पायाखाली तुडवले गेले असताना लेखकांना आणि रचनाकारांना प्रत्यक्ष भूमीभोवती आपल्या कल्पकतेचे जाळे विणता येत नाही. म्हणूनच ते आता वैज्ञानिक परिकथा किंवा होल्ट्स प्रमाणे अज्ञात गोलार्धातील संगीताकडे वळलेले दिसतात.

तथापि लेखक वा संगीत रचनाकार, आदर्श समाज, सुखानुभूतीची बेटे, पूर्वेकडील देश किंवा माहिती नसलेली ठिकाणे अशा विषयांची निवड करण्यात म्हणून काही त्यांचा वाचक

वा रसिक तसल्या जागी अवतरत नाही. शेहेर झाडेला संगीत लावताना तसे काही होत असेलही पण आभिजात संगीताबाबत नाव देऊनही तसे म्हणता येत नाही. रचनाकाराला काल्पनिक प्रदेश हा केवळ चेतना देण्यापुरता असतो. आणि अशा स्फूर्तीतून उगम पावते ती संगीतकृती असते. गूढतेकडे निसटणारे ते प्रतिबिंब नसते.

स्ट्रालिन्स्की म्हणतो त्याप्रमाणे एकादी संगीत रचना पूर्ण झाली म्हणजे तिला तिथे स्वतंत्र अस्तित्व प्राप्त होते. म्हणून संगीत हे रचनाकाराचे कथन करणारा संवाद नसतो तर त्याच्याकरवी तो आपल्या भावनांचे अर्थमाहात्म्य आणि त्याची रचना यांना रसिकापर्यंत संक्रमित करीत राहातो.

आतापर्यंत केलेले संगीताचे मनोविश्लेषणात्मक विवेचन हे फारसे उद्बोधक ठरलेले नाही. याचे कारण जीवनाच्या यातायातीतून सुटका होणे हा संगीतानुभवाचा केवळ एक गौण भाग आहे. पण त्याचा दुसरा भाग मात्र लक्षवेधी आहे. भावजागृतीची अवस्था तिच्या आवेशानुसार सुखावह वा क्लेशकारक होऊ शकते असे आपण दुसऱ्या प्रकरणात नमूद केले आहे. पण गोंगाटाबद्दलची कमालीची संवेदनाशीलता ही संगीताचे अधिक आकलन होण्यास मदत करते. असा काही मनोविश्लेषण तज्ज्ञांचा अंदाज आहे. त्यासाठीचा त्यांचा दावा असा –

अकस्मात होणाऱ्या गलबल्यामुळे वा कर्कश आवाजाने माणसाची शारिरीक अवस्था बदलते. तो आवाज कसला आहे वा कोठून येतो याचा आपण तपास करतो किंवा दचकून तो टाळायचा प्रयत्न करतो. एखादे दृश्य नको असेल तर आपण डोळे मिटतो अगर पाठमोरे होतो. पण कर्णभेदक आवाज टाळणे कठीण होते. मागे फिरून तो नाहीसा होत नाही. कुठून तो आवाज येतो हे पाहणे शक्य होत नसते. आणि ते जमून गेले तरी तो थांबविता येतोच असे नाही. डोळे मिटून घेण्यापेक्षा कान बंद ठेवणे अधिक अवघड आणि कमी उपभोगाचे असते. यंत्रातून सोडलेली हवा अगर गॅस किंवा पोलिस गाडीची सायरन थांबविणे अशक्य आहे. नको असलेला गलबला ही धोक्याची सूचनाही असू शकते आणि असा अनुभव नसलेला बरा. दक्षिण आफ्रिकेच्या राक्षसी तुरुंगात माणसाच्या किंकाळ्या, काचाफोडी, कुत्र्याचे भुंकणे आणि सिंहाच्या गर्जना यांच्या खास टेप्स बनवून त्या एकेकट्या कैद्यांला तीव्र आवाजात ऐकविल्या जातात. परिणाम अघोरी होतो.

ब्रिटिश मनोविश्लेषण तज्ञ डोनाल्ड विनीकॉट यांच्याकडे एकदा एक सतावून गेलेली बाई आली. तिचा दोन वर्षाचा मुलगा कोणत्याही कर्कश आवाजाने दचकतो अशी तिची तक्रार होती. विनीकॉटने त्याच्या हातात एक टिनचे ताट आणि चमचा देऊन त्याला तितकाच आवाज उलट करायला सुचविले. धोक्याच्या प्रसंगी आपली असाहायता दूर करून ताठ राहण्याचीही एक युक्ती असते. ताट वाजवताना होणारी शारीरिक घुसळण त्या कोलाहलाइतकीच महत्त्वाची असते. ऐकल्या जाणाऱ्या आवाजात आवाज हा असह्य होत असताना शरीरात होणारी चलबिचलं स्वाभाविक असणार. ऐकत असतानाचे वातावरणात बदल करून आपण त्यावर मात करायला

शिकतो, असे रॉबीन मॅकोनी म्हणतो.

आवाज ऐकण्याच्या क्षेत्रात बदल घडवून आणण्याचे दोन मुख्य प्रकार आहेत. १) समोर होत असलेल्या घटनांचा संबंध आणि त्यातला वेग यात फरक करण्यासाठी शारीरिक हालचाल करणे. (२) नको असलेल्या आवाजावर कुरघोडी करण्यासाठी तितकाच मोठा आवाज काढणे. त्यावेळी आपण गातो किंवा नाचतोही.

विनीकॉटचा पेशन्ट पुढे संगीत रचनाकार झाला की नाही हे आपल्याला ठाऊक नाही. पण त्याच्या आवाजाच्या संवेदनशीलतेमुळे त्यातील ध्वनींचे संकलन आणि स्वकलेत संघटन करण्याचे कौशल्य त्याला साधले असावे. संगीत रचनाकार नेमके हेच करतात.

स्थिर प्रकृतीच्या माणसांना गोंगाट अस्वस्थ करतो. त्यातला एखादा अधिकच संवेदनाशील असला आणि त्या कोलाहलातले नको असलेले आवाज त्याला बाजूला करता येत नसले तर त्यालाही काही आटोपशीरपणा आणि व्यवस्था आणण्याकडे त्याचा कल होणे शक्य आहे. त्यातून तो काही अर्थ शोधील किंवा जे काही नको आहे त्याच्याशी तो जुळवून घेईल. मॅकोनी याबद्दल थोडक्यात सांगतो,

"ह्या गडबडीने मला वेड लागायची पाळी आली आहे. ह्या उद्गारात काही खरेपणा असेल तर ह्या संगीताने माझे डोके ठिकाणावर राहाते. अशा उलट विनोदांतही तितकाच अर्थ निघेल. शब्दाच्या अशा उलटसुलट मांडणीतून भावार्थ निघतो तो असा की, ऐकू येणारा ध्वनिसमूह आणि त्याला होऊ पहाणारा प्रतिसाद यात एक चेतनामय संबंध असतो."

ऐकाव्या लागणाऱ्या ध्वनिसमुदायाला प्रतिसाद देताना माणसा-माणसांत बराच फरक पडतो, हे मला दिसून आले आहे. मागच्या बाजूला संगीत चालू असताना काही लोकांना संभाषण करणे दुरापास्त होते. तर इतरांचे तिकडे लक्ष नसते किंवा ते तिकडे कानाडोळा करतात. बरीच माणसे घरात टी. व्ही. सेट्स दिवसभर लावून ठेवतात. इतरांचे बोलणे त्या ठिकाणी मग बोलले असो वा नसो, रेडिओवरचे भाषण ऐकत असताना एकाद्याने मधेच टीका केली की काहींचे डोके उठते. आपल्याला एकाच वेळी दोन गोष्टी ऐकता येत नाहीत. आणि दोघेही काय बोलत आहेत ते कळत नाही. अशी त्यांची तक्रार असते. त्यांच्यासमोर केवळ गोंधळ माजतो.

नेमके काय ऐकावे आणि बाकीचे कसे सोडून द्यावे याची सवय होण्यासाठी, आवाजाच्या समूहातून अर्थपूर्ण आणि विसंगत भागांची निवड प्रथम करावी लागते. घरांतल्या इतर कोणाच्याही ध्यानात आले नसताना आईला आपल्या मुलाचे रडणे ऐकू येते. कोनराड लोरेन्स बरोबर नास्ता करणाऱ्यांचा एक प्रसंग मला आठवतो. मधूनच टेबलावरून तो उठला आणि म्हणाला, "एका बगळ्याच्या पिल्लाचे कण्हणे मला ऐकू येतेय तो आवाज दुसऱ्या कुणीच ऐकला नव्हता. झाले होते ते एवढेच की, ते पिलू कुठेतरी अडकले होते.

संवेदनशील मुलाला ऐकू येणाऱ्या अनेक आवाजांतून फारच थोडे आवाज ऐकून घेणे हे कठीण होते. ह्याकरिता निराळी योजना अमलात आणावी असे पिंचास नॉथ याचे म्हणणे आहे.

ह्या कोंडीतून सुटण्याचा एकच मार्ग म्हणजे ऐकू येणाऱ्या एकूण परिसराशी सन्मुख होऊन त्यावर ताबा ठेवण्याचा प्रयत्न करणे. त्यासाठी एखादे वेळी उद्भवणारे वेगवेगळ्या वीस ध्वनींकडे लक्ष केंद्रित करून ते आत्मगत करण्याची कुवत लहान मुलात आणावी लागते. याबाबतीतला अगदी कडेचा नमुना वाद्यवृंदांच्या प्रमुख कंडक्टरमध्ये दिसून येतो. वाद्यवृंदातील एकूण संगीत तो साकल्याने ऐकत असताना त्याचवेळी प्रत्येक वादनकाराची करामत निरखण्याची किमया त्याच्याठायी आढळून येते.

वरील प्रकारच्या सूचनेला प्रत्यक्ष प्रयोगातून अनुमती मिळायला हवी हे या लेखकाला मान्य आहे. पण गोंगाटाने त्रस्त झालेलेच लोक त्यातून व्यवस्था शोधू शकतील. ही कल्पना मात्र विचारात घेण्यासारखी आहे.

भ्रमिष्ट माणसे आणि संवेदनाशील असतात. आणि त्यांना आगंतुक छळवादी आणि टीका करणाऱ्या नातेवाईकांपासून सांभाळावे लागते हे आपल्याला माहीत आहे. अशा नको असलेल्या गोष्टीने ते बेजार होतात. दुसऱ्या प्रकरणात दोन प्रकारच्या श्रवणाच्या प्रयोगाचा उल्लेख केला आहे. त्यावरून दिसून आले ते हे की स्थिर प्रवृत्तीच्या माणसांना त्यांच्या मेंदूच्या डाव्या बाजूने भाषा आणि उजवीकडून संगीत जास्त चांगले समजून येते. भ्रमिष्टपणा अगर इतर मानसिक व्यथेला बळी पडलेल्या लोकांत मेंदूच्या दोन्ही बाजूची कामे स्पष्टपणे वेगळी उरकली जात नाहीत असे संशोधन सांगते.

ऐकू येणारी माहिती पुढे नीट मनन केली जावी. याकरिता मेंदूच्या दोन्ही बाजू अधिक कार्यक्षम केल्या जातात. त्यावेळी काही मनोव्यथाग्रस्त माणसे संत्रस्त होत असल्यास नवल नाही. स्थिर प्रकृतीच्या माणसांना अशी माहिती पुरवताना त्यांना नको असणारा, अनुचित वा विसंगत तर्जुमा जाणीवेतून टळेल अशी अलीकडे काळजी घेण्यात येते. अशा माहितीच्या आक्रमणापुढे काही भ्रमिष्ट संतापल्याची तक्रार होते. कारण त्यात निवड करण्याची प्रक्रियाच कार्यरत नसते.

सृजनशील वृत्तीची माणसे अतिसंवेदनशील असतात. बाह्य जगाच्या उपद्रवापासून संरक्षण करील अशी निबर त्वचा त्याची नसते असे बऱ्याच लेखकांचे म्हणणे आहे. मानसिक व्यथा आणि निर्मितीक्षमता यांच्यात एक दुवा असतो असा की, निर्मितीला सुसंगत विचार करण्याची नवीन कल्पनांमधील साम्य शोधण्याची कुवत ही एकादा तरी मनोरुग्ण असलेल्या कुटुंबातच अधिक प्रमाणात आढळून येते. अर्थात सगळीच सृजनशील माणसे मानसिकरीत्या आजारी असतात असे मला म्हणायचे नाही. त्यातली काही तशी होतातही. तरीसुद्धा अपरिचित विचारसरणी ही मनोरुग्ण आणि सृजनशील अशा दोघांतही असते असे दाखविता येईल. आतापर्यंत मिळालेल्या माहितीवरून मात्र दिसून येते ते असे की, बाह्य जगातून प्राप्त होण्याच्या श्रवणसामुग्रीशी मुकाबला करताना दोघांना सारखीच अडचण येत असते. मग ते भाषण शब्दहीन ध्वनि वा भावनात्मक उच्चार असोत. गोंधळ अगर गडबड यांच्यासमोर मनोरुग्ण हैराण होतो. तर सृजनशील माणूस आपल्या कृतीमधून त्यांत नवा रेखीवपणा शोधून त्या आव्हानाला सामोरा

जातो. रॉबर्ट शुमान आणि ह्युगो बुल्फ ह्या दोन संगीतकारांची अशी उदाहरणे आहेत. दोघेही हतबुद्धतेचे शिकार बनले होते. अशा मानसिक व्यथेला अखेरीला ते बळी पडले तरीही त्यांचे निर्मातृत्व हे अस्थिरतेचेच एक फळ होते. यांत शंका नाही. 'राचमनीनॉव्ह' हाही असाच खिन्न वृत्तीचा झाला होता. या अवस्थेत ती तशीच वाढत गेली की, निर्मितीक्षमता अडून राहते. उलट तशा अवस्थेकडे कल होतानाच किंवा तशी सूचना मिळतानाही माणूस निर्मितीला उद्युक्त होतो. या प्रकारच्या विषण्ण वृत्तीत असताना 'संगीताखेरीज जगणे अशक्य आहे' असे बार्लाओझ आपल्या वडिलांना म्हणाला होता. चेकोव्हरकीलेनेसुद्धा अशा आजाराचे धक्के सहन केले होते. त्याने लिहिले आहे 'संगीत नसेल तर वेडे व्हायला कारण मिळते.' त्याचा चरित्रकार जॉनवॉश्क सांगतो त्याप्रमाणे चेकोव्हस्की खरे तेच बोलत होता. माणसाच्या अबोध आणि जाणीवेत त्या अशा दोनही मनोव्यापारावर त्याच्या निर्मितीची प्रक्रिया अवलंबून असते. आपण अजूनही फ्राईडच्या प्रभावातून बाहेर आलेलो नाहीत. त्यामुळे अबोध मनातून उद्‌भवलेली कोणतीही गोष्ट ही भावनात्मक, अविवेकी, न पटण्यासारखी आणि कदाचित अनुचितही असते अशी बऱ्याच लोकांची समजूत असते. वास्तविक तसे काही नाही. अबोध मनाच्या हालचाली या मनोरचनेच्या धारणेला, भावनात्मक आणि एक्याइतक्याच पूरक ठरतात.

स्वप्नातला विचित्रपणाही वरकरणीच असतो. त्यात विसंगती, असंभवनीयता आणि विवेकी मनाला न पटणाऱ्या अनेक गोष्टी जरूर असतात. पण पुष्कळशी स्वप्ने ही कथासदृश असतात. माणसाच्या निद्रावस्थेत त्याचे मनन होत असताना जुन्या आणि ताज्या घटना जुळविल्या जातात आणि त्यातून जो भाव निर्माण होतो त्याचा दुसऱ्याशी संबंध जोडता येत नाही. अशा घटनांच्या सरमिसळीतून स्वप्न कथासदृश आकार देण्याचे प्रयत्न करते.

भोवतालचे जग आणि त्यातले स्वत:चे जीवन या दोन्हीचा अर्थ लावणे तसेच ते दोन्ही अर्थपूर्ण करणे मानवजातीला भाग पडले आहे. अशा तऱ्हेचा विचार मी इतरत्र मांडला आहे माणसाचे वर्तन उत्क्रांतिक्रमामधील खालच्या स्वराच्या प्राणिमात्राप्रमाणे केवळ मूलभूत संवेदना आणि त्यांना द्यायचा प्रतिसाद यानीच सीमित झालेले नाही. तर त्यातून बाहेर पडून काही नवीन शोधण्याचा प्रयत्न करणे ही त्यांची नियतीच होऊन बसते. जगाला आणि स्वत:ला समजून घेऊन त्याला नवीन उद्‌भवणाऱ्या परिस्थितीशी जुळवून द्यावे लागते. आणि अशा प्रक्रिया त्याच्या मनोजीवनात अबोध मन आणि जाणीव ह्या दोन्हीकरवी होत असतात. जगाच्या व्यवहारात आणि स्वत:च्या हालचालीत सुसंगती शोधण्याच्या अबोधमनाच्या प्रयत्नातून त्याची सुटका होत नसते आणि अशा प्रयत्नांना उत्तेजन देण्याचे, सुसंस्कृत करण्याचे कार्य जाणीवेकडून होत असते.

संगीत हे आपल्याला भारावून टाकते. याचे एक कारण माझ्या मताने असे की त्यात आपल्या श्रवणानुभवाला आकार देण्याचे आणि त्याला अर्थवाही करण्याचे सामर्थ्य असते. संगीत वास्तवापासून आपल्याला दूर नेऊन ठेवते किंवा बाल्यावस्थेचा पुन्हा अनुभव आणून



अनुक्रमणिका

देते. ह्या मनोविश्लेषणात्मक भूमिकेचे खंडन करण्याचा मी बराच प्रयत्न केला आहे. तरीसुद्धा बाह्य जगाच्या कोलाहलातून तात्पुरत्या सुटकेचा मार्ग संगीत दाखवते. याबद्दल मात्र मला शंका नाही. ही गोष्ट अर्थातच उत्तेजक वाटते. याचे कारण दिवास्वप्नात किंवा निद्रेत अभावात होणाऱ्या मानसिक घटनांच्या अविस्मरणाप्रमाणे यावेळींसुद्धा तशीच प्रक्रिया घडून येत असते. अशी अवस्था प्राप्त होण्याचे, ग्रामीण परिसरात एकट्याने सहल करणे वा अध्यात्मिक चिंतन करणे यासारखे दुसरे अनेक मार्ग असतीलही. संगीतात प्रत्यक्ष भाग घेताना अगर उत्कृष्ट संगीत ऐकताना आपण तेवढ्यापुरते बाह्य उपद्रवापासून सुरक्षित राहतो. एका विवक्षित आणि अलग अशा जगात आपण अवतरतो. तिथे केवळ सुव्यवस्था असते आणि विसंगतीला वाव नसतो. ही एक हितकारक गोष्ट आहे. कारण यावेळी थोडीशी माघार होऊन मानसिक घटनांची पुनर्रचना होते. ही बाल्यावस्थेकडील परतीची वाटचाल नाही. तर तीमुळे जगाशी सन्मुख होण्याचा मार्ग मात्र स्पष्ट दिसून येतो.

आपल्या एरवीच्या दिनक्रमात संगीत आणि इतर कला अधिक जवळ आल्या तर वर उल्लेखिलेली तात्पुरती माघार जरुरीची वाटणार नाही. युरोपिअन माणसे वागण्यात इतकी ताठर का दिसतात हे इतर संस्कृतीच्या लोकांना कधी कधी समजत नाही. 'न्यू मोक्सिकोत' यंग ची एका इंडियन टोळी प्रमुखाशी गाठ पडली. त्यावेळी तो प्रमुख म्हणाला होता,

"बघा तर ही गोरी माणस किती क्रूर दिसतात ती. त्यांचे ओठ पातळ, नाक धारदार, चेहऱ्यावर वाकड्यातिकड्या आठ्या, रोखून बघते त्यांची नजर, त्यांना उठल्या सुटल्या काहीतरी पाहिजे असते. काय पाहिजे असते त्यांना? ही गोरी माणसे काही तरी शोधातच असतात एका ठिकाणी स्वस्थ बसतच नाहीत ती. बेचैन असतात सारखी आणि त्यांना काय हवंय ते आम्हाला समजत नाही. आम्हालाही ही माणसच कळत नाही. वेडीच असली पाहिजेत."

संगीताच्या समारोहाचा परिणाम म्हणून तो जीवनाच्या चक्रव्यूहातून निसटून जाणे असा असला तर त्याचे कारण असे असावे की, आपल्या व्यवहार संस्कृतीने जीवनात काही करून दाखवावे आणि त्यात लौकिकदृष्ट्या यशस्वी व्हावे. ह्या वृत्तीने आपणास ग्रासून टाकले आहे. इतके की त्यामुळे आपल्याला एखादा कलाविचार सुचतच नाही. वास्तविक संगीत हे आपल्या दिनक्रमात जीवनोत्तेजक उत्साहवर्धक द्रव्य असणे शक्य आहे आणि तसे ते असायलाही हवे.

आपल्या निद्रावस्थेत किंवा निवळ दिवास्वप्नांतही जे मानसिक घटनांचे अभिसरण होऊन त्यांना आकार प्राप्त होतो त्या प्रक्रियेला संगीताचे विशेष सहाय्य होत असते. निसर्गातून येणाऱ्या असंघटित आवाजांच्या घोषातून लाभणाऱ्या सुखानुभवाचा स्ट्राव्हिन्स्की उल्लेख करतो पण त्याला संगीताचे त्यापुढील परिणाम प्राप्त होत नाही असे तो म्हणतो. पण अशा निरपेक्ष अनुभवाच्याही पलीकडे आपल्यापुढे परत संगीत अवतरते. असे संगीत की जे आपले मानसिक संगोपन करते आणि सृजनशीलतेला प्रेरणा देते."

मनोविश्लेषण तज्ज्ञ अशा मनोवस्थेला एक प्रक्षेपक आत्मपरिचय म्हणतात. म्हणजे या

प्रक्रियेत माणूस आपल्या कल्पनेने बाह्य वस्तुजातातच निमग्न होतो. अनुकरण करणे ही केवळ विद्या देणाऱ्यांची निष्ठापूर्वक प्रशस्ती नसून तो एक अभ्यासाचा मार्ग आहे. अधिक वरदान लाभलेल्यांशी एकरूप होताना आपली कुवत वाढत जाते. तात्विक विवरण करण्यापेक्षा 'मी करतो तसे कर' हा शिक्षण देण्याचा मार्ग अधिक प्रभावी असतो. हे संगीत शिक्षकांना माहीत आहे.

संगीत शरीरांतील स्नायूंच्या हालचालींना वळण देते. एवढेच नाही तर मनातील घटनांतही क्रम आणि आकार आणते. 'दि कॉमनसेन्स व्ह्यू ऑफ ऑल म्युझिक' या आपल्या ग्रंथातील 'दि पॉवर ऑफ म्युझिक' या प्रकरणात जॉन ब्लॅकिंग म्हणूनच लिहितो,

"संवेदनांचे विकसन आणि कला विषयांतून भावनांचे प्रशिक्षण ह्या गोष्टी अगत्याच्या असतातही. पण शिवाय या समतोल वर्तन आणि बुद्धीचा परिणामकारक वापर यासाठी आवश्यक ठरतात.

ऐकू येणाऱ्या विसंगत ध्वनींच्या अतिरेकाने गुदमरून जाण्याऐवजी संगीताच्या साहाय्याने त्याच्यावर आपले संकल्प लादण्याला आपण शिकतो. त्यातली विसंगती टाळतो. महत्वाच्या गोष्टीकडे लक्ष पुरवितो आणि या रीतीने बाह्य जगातील आकृतिमयता शोधू पहातो. आणि ती नसल्यास निर्माण करू लागतो. या प्रक्रियेतील सुखानुभवाची तुलना विज्ञान विषयांमधील गृहीत प्रमेयांतील अनुभवाशीच करता येते.

एखाद्या शास्त्रीय उपपत्तीने, जगाचे आकलन सुकर झाले की, त्याच्या आहारी आपण पूर्वीइतके जात नाही. उलट त्यातील घडामोडीवर आपण नियंत्रण ठेवू शकतो. अर्थात सगळ्याच घटना आपल्या ताब्यात येत नाहीत. भूगर्भशासनानुसार आपल्याला कितीही तपशीलवार ज्ञान झाले असले तरी धरणीकंपाचे बळी आपण ठरतोच. ऐकण्याच्या बाबतीत आपण कितीही विवेक बाळगला तरी आकस्मित आणि कर्ण कर्कश आवाजाने आपण अजूनही बेजार होतो. पण जगाचा अधिक परिचय करून घेतल्यावर आपल्याला धीर येतो. इतरही अनेक तऱ्हेने संगीत महत्वाचे समजले गेले असले तरी त्याचे हे कार्य मात्र काहीसे दुर्लक्षित राहिले आहे.

मेंदूला दुखापत झालेल्या लोकांना एरवी न उरकता येणारे कार्यभाग संगीताच्या मदतीने पूर्ण करता येतात. भावनिक रीतीने हळव्या झालेल्यांचे किंवा मानसिक आजाराने ग्रस्त होत असलेल्यांचे जीवन संगीत सुसह्य करते. संगीत हे बहुतेकांना तितकेसे रोजच्या गरजेचे वाटत नसल्याने त्याचे महत्व कमी लेखण्याकडे त्यांचा कल होतो. पण संगीताशिवायच्या जगाची कल्पना करणे अवघड आहे. संगीताच्या मैफिलीवर बंदी घातली. त्याची आविष्कार साधने नष्ट केली तरी आपल्या डोक्यात त्याचे सूर गुंजन करीत राहणार आणि त्याच्या अनुसार होत असताना आपल्या जीवनात आणि भोवतालच्या जगात सुसंगती आणि अर्थवाहीपणा लाभणार यात शंका नाही.

---

## समाजशास्त्र

# ऐक्य आणि विविधता– प्रदेश (विभाग)

**नाना जोशी**

मानवी समुहात विविधता असणे आवश्यक आहे. त्यामुळे मानवी चैतन्याच्या साहसयुक्त जागतिक प्रवासास सामुग्री आणि प्रोत्साहन या दोन्हीचा पुरवठा होतो. भिन्नभिन्न सवयी व चालिरीती असलेली राष्ट्रे ही एकमेकांची शत्रू नसतात. याउलट ईश्वराने दिलेल्या त्या देणग्या आहेत. जे समजावून घेण्याच्या दृष्टीने पुरेसे व जवळचे आहेत, आपले कुतूहल चाळविण्याच्या दृष्टीनेही पुरेसे व वेगळे आहेत, आणि आपल्या कौतुकास पात्र होण्यासारखे जे आहेत, अशा प्रकारच्या शेजाऱ्यांची जरुरी माणसांना असते.

एखाद्या संस्कृतीची भरभराट व्हायची असेल, तर लोकात फार मोठे ऐक्य असता कामा नये. तसेच त्यांच्यात फार मोठा अंतर्विरोधही असता कामा नये. या विभागातील प्रतिपादनातले हे प्रधान आणि पुन्हा पुन्हा मांडलेले सूत्र आहे. रानटी अवस्थेतील (Borbark) लोकात नको इतके ऐक्य निर्माण होण्याची शक्यता असते. त्याची परिणती दडपशाही हा जिचा स्थायिभाव अशी समाजव्यवस्था निर्माण होण्यात होतो. कोणत्याही बाबतीत परिस्थिती हाताबाहेर गेली की संस्कृतीची पुढील प्रगती कुंठित होते. सर्व लोकांसाठी, सर्व काळासाठी सामायिक ऐक्याची आणि विविधतेची योग्य पातळी कोणती हे ठरविता येणार नाही. समाजातल्या काही भागात मर्यादेबाहेर परिस्थिती गेली अथवा दोष निर्माण झाले, तर मग ते धोकादायक ठरते. एखाद्या लोकांना, एखाद्या काळी आवश्यक, हितकारक आणि नैतिक दृष्ट्या अपायकारक काय आहे, हे समाजातील जे मुत्सद्दी आहेत, त्यांच्या अंतर्दृष्टीवर आणि समाजातील विचारवंताच्या शहाणपणावर सोपविले पाहिजे. हे सारे आपणास सोदाहरण दाखवून देता येईल आणि त्याबद्दल निवेदनही करता येईल. वर्गविहीन समाज, आणि ज्या समाजात ठोकळेबाज आणि न ओलांडता येणारे सामाजिक अडथळे असतात, या दोन्ही प्रकारचे समाज चांगले नाहीत. प्रत्येक सामाजिक वर्गात सातत्याने भर पडली पाहिजे; आणि त्यातून व्यक्ती बाहेरही गेल्या पाहिजेत. सर्वच वर्गांना एकीकडे आपली अस्मिता टिकवून धरीत असताना, आपल्याशिवाय इतर वर्गांबरोबर त्यांना अगदी खुलेपणाने मिसळता आले पाहिजे. या सर्वजणांचा मिळून एक संस्कृती– समूह असावयास हवा. त्यामुळे त्या सर्वांना जोडणारा एक समान दुवा वा त्या सदृष्य दुसरे काही प्राप्त होईल. हा परस्परांना जोडणारा दुवा, त्या समुहापेक्षाही अधिक मूलभूत स्वरूपाचा असेल. तसेच दुसऱ्या एखाद्या समाजातील, त्याच पातळीवरच्या समुहापेक्षाही तो अधिक मूलभूत असेल. गेल्या विभागात, एखादा सामाजिक वर्ग, संस्कृतीचा जो खास विकास करतो, त्याचा आपण

विचार केला, एखादा प्रदेश, संस्कृतीचा जो खास विकास करतो, त्यासंबंधी आता आपण विचार करणार आहोत.

महायुद्धाच्या अनुभवानंतर, प्रशासकीय आणि भावनात्मक ऐक्य यांचे फायदे काय असतात त्याबद्दल आपणास पुन:स्मरण देणे फारसे आवश्यक आहे असे नाही. परंतु वारंवार असे गृहित धरले जाते की, युद्ध काळातले ऐक्य हे शांततेच्या काळातही टिकवून ठेवले पाहिजे. प्रत्यक्ष युद्धात व्यस्त असलेल्या लोकांना, विशेषत: ते युद्ध केवळ बचावात्मक आहे असे भासते किंवा त्याना तसे भासविले जाते, अशा युद्धात गुंतलेल्या लोकांत जी ऐक्य भावना आढळते, ती ऐक्य भावना अगदी उत्स्फूर्त असेल अशी अपेक्षाही आपणास करता येईल. ती ऐक्यभावना अगदी खरीखुरी असते. विशेषत: एका विशिष्ट प्रवृत्तीच्या लोकांत प्रेमाची व सहकार्याची भावना आढळून येते. वैध मार्गानी प्रस्थापित झालेल्या राज्यशासना–समोर आपण मुकाटपणे नम्र झालो आहोत. याबद्दल ज्याना खंत वाटत असते, अशा प्रवृत्तीच्या लोकात ही प्रेम व सहकार्याची भावना आढळून येते. दुसऱ्याने दिलेला हुकूम आपण अगदी आज्ञाधारकपणे पाळत आहोत याविषयी त्यांच्या मनात अपराधीपणाची भावना असते. त्यातून सुटका करून घेण्याचा ते प्रेम व सहकार्य हा एक मार्ग आहे. नुकत्याच बुडालेल्या बोटीतून वाचलेले लोक, एका छोट्या होडीत बसून जीव मुठीत धरून कसा–बसा वेळ काढीत असतात. या अशा लोकांत जो सुसंवाद व आज्ञाधारकपणा आढळतो. तसाच तो युद्धजन्य परिस्थितीत सापडलेल्या नागरिकात आढळून येतो. आणीबाणी काळात, ते ऐक्य, स्वार्थत्यागाची भावना, व बंधुभाव टिकून रहातो; तो आणीबाणी संपल्यानंतर तसाच राहात नाही. याबद्दल लोकांना खेद होतो. ते तो वारंवार व्यक्तही करून दाखवितात. प्रख्यात नाटककार बैरीने The Admirable Crichton नावाचे एक नाटक लिहिले आहे. या नाटकाचे जे प्रेक्षक होते, ते या नाटकाविषयी असा निष्कर्ष काढतात की त्या बेटावरील सामाजिक संघटना योग्य व बरोबर होती आणि जिल्ह्याच्या ठिकाणी जे सामाजिक संघटन होते ते चुकीचे होते. बॅरी यांच्या या नाटकाच्या अन्वयार्थ एका वेगळ्या प्रकारे लावता येणार नाही असे नाही. प्रेक्षकांनी लावलेला या नाटकाचा अर्थ हा बरोबर आहे. याबद्दल माझी खात्री आहे. आणीबाणीच्या काळात आवश्यक असलेले ऐक्य हे एका विशिष्ट प्रकारचे असते, आणि शांतता अनुभवणाऱ्या राष्ट्रात संस्कृतीच्या विकासाला अनुरूप असलेले ऐक्य हे दुसऱ्याच एका प्रकारचे आहे. या दोहोतला फरक आपण काही झाले तरी, जाणला पाहिजे. अशी कल्पना करता येईल की शांततेचा जो कालखंड आहे तो युद्धाच्या तयारीचा कालखंड आहे, अथवा दुसऱ्या एका प्रकारे युद्ध चालू ठेवण्याचा कालखंड आहे. मग त्या परिस्थितीत मध्यवर्ती सत्तेची कराल अशी बंधने, आणि जाणून बुजून प्रोत्साहित केलेली देशभक्तीची भावना, यांची अपेक्षा करता येईल. तसेच या अशा प्रकारच्या कालखंडात, गनिमी सैनिक आणि लोकांनी उभारलेली खाजगी सैनिकी पथके यांच्यावर अवलंबून न राहाता, सरकारी



अनुक्रमणिका

कडक शिस्तीच्या जोरावर आर्थिक युद्धही करता येईल; अशी अपेक्षा सुद्धा बाळगता येईल. परंतु अन्य एखाद्या राष्ट्राबरोबर ज्या राष्ट्राने शांतता प्रस्थापित केली आहे, अशा राष्ट्रात कोणत्या प्रकारचे आणि कोणत्या पातळीवरचे ऐक्य असावे, याच्याशी मला कर्तव्य आहे. याचे कारण आपणास जर खरोखरच्या शांततेचा कालखंड प्राप्त होणार असेल, तर मग 'संस्कृती'ला काहीही आशा नाही. तशी आशा करणे हे सर्वस्वी निरर्थक आहे. मला वेगवेगळ्या प्रकारचा उत्साह व उद्दिष्ट यांच्याशी कर्तव्य नाही याचे कारण, ते उत्साह व ती उद्दिष्टे ही नेहमीच क्षणभंगुर ठरतात. म्हणूनच मला ज्याच्याशी कर्तव्य आहे, त्या प्रकारच्या ऐक्याचा आविष्कार, समान- उत्साह अशा शब्द प्रयोगाने करता येणार .नाही. मला ज्या ऐक्याशी कर्तव्य आहे, ते बहुतांशाने अजाणताच तयार झालेले असते. निदान तसे ते असले पाहिजे. जी विविधता उपयुक्त आहे, ती विचारात घेऊन, तिच्या करवीच या ऐक्याच्या प्रश्नाला हात घालता येईल. आपणाला उपलब्ध असलेला तोच उत्तम मार्ग आहे. याठिकाणी देखील मला पुन्हा एकदा विविधतेशी कर्तव्य आहे. आपण नुसते एखाद्या विशिष्ट राष्ट्राचे नागरिक नाही, तर आपण आपल्या राष्ट्रातील, विशिष्ट विभागातून आलेले नागरिक आहोत, व त्या भागालाच आपली निष्ठा वाहिलेली आहे, हेच आपण कोणीतरी आहो असे वाटण्याच्या दृष्टीने महत्त्वाचे आहे. हे खरे आहे ही निष्ठा वर्ग निष्ठेप्रमाणे कुटुंबाशी असलेल्या निष्ठेतूनच निर्माण होते. ज्या ठिकाणी एखाद्या व्यक्तीचा जन्म झालेला नाही आणि ज्या समुहाच्या पूर्वसूरींशी त्या व्यक्तीचा काहीही संबंध नव्हता, अशा स्थानाबद्दल अत्यंत प्रेमादरयुक्त निष्ठा विकसित निश्चितपणे करता येतात. एखादी व्यक्ती आपल्या मूळ प्रदेशापासून, अन्य एखाद्या प्रदेशात जाते व तेथे स्थाईक होते. या नव्याने स्थाईक झालेल्या प्रदेशाबद्दल प्रखर अशी प्रादेशिक भावना, त्या व्यक्तीच्या मनात होईलही मी ते नाकारत नाही; परंतु ही अशा प्रकारची निष्ठा काहीशी कृत्रिम, काहीशी जरा जास्तच जाणून बुजून प्रयत्नपूर्वक तयार झालेली असते असे मला वाटते. एखाद्या ठिकाणी जे लोक जन्म घेतात, त्यांच्याकडे त्या स्थानाबद्दलची निष्ठा ही परंपरेने आलेली असते. ही निष्ठा त्या प्रदेशातील मूळच्या रहिवाशांनी जी जाणीवपूर्वक निवड केलेली असते त्याचा परिणाम असतो. अशा प्रकारची निष्ठा तयार होण्यासाठी बाहेरून आलेल्या माणसांच्या एक- दोन पिढ्या जाणे आवश्यक असते. एवढा काळ जी निष्ठा निर्माण होण्यासाठी थांबले पाहिजे; असे मला वाटत असल्याने थोड्या विचारांती एक गोष्ट स्पष्ट आहे. ती म्हणजे बहुसंख्य मानवाच्या दृष्टीने विचार करता मनुष्य ज्या ठिकाणी जन्माला येतो त्याच ठिकाणी त्याने रहावे हीच सगळ्यात उत्तम गोष्ट आहे असे दिसते. कुटुंब, सामाजिक वर्ग, आणि स्थानिक निष्ठा हे सर्व एकमेकांना पूरक आहेत,व म्हणूनच ते एकमेकांना पाठिंबा देतात. यातल्या एकाचा जरी ऱ्हास झाला,तरी त्याचा परिणाम इतरांवर होतो,व मग त्यांना कोसळतील त्या आपत्ती सहन कराव्या लागतात.



अनुक्रमणिका

योग्य दृष्टिकोन वापरून, त्याच्या अनुषंगाने, या 'प्रादेशिक वादा'चा फारसा विचारच होत नाही. मी या ठिकाणी 'प्रादेशिक वाद' ही संकल्पना मुद्दामच वापरली आहे. याचे कारण, या संकल्पनेच्या अनुषंगाने, जे संबंधित विचार पुढे येतात, ते माझ्या दृष्टीने महत्त्वाचे आहेत. बऱ्याच लोकांच्या दृष्टीने या शब्दाचा एकच विवक्षित अर्थ आहे; असे मला वाटते. स्थानिक असंतुष्ट आत्म्यांचा एक छोटा गट राजकीय आंदोलन चालवीत आहे असे चित्र हा शब्द उच्चारल्याबरोबर उभे रहाते. आता हे आंदोलन जोरदार व बलवान नसेल तर मग ते आंदोलन हे मूर्खपणाचे व तिरस्करणीय आहे असे मानले जाते. या मागेही एक कारण आहे. ते म्हणजे कोणतेही आंदोलन, हे पराभूत उद्दिष्टांचे प्रतीक आहे, असे गृहित धरले जाते. म्हणूनच या अशा आंदोलनांची नेहमीच चेष्टा होते. समजा जी एखादी भाषा नामशेष होत असते आणि ती नामशेष होणे हे क्रमप्राप्तच आहे याबद्दल खात्री असते, या अशा भाषेला पुनरुज्जीवन प्राप्त व्हावे,अथवा एखादा रीतिरिवाज जो आता इतिहासजमा झाला आहे, आणि त्याला विद्यमान काळात अर्थही नसतो, अशा रीतिरिवाजाला संजीवनी देण्याचा प्रयत्न करणे अथवा जे यंत्रयुग सर्वांनी मान्य केले आहे त्या अटळ अशा यंत्रयुगाची आणि प्रचंड उद्योगधंद्याच्या प्रगतीला खीळ घालणे, या सर्व वा अशाच प्रकारच्या इतर गोष्टी प्रादेशिकवाद करण्याचा प्रयत्न करीत आहे, असे आपणास आढळून येईल. स्थानिक परंपरांचे जे कोणी खंदे प्रवर्तक असतात. ते बरेच वेळा त्यांची जी बाजू असते, त्यातल्या उत्तम भागावर जोर देऊन, ती समर्थपणे लोकांसमोर मांडण्यात अयशस्वी होतात हे खरेच आहे. तसेच असेही काही वेळा होते की, त्यांच्यातले काही लोक, आपल्याच लोकांना अत्यंत जोषपूर्णपणे विरोध दर्शवितात व त्यांची चेष्टाही करतात. असे ज्यावेळी घडते, त्यावेळी बाहेरच्या लोकांना असे वाटते की या प्रादेशिक लोकांबद्दल गंभीरपणे विचार करण्याचे कारण नाही. काही वेळा 'प्रादेशिकवादी' त्यांचा जो मुद्दा असतो. याबद्दल योग्य असे कल्पनासूत्र पुढे मांडीत नाहीत. काहीवेळा तर त्या कल्पना साफ चुकीच्या असतात. त्यानी जो प्रश्न उपस्थित केलेला असतो यावर उपाय म्हणून सर्वस्वी राजकीय परिभाषेतच त्या प्रश्नाचे उत्तर सूत्रबद्ध करण्याकडे त्यांचा कल असतो. या प्रादेशिक वाद्यांना राजकारणाचा अनुभव नसतो. तसेच राजकीय उद्दिष्टांपेक्षा त्यांच्या मनात अधिक खोलवर असलेले हेतू आणि उद्दिष्टे या दोन्ही कारणानी ते चळवळ उभरण्यास उद्युक्त झालेले असतात. त्यांचा कार्यक्रमही प्रत्यक्ष कार्यवाहीत कधी येणार नाही असाच असतो, आणि ते जेव्हा एखादा आर्थिक कार्यक्रम जनतेसमोर ठेवतात तेव्हा त्याना अडचणी येतात. या अडचणी अर्थशास्त्रीय नसतात. त्या अर्थशास्त्रापलिकडे मनात अगदी खोलवर असे जे हेतू असतात. त्यातून निर्माण झालेल्या असतात. याउलट ज्या व्यक्ती व्यवहारचतुर म्हणून प्रसिद्ध पावलेल्या असतात, त्या व्यक्तीचे असते. त्यांना असल्या अडचणी कधीच येत नाहीत. यापुढे जाऊन असेही सांगता येईल की नेहमीच्या शिरस्त्यांचा प्रादेशिकवादी हा



अनुक्रमणिका

आपल्या स्वत:च्या विभागाच्या हितसंबंधाबद्दल जागरूक असतो. फक्त त्या हितसंबंधाबद्दल त्याला कर्तव्य असते. इतरांविषयी तो विचारही करावयास तयार नसतो. असे वर्तन करून, तो आपल्या स्वत:च्या विभागाबाहेरच्या लोकांना असे सुचवत असतो की, जे एका विभागाच्या हिताचे आहे, ते दुसऱ्या विभागाच्या गैरसोईचे असणार. उदा. इंग्लंडवासी हा सामान्य इंग्लंडसंबंधी एका विभागाच्या स्वरूपात विचार करीत नाही. याउलट स्कॉटलंड व वेल्स राष्ट्रीक फक्त स्कॉटलंड व वेल्स या विभागाबद्दल विचार करतात. तसे इंग्लंडवासी करीत नाहीत. परंतु स्कॉटलंड आणि वेल्स या विभागांच्या हितसंबंधात इंग्लंडचे हितसंबंध गुंतलेले नसल्याकारणाने इंग्लंडवासीयांना असे स्पष्ट करण्यात येते की त्याच्या सहानुभूतीची आवश्यकता नाही. एवंच स्थानिक वांशिक स्वरूपाची वैशिष्ट्यें पुसून टाकण्याची प्रवृत्ती प्रकट करून इंग्लंडवासी हा आपले हितसंबंधात फाटाफूट नाही असे सांगतो. हे असे करणे हे इंग्लंडवासीयांच्या, शेजाऱ्यांना आणि खुद्द इंग्लंडवासीयांच्या संस्कृतीला धोका पोचविणारे आहे. एखादा मुद्दा जोवर सर्वसामान्यांचा मुद्दा म्हणून मांडला जात नाही, तोवर त्या मुद्याला योग्य व न्याय्य अशी सुनावणी मिळण्याची शक्यता फारच कमी आहे.

या मुद्यावर आल्यानंतर एका गोष्टीची शक्यता नाकरता येत नाही. जाहीरपणे आपण प्रादेशिकवादी आहोत, असे सांगणाऱ्या प्रादेशिकवाद्याने येथवरचे विवेचन वाचले, तर मग त्याला असा संशय येईल की, मी शब्दच्छल करून त्याची फसवणूक करीत आहे. तो असेही सांगेल की ही फसवा- फसवी त्याच्या चांगलीच लक्षात आली आहे. त्याला असे वाटण्याची शक्यता आहे की, मी त्याच्या विभागाला राजकीय आणि आर्थिक स्वायत्तता नाकारण्याचा प्रयत्न करीत आहे, तोच माझा त्या 'चलाखी'मागचा हेतू आहे, असेही तो नमूद करील. मी असे करून त्याला त्या दोन क्षेत्रातील स्वायत्ततेऐवजी 'सांस्कृतिक स्वायत्तता' बहाल करून त्याची मी समजूत घालीत आहे असेही तो म्हणेल. या प्रादेशिक वाद्यांचे म्हणणे असे आहे की, सांस्कृतिक स्वायत्ततेची, आर्थिक आणि राजकीय सत्तेपासून फारकत केली की जे मागे उरेल, ते मूळ उद्दिष्टांशी तुलना करता नाममात्रही असणार नाही. राजकीय, आर्थिक आणि सांस्कृतिक प्रश्न हे एकमेकांपासून अलग करता येत नाहीत याची मला चांगली जाणीव आहे. तसेच प्रचलित राजकीय आणि आर्थिक चौकटीला अजिबात धक्का न लावता, जे कोणते सांस्कृतिक पुनर्जीवन होते त्याला फारसा अर्थ नसतो. हेही मला चांगले ठाऊक आहे. तशा प्रकारचे सांस्कृतिक पुनर्जीवन, हे जुनाट गोष्टी कृत्रिमपणे टिकवून धरण्यासारखे आहे, हेही मी जाणतो. आधुनिक परिस्थितीने एखादी संस्कृती कालबाह्य ठरवून, तिला जिवंत रहाणे अशक्य करून टाकले असेल. अशा या संस्कृतीच्या पुनरुज्जीवनाच्या प्रक्रियेत कशाची गरज असेल तर या विनाश पावणाऱ्या संस्कृतीची पुनर्स्थापना अथवा त्या संस्कृतीला नवजीवन प्राप्त करून देणे नसून, जुन्या मुळांना नवे धुमारे फुटून विद्यमान संस्कृतीची वाढ कशी होईल याची आवश्यकता आहे. निरोगी

प्रादेशिकवादाच्या राजकीय आणि आर्थिक परिस्थितीबाबत मी जे विवेचन करीत आहे. त्याला कर्तव्य नाही. तसेच त्याबाबत मी काही सांगावे असा अधिकारही नाही. या दोन्ही क्षेत्रातले माझे ज्ञान फारच मर्यादित आहे. तसेच एखाद्या खऱ्याखुऱ्या प्रादेशिकवाद्याला, आर्थिक आणि राजकीय प्रश्न हा मूलभूत (Primary) महत्त्वाचा वाटला पाहिजे आणि म्हणून त्याला त्या प्रश्नाशी कर्तव्य असले पाहिजे. असेही मला वाटत नाही. प्रत्येक विभागाची आपली वैशिष्टपूर्ण अशी संस्कृती असावयास हवी. तसेच ही संस्कृती आपल्या शेजारच्या विभागातील संस्कृतीशी सुसंवादी असावयास हवी; आणि शेजारच्या संस्कृतीला तिने संपन्न करावयास हवे. हे याबाबतीतले अनियत (Absolute) असे मूल्य आहे. हे मूल्य प्रत्यक्षात कृतीने यावे यासाठी लंडनमध्ये आणि इतरत्रही जे केंद्रीकरण झाले आहे त्याला काही राजकीय व आर्थिक पर्याय आहे का याचा तपास घेणे आवश्यक आहे. या ठिकाणी प्रश्न आहे तो पर्याय शक्य कोटीत आहे का याचा. संस्कृतीचे जे हे मूल्य आहे. त्याला आधार व पाठिंबा देण्यासाठी काय करता येईल याचा हा शोध आहे. हे करताना इंग्लंड या बेटाला इजा पोचणार नाही याची काळजी घ्यावयाची आहे. तसेच प्रादेशिकवाद्याला ज्यात जास्त करून रस आहे, त्या विभागालाही आपण करीत असलेल्या कृतीचा परिणाम होऊन धक्का बसणार नाही हेही पाहावयास हवे. परंतु हे सारे मी स्वत:ला घालून घेतलेल्या लेखन मर्यादेपलीकडचे आहे.

आपल्या सर्वांच्या असे लक्षात आले असेल की, आपणास मुख्यत: ब्रिटिश बेटावर जो संस्कृतींचा समूह आहे, त्यांच्याशीच कर्तव्य आहे. या भूभागात अजूनही काही असे भूभाग आहेत, की त्यांना आपल्या स्वत:च्या भाषा आहेत व त्या अजून चांगल्या जिवंत आहेत. या भूभागातील जे सांस्कृतिक वैविध्य आहे, त्यात जो अत्यंत स्पष्टपणे दिसणारा फरक आहे, त्याचाच विचार होणार आहे. हे विभाजन देखील दिसावयास जितके सोपे दिसते, तितके ते सोपे नाही. उदा. इंग्लिश बोलणारे आयरिश लोक घ्या. हे लोक आपली मातृभाषा गमावून बसलेले लोक आहेत. तसे असले तरी त्यांच्या मूळ भाषेची रचना त्यातले वाक्प्रचार– म्हणी, शब्द उच्चारण्याची पद्धत व त्या भाषेची लय हे पुरेशा प्रमाणात त्यांनी कदाचित जतन करून ठेवले असलेही. म्हणूनच या लोकांच्या लिहिण्यात व बोलण्यात त्यांनी जी इंग्लिश भाषा स्वीकारली आहे, त्या भाषेत इतरत्र कोठेही आढळणार नाहीत असे गुण आढळून येतील. याउलट बोली– भाषेचे (Dialect) आहे. या बोली– भाषांतून काही खुणाच फक्त जतन करून ठेवलेल्या असतील त्या सुद्धा संस्कृतीच्या अत्यंत खालच्या पातळीवर. तसेच या खुणासुद्धा, पूर्वी ज्या अनेक भाषा बरोबरीने वापरत असतील, त्यातून आलेल्या असतील. ग्रहाला जसे उपग्रह असतात, तसेच बलवान संस्कृतीला उपसंस्कृती असते. ही उपसंस्कृती आपली मूळ भाषा टिकवून धरते. तेच तिचे व्यवच्छेदक लक्षण आहे. परंतु ही मूळ भाषा, दुसऱ्या एखाद्या भाषेबरोबर फार मोठ्या प्रमाणावर संलग्न असेल आणि



अनुक्रमणिका

तिच्यावर अवलंबूनही असेल. म्हणूनच या उपसंस्कृतीतल्या फक्त काही सामाजिक वर्गातील सर्व लोक हे द्वैभाषिक असणारच. याबाबतीत छोट्या स्वतंत्र्य राष्ट्रांची जी संस्कृती आहे त्यापेक्षा ही उपसंस्कृती भिन्न असते. या छोट्या स्वतंत्र्य राष्ट्रातील फक्त काही सामाजिक वर्गातील लोकांना एखादी परकी भाषा अवगत असणे हा शिरस्ता आहे. परंतु या वर्गातील लोकांना एखादी जरी परकी भाषा जाणून घेणे आवश्यक असते. त्याच लोकांना आणखी दोन, किंवा तीन परकी भाषा येणे आवश्यक असते. हे असे असल्याकारणाने परक्या राष्ट्राच्या संस्कृतीकडे या छोट्या राष्ट्रांची संस्कृती खेचली जाण्याची जी प्रवृत्ती असते, त्यात एक प्रकारचे संतुलन येते. याचे कारण समजा तीन परक्या राष्ट्रांकडे ही मूळ छोट्या स्वतंत्र राष्ट्राची संस्कृती खेचली जाणार असल्याकारणाने एकाच परक्या राष्ट्राच्या संस्कृतीचा वरपगडा प्रस्थापित होत नाही. ज्या राष्ट्रांची संस्कृती कमकुवत आहे ती एखाद्या अधिक बलवान संस्कृतीच्या प्रभावाखाली येणे, हे इतिहासाच्या वेगवेगळ्या कालखंडात घडलेले आपण पहातो. एखाद्या अधिक बलवान संस्कृतीशी एखाद्या कमकुवत संस्कृतीचा कायमचा संबंध प्रस्थापित झाला म्हणजे मग त्या मूळ बलवान संस्कृतीची ती खरी उपसंस्कृती बनते हे कायमचे संबंध जे प्रस्थापित असतात त्यामागे भौगोलिक अथवा दुसरी अन्य कारणेही असतात.

मी ज्यास उपसंस्कृती असे म्हणतो, तिचा जेव्हा आपण विचार करतो तेव्हा त्या संस्कृतीने बलिष्ठ अशा मूळ संस्कृतीत विलिन होण्यास संमती का देऊ नये? तसे होऊ नये यासाठी आपणास दोन कारणे आढळतात. या अशा विलिनीकरणास घेण्यात येणारा पहिला आक्षेप इतका गहन व व्युत्पन्न आहे की तो केवळ जशाचा तसाच स्वीकारला पाहिजे. प्रत्येक सजीव प्राण्याची उपजत प्रवृत्ती अशी असते की आपण काही झाले तरी जिवंत राहिले पाहिजे, व आपले वांशिक सातत्य टिकून राहिले पाहिजे. विलिनीकरणाविरुद्ध जी नाराजी असते, ती काही वेळा तार स्वरात जाहीर केली जाते आणि त्या संबंधीच्या भावनाही प्रखर असतात. आपली संस्कृती ही तशी खालच्या दर्जाची आहे, ती पराभूत झालेली आहे. याची जाणीव ज्या व्यक्तींना झालेली असते, त्याच व्यक्ती हा आवाज उठवितात; आणि तशा प्रकारच्या भावना व्यक्त करतात. या व्यक्ती त्यांना ही जी जाणीव झालेली असते, या वस्तुस्थितीस कधीही मान्यता दर्शवींत नाहीत. हे मान्यता न देणे एक प्रकारच्या मूक मान्यतेसारखे असते. याउलट अन्य काही व्यक्तींकडून या विलिनीकरणाचे स्वागत केले जाते. या व्यक्ती ही पराभूत संस्कृती नाकारतात. या ठिकाणी एक गोष्ट खास करून लक्षात ठेवली पाहिजे. ती म्हणजे हे असे स्वागत करणाऱ्या व्यक्तीचा, त्याची पराभूत संस्कृती बलवान संस्कृतीत विलिनीकरण झाल्याकारणाने फायदाच होणार असतो. या व्यक्ती तसे झाल्याकारणाने जीवनात यशस्वी ठरणार असतात. त्यांना अधिक सत्ता, प्रतिष्ठा व संपत्ती यांची प्राप्ती होणार असते. या सर्व गोष्टी या व्यक्ती आपल्या मुळातील संस्कृतीला

चिकटून राहिल्या असत्या, तर या प्रमाणात प्राप्त झाल्या नसत्या. या ठिकाणी जे स्वखुषीने देशांतर करतात व त्या स्थलांतर केलेल्या देशात यशस्वी होतात त्यांच्या संबंधी काय म्हणता येईल? असा प्रश्न उपस्थित होणे स्वाभाविक आहे. एकतर ते आपल्या मायभूमीसंबंधी काही वेळा अतिशयोक्त ठरतील अशी भावना प्रगट करतात. ते आपल्या मायभूमीत सुट्टीचे दिवस घालविण्यासाठी येण्याची शक्यता असते, अथवा आपला वृद्धापकाळ ऐषआरामात, वैभवात घालविण्यासाठी ते मायदेशी परततात. क्षणभर, स्वखुषीने देशांतर केलेल्या या व्यक्तीचा मुद्दा बाजूस ठेऊ या. पराभूत संस्कृतीबद्दल काळजी बाळगणारे आणि ती संस्कृती नाकारणारे, अशा दोन प्रकारच्या व्यक्तींचा आपण विचार करू या. या दोघांनींही केलेल्या युक्तिवादाचा परामर्ष घेतल्यानंतर एक मुद्दा शिल्लक रहातो. तो म्हणजे जोषपूर्ण लोकांच्या कोणत्याही छोट्या गटाला, आपले खास व्यक्तित्व टिकवून धरण्याची इच्छा असते.

प्रादेशिक संस्कृती टिकवून ठेवली पाहिजे याचे दुसरे कारण येणे प्रमाणे. एकतर बलवान संस्कृतीपासून इतके लांब जायचे नाही, की बलवान संस्कृतीशी असलेला संबंध कायमचा तुटेल. हे कारण एखादी उपसंस्कृती ही एक कायमची उपसंस्कृती बनून का रहाते यालाही लागू पडते. उपसंस्कृती ही देखील बलिष्ठ संस्कृतीवर कितीतरी मोठ्या प्रमाणात प्रभाव पाडून असते. असे केल्याने तिला बाहेरच्या जगावर चांगलाच प्रभाव पाडता येतो. ती 'उपसंस्कृती', ही बलिष्ठ संस्कृतीपासून अलग होऊन 'संस्कृती' झाली असती, तर हा जागतिक स्वरूपाचा प्रभाव तिला पाडता आला नसता. उदा. आयर्लंड, स्कॉटलंड, आणि वेल्स या विभागांनी इंग्लंडपासून सर्वस्वी फारकत करून घेतली तर त्याचा परिणाम असा होईल की हे सर्व विभाग एक तर युरोपपासून अलग होतीलच. पण जगापासूनही अलग पडतील. मागच्या जुन्या संबंधाबाद्दल कितीही आवर्जून उल्लेख केला तरी त्याचा काहीही उपयोग होणार नाही. परंतु या प्रश्नांची जी दुसरी बाजू आहे, त्यात मला अधिक रस आहे. उपसंस्कृती ही टिकून रहाणे, हे बलिष्ठ संस्कृतीच्या दृष्टीने फार महत्त्वाचे आहे. उदा. वेल्स, स्कॉट, आणि आयरिश संस्कृती या उपसंस्कृती आणि इंग्लिश लोकांची बलिष्ठ संस्कृती. या सर्व संस्कृती समजा एकजीव झाल्या, त्यातला फरक कोणालाही ओळखता येईनासा झाला. तर मग काय होण्याची शक्यता आहे? एक तर आपण सर्वजण ओळख पटविण्याजोगे कोणतेही वैशिष्ट नसलेले बिन चेहऱ्याचे 'ब्रिटन'वासी होऊ. ते सुद्धा पूर्वी वेगवेगळे विभाग असताना ज्या सांस्कृतिक पातळीवर होतो, त्याहीपेक्षा खालच्या सांस्कृत्तिक पातळीवर असलेले 'ब्रिटन' या स्थितीला येऊन पोहचू. याउलट स्कॉटलंड, आयर्लंड आणि वेल्स या सर्व उपसंस्कृतीवर सातत्याने प्रभाव पाडत रहाणे, हे इंग्लिश संस्कृतीच्या दृष्टीने फारच फायद्याचे आहे.

दुसऱ्या लोकांची भरभराट होत असताना, त्याचवेळी जे लोक त्या दुसऱ्यांच्या संस्कृतीत

जी भर टाकतात, त्यानुसारच इतिहास त्याना जोखत असतो. शिवाय या भरभराटीनंतर त्या लोकांची जी संस्कृती तयार होते तेव्हा हे परके लोक त्या संस्कृतीत काय भर टाकतात त्याच्या अनुषंगाने इतिहास या परक्या लोकांचे मोजमाप घेतो. भाषा टिकवून धरण्याचा जो प्रश्न आहे, त्याकडे मी या दृष्टिकोनातून पाहतो. मला ज्या भाषांचा ऱ्हास चांगलाच झालेला आहे. त्यांच्यात रस नाही, भाषेचा ऱ्हास होणे याचा अर्थ मी पुढीलप्रमाणे गृहित धरलेला आहे. समाजातील अधिक सुशिक्षित अशा वर्गांच्या आविष्काराबाबत ज्या गरजा आहेत, त्यांच्या दृष्टीने भाषा पुरेशी नाही. असे झाले म्हणजे मग त्या भाषेचा ऱ्हास झाला आहे असे मी मानतो, आपली स्वत:ची भाषा, परदेशी लोकांना आवश्यक असे भाषा माध्यम वाटणे आणि या अशा लोकांची संख्या शक्य असेल तेवढी वाढणे, हे काही वेळा फायद्याचे व कीर्ती प्राप्त करून घेण्याचे साधन आहे असे सांगण्यात येते. एखादी भाषा ही अशा प्रकारे लोकप्रिय होणे, यात अनेक गंभीर स्वरूपाचे धोके दडलेले आहेत. हे धोके पत्करल्याशिवाय ती भाषा लोकप्रिय होईल की नाही याबद्दल मला खात्री नाही. काही भाषा बोलणारांची संख्या चांगलीच प्रचंड असते. या भाषेद्वारा अनेक वैज्ञानिकांनी आणि तत्त्वज्ञांनी आपले काम केलेले असते व लिखाणही केलेले असते. या वैज्ञानिकांनी आणि तत्त्वज्ञांनी याच भाषातून विचार केलेला असतो. या अशा रीतीने ज्या परंपरा निर्माण होतात त्या दुसऱ्या कोणत्याही गोष्टींपेक्षा वैज्ञानिक क्षेत्रातील आणि अमूर्त स्वरूपाच्या विचारांना अधिक चांगले वाहन ठरतात. थोडक्यात ज्या काही भाषा, प्रचंड संख्येने लोक बोलतात, त्यात वर मी ज्या धोक्यांचा उल्लेख केला आहे, ते धोके त्यामानाने कमी असतात. काही भाषांचा वापर फारच मर्यादित प्रमाणात होतो, या भाषांबद्दलचा विचार, ज्या भाषांचे त्यामानाने कमी ताबडतोबीचे आकर्षण असते. त्यांचा जसा विचार होतो, तसाच झाला पाहिजे.

उदा. वेल्श ही भाषा घ्या. या भाषेसंबंधी आपणास असा प्रश्न विचारता येईल की या विस्तीर्ण जगाच्या दृष्टीने तिला काही मूल्य आहे का? असा प्रश्न उपस्थित करणे म्हणजे वेल्शच्या खरोखरीच वेल्श म्हणून काही 'उपयोग' आहे का? असेच विचारण्यासारखे आहे. 'उपयोग' याचा अर्थ वेल्श भाषिक मानव एवढाच अर्थ तरी अभिप्रेत नाही, जी संस्कृती इंग्लिश नाही. त्या वेल्श संस्कृतीचे जतन करणारे आणि तिचे सातत्य कायम टिकवून धरणारे लोक असा घ्यावयाचा आहे. वेल्श राष्ट्रीक आणि वेल्श माता– पित्यांच्या पोटी जन्माला आलेले लोक. या दोघांनीही इंग्रजी भाषेतील काव्यास प्रत्यक्षपणे फारच मोठे योगदान केलेले आहे. तसेच वेगवेगळ्या राष्ट्रीय जमातीत (Race) जन्माला आलेल्या व्यक्तीवर, या वेल्श कवींचा प्रभावही मोठा लक्षणीय असाच आहे. वेल्श भाषेत लिहिले गेलेले भाष्य विस्तृत व भरपूर आहे. हे सारे काव्य वेल्श मध्ये इंग्रजीभाषेने प्रवेश करण्याअगोदर लिहिले गेले होते. ही वस्तुस्थिती देखील तितकिशी प्रत्यक्ष महत्त्वाची नाही. याचे कारण जे कोणी वेल्श भाषा शिकण्याचा त्रास घेणार आहेत त्यानी या वेल्श काव्याचा

अभ्यास का करू नये, यासाठी काहीही कारण सध्या तरी उपलब्ध नाही लॅटिन आणि ग्रीक भाषेत लिहिलेल्या काव्याचा आपण इंग्लिश लोक अभ्यास करतोच की. वरवर पाहता असे स्पष्टपणे दिसते की वेल्श कवीनी फक्त इंग्लिश भाषेतच काव्य करावे. तसे न करण्यास काहीही कारण नाही. या दोन्ही भाषात काव्य करून, पहिल्या श्रेणीतले पद पटकाविलेल्या एकाही कवीचे उदाहरण मला माहीत नाही. तसेच ज्या वेल्श कवीनी प्रामुख्याने इंग्रजीत लेखन केले त्यांच्याच साहित्यकृतीनी इंग्रजी काव्यावर प्रभाव पाडला आहे. इंग्रजी भाषेवर वेल्शचा जो प्रभाव आहे, तो त्या पुरताच मर्यादित आहे. परंतु या ठिकाणी एक लक्षात ठेवले पाहिजे की संस्कृती परंपरागत करण्याकरता, एका विशिष्ट प्रकारे विचार करणे, वाटणे, आणि वर्तणूक करणे– आणि ती टिकवून धरण्यासाठी भाषेव्यतिरिक्त अन्य कोणचेही भाषेइतके खात्रीलायक संरक्षक कवच नाही. या कामासाठी व संस्कृती टिकून रहाण्यासाठी, भाषा– ही वाङ्मयीन भाषा– म्हणून सातत्याने वापरात असली पाहिजे. वाङ्मयीन याचा अर्थ, ती भाषा विज्ञानाचीही भाषा असणे आवश्यक आहे असे नाही. परंतु ती काव्यरचनेची भाषा निश्चितपणे असली पाहिजे. तसे नसले तर शिक्षणाच्या प्रसारानेच ती भाषा नाहीशी होईल. या भाषेत लिहिले गेल्यामुळे बाहेरच्या जगावर अर्थातच प्रत्यक्ष काही प्रभाव पडेल. त्यावर ठसा उमटेल असे नाही. परंतु भाषेचे संगोपन व मशागत होत नसेल तर त्या भाषेचे जे भाषिक आहेत. (या ठिकाणी खास करून वेल्श भाषा हे उदाहरण म्हणून प्रस्तुत आहे) ते आपली खास अशी वांशिक (RACIAL) प्रकृती गमविण्याची प्रवृत्ती दाखवतील. म्हणजेच वेल्श हे दिवसें दिवस कमी वेल्श होत जातील, आणि त्या भाषेतील जे कवी आहेत त्यांच्याकडून इंग्लिश वाङ्मयाला योगदान होण्याचेही थांबेल. अर्थात ज्या कोणाकडे वैयक्तिक अशी बुद्धीची चमक असेल, तिचा इंग्रजी भाषेशी सहकार जरूर असेल. पण त्या पलीकडे काहीही नाही, आणि माझे असे मत आहे की, इंग्लिश वाङ्मयाचा स्कॉट, वेल्श आणि आयरिश लेखकांमुळे खूपच फायदा झाला आहे. आपण अशी कल्पना करू या, इंग्लिश कुटुंबानी, हे सारे प्रज्ञावंत अगदी बाल्याव्यवस्थेत असताना दत्तक घेतले आणि कालांतराने त्यानी इंग्लिश वाङ्मयात जी भर घातली असती, त्यामुळे इंग्लिश वाङ्मयाचा फायदा झाला असता हे खरे आहे. पण तो फायदा ते प्रज्ञादान वेल्श, स्कॉट आणि आयरिश राहून झाला असता, त्यापेक्षा कितीतरी प्रमाणात कमीच राहिला असता.

विवेचनाचा फाफट पसारा घालण्याची माझी इच्छा नाही. ते सोपे व सुटसुटीत ठेवून जे गुण मिळतील ते पदरात पाडून घेण्याशी मला कर्तव्य आहे. इंग्लिश ही इंग्लिश सातत्याने राहाणे आवश्यक आहे; या सूत्राचा बचाव करण्याशीही मला कर्तव्य नाही. मला ते सूत्र गृहित धरणेच भाग आहे. पण वेळप्रसंगी या गृहित धरलेल्या सूत्राबद्दल कोणी वाद उपस्थित केलाच, तर त्याचे समर्थन मला अन्य ठिकाणी करावे लागेल. परंतु मी जे सूत्र मांडणार आहे, त्याचे यशस्वी समर्थन केले, म्हणजे मग मी गृहित धरलेले सूत्र बरोबर आहे, हे



अनुक्रमणिका

वाचकांच्या लक्षात येईल. मी मांडणार असलेल्या सूत्रानुसार वेल्श व्यक्तींनी वेल्श रहावे, स्कॉट व्यक्तींनी स्कॉट रहावे, आणि आयरिश व्यक्तींनी आयरिश रहावे, आणि त्याना तसे राहू देण्यास मदत केल्यास इंग्लंडचा फायदा होणार आहे. मी मांडीत असलेले सूत्र योग्य आहे, असे दाखवून दिले की मग इंग्लिश व्यक्तींनी इंग्लिश रहाण्याचे सातत्य टिकवू धरणे हे इंग्लडसाठीही फायद्याचे आहे. हे मान्य करण्यास वाचक प्रवृत्त होतील. ब्रिटिश बेटावरील इतर सर्व संस्कृती, इंग्लिश संस्कृतीने सर्वस्वी बुडवून टाकल्या, तर त्याकारणाने इंग्लिश संस्कृतीचा विनाश ओढविण्याची शक्यता आहे. हे प्रतिपादन मी मांडीत असलेल्या सूत्रातील महत्त्वाचा व आवश्यक भाग आहे. अनेक लोक असे गृहित धरताना दिसतात की इंग्लिश संस्कृती ही स्वयंपूर्ण आणि सुरक्षित आहे. काहीही झाले तरी ती टिकून राहील. कोणताही परकीय प्रभाव हा हानीकारक ठरण्याची शक्यता आहे. हे कबूल करण्यास काहीजण नकार देतात. याउलट युरोपखंडापासून सर्वस्वी अलग राहून इंग्लिश संस्कृतीची भरभराट होईल असे आत्मसंतुष्टपणे गृहित धरतात. खुद्द इंग्लडमधल्या इंग्लिशभाषेत स्थानिक स्वरूपाच्या अनेक वैशिष्टपूर्ण लकबी आहेत. असे समजा की ही त्यामानाने गरीब वैशिष्टें पार नाहीशी झाली, तसेच इंग्लिश संस्कृतीच्या परिघाच्या थोड्याशा बाहेर असलेल्या संस्कृतीही नाहीशा झालया, तर मग त्याचा परिणाम काय होईल? ही स्थानिक वैशिष्टें, व त्या संस्कृती नाहीशा झाल्याने इंग्लिश संस्कृतीवर संकट कोसळण्याचा संभव आहे. यासंबंधी विचार करण्याचे कोणाच्याही कधीही मनात येत नाही. संस्कृतीचे जे जीवशास्त्र आहे. त्याकडे आपण पुरेसे लक्ष दिलेले नाही. या ब्रिटिश बेटावर सर्वत्र, सर्वस्वी सांस्कृतिक एकछायीपणा आला, तर त्यामुळे सर्वस्वी एका खालच्या पातळीवरची संस्कृती जन्मास येण्याचा संभव आहे असे मला वाटते.

'प्रादेशिकवाद' असा जो प्रश्न आहे. त्याचे उत्तर देण्याचा मी प्रयत्न करीत नाही, हे यावरून स्पष्ट व्हावे. ते काहीही असो, स्थानिक गरजा आणि शक्यता या दोन्ही लक्षात घेऊन, अनिश्चित प्रकारे त्या प्रश्नाचे 'उत्तर' त्या त्या गरजा व शक्यतानुसार बदलत जाणार हे ओघानेंच आले. या प्रश्नात जे घटक आहेत, ते मी सुटे करण्याचा प्रयत्न करीत आहे. त्याची पुन्हा एकदा नव्याने जोडणी करण्याचे काम मी इतरांवर सोपविले आहे. एखाद्या विशिष्ट प्रादेशिक सुधारणांसाठी केलेल्या नेमक्या सूचनांस माझा पाठिंबा नाही, वा विरोधही नाही. या प्रश्नाची सोडवणूक करण्यासाठी जे प्रयत्न केले जातात. त्यातल्या बहुतेक प्रयत्नात एक उणीव असते. कोणत्याही प्रदेशातल्या सांस्कृतिक, राजकीय आणि आर्थिक बाजूत वैविध्य असते, तसेच ऐक्यही असते. या प्रश्नाची सोडवणूक करण्यासाठी होणाऱ्या प्रयत्नात ते ऐक्य वा विविधता यापैकी एकाचीही तपशीलात जाऊन तपासणी होत नाही. म्हणूनच ते प्रयत्न अयशस्वी होत असावेत. त्यातली एकच बाजू, बाकीच्या इतर बाजू विचारात न घेता, विचारात घेऊन जो कार्यक्रम तयार होईल, तो तद्दन चुकीचा ठरेल. त्यात वर उल्लेखिलेल्या



अनुक्रमणिका

त्रुटी राहून गेलेल्या असतील. 'प्रादेशिकवादा'च्या भूमिकेमागे, जो राष्ट्रीयत्वाचा हेतू असतो, तो पराकोटीच्या टोकाला लटकत नेला, तर त्यामुळे आपण निश्चितपणे वेडगळपणाच्या रोखाने खेचले जाऊ. ब्रेटाँ आणि फ्रान्स यांचे एकमेकांबरोबरचे हितसंबंध, वेल्श यांचे इंग्लिशांबरोबरचे घनिष्ट संबंध, हे त्यात अंतर्भूत असलेल्या सर्वांनाच हितकर आहेत. ब्रिटन आणि वेल्स यांचे सहकार्य होऊन, त्यांचे अनुक्रमे फ्रान्स आणि इंग्लंड यांच्या बरोबरचे संबंध तुटले, तर ते नि:संशयपणे दुर्दैवीच ठरेल. एखाद्या राष्ट्रीय संस्कृतीची भरभराट व्हावयाची असेल, तर संस्कृती, ही संस्कृतींच्या एका समुहातून तयार झालेली संस्कृती असली पाहिजे. या समूहात सामिल झालेले जे घटक असतात, ते आपला स्वत:चा फायदा साधताना, समष्टीचाही फायदा साधतात.

विवेचनाच्या या ठिकाणी मी एका नव्या संकल्पनेची ओळख करून देणार आहे. ती म्हणजे समाजात जे वेगवेगळे घटक असतात त्यात घर्षण (Friction) असणे हे समाजाच्या दृष्टीने अतिशय महत्त्वाचे (Vital) आहे. यंत्राच्या क्षेत्रातून आलेल्या उपमांच्या द्वारा आपणास विचार करण्याची सवय आहे. समाज हे एक-यंत्र आहे असे आपण मानू या. या यंत्राची योग्य वेळी, शक्य असेल तेव्हा, साफसफाई व्हावयास हवी. त्याला तेलपाणी मिळाले पाहिजे. या यंत्रात उत्तमातल्या उत्तम पोलादापासून तयार केलेली बॉल बेअरिंग्ज बसविली पाहिजेत. यंत्रात होणाऱ्या घर्षणामुळे ऊर्जा वाया जाते; हे आपणास ठाऊक आहे. मी आणखी कोणत्याही प्रकारच्या उपमा– प्रतिमा. यंत्राऐवजी आणणार नाही कदाचित् आपण विवेचनात अशा एका टप्प्यावर येऊन ठेपलो असू की आपण दृष्टांताचा जितका कमी वापर करू तितके अधिक चांगले. मी या अगोदरच्या एका भागात असे सुचविले होते की कोणताही समाज, जो आता स्थिरावला आहे व प्रस्थापित झाला आहे त्यात जाती असल्या किंवा तो समाज वर्गविहीन असला, तर त्या समाजाच्या संस्कृतीचा ऱ्हास होतो. आपणास या सूत्राची मांडणी वेगळ्या प्रकारे करता येईल. एका वर्गविहीन समाजाचे परिवर्तन एका वर्गरचना असलेल्या समाजात होणे आणि वर्गरचना असलेल्या समाजाची आगेकूच वर्गभेद दर्शविणारी वैशिष्ट्ये नाहीशी होण्याच्या दिशेने होणे हे स्वागतार्ह आहे. सामाजिक वर्ग आणि राष्ट्रातील विभाग, हे एखाद्या राष्ट्रातील लोकसंख्येची विभागणी, दोन भिन्न अशा गटात करतात. असे केल्याने त्यातून जो संघर्ष निर्माण होतो, तो संघर्ष नवनिर्मिती आणि प्रगती या दोघानांही पोषक ठरतो. समाजाला लाभदायक असलेले संघर्ष व असूया ही भावना, यांची संख्या अगणित आहे. वर्ग व प्रदेश हे त्यापैकी फक्त दोन, जितके संघर्ष जास्त तितके ते अधिक चांगले, असे झाले म्हणजे मग, प्रत्येकजण, कोणाबरोबर तरी सहकार करून कोणत्या ना कोणत्या संघर्षात सहभागी होतो. त्याजबरोबर दुसऱ्या अनेक बाबतीत एके ठिकाणच्या सहकाऱ्यांच्या तो विरोधात असतो. म्हणूनच असूया, भीती आणि कोणताही एक संघर्ष प्रभुत्व गाजविणार नाही.

आपण स्वत: एक व्यक्ती म्हणून आपणास असे आढळून येते की आपल्या आयुष्याच्या वाटचालीत आपण ज्या लोकांस भेटतो, त्या लोकांवर आपला विकास अवलंबून असतो. (या लोकांत ज्या लेखकांची पुस्तके वाचतो त्यांचा आणि ललित वाङ्मय व इतिहास विषयक पुस्तके यात भेटणाऱ्या व्यक्तींचा समावेश आहे. या भेटणाऱ्या व्यक्तीत आढळून येणारे फरक व सारखेपणा, त्यांच्यातले संघर्ष, त्याचबरोबर व्यक्ती व्यक्तीमधून आढळून येणारी सहानुभूती या सर्वांमुळे त्या व्यक्तींना भेटल्यानंतर फायदा होतो. योग्य वेळी योग्य मित्र ज्यास भेटतो, तो मनुष्य भाग्यवान. तसेच योग्य वेळी योग्य शत्रू ज्यास प्राप्त होतो. तोही मनुष्य भाग्यवान. शत्रूचा नि:पात करणे मला पसंत नाही. शत्रूंना या जगातून पार नाहीसे करायचे किंवा रानेटी भाषेत सांगायचे झाल्यास त्यांचे शिरकाण करण्याचे धोरण, हे आधुनिक युद्ध व शांतता यांच्यातून विकसित झालेले आहे. विशेषत: ज्यांना संस्कृती जिवंत रहावी असे वाटते त्यांच्या दृष्टीने हा अत्यंत धोकादायक असा विकास आहे. प्रत्येकाला शत्रूची जरुरी आहे. व्यक्ती व्यक्तीमधील संघर्ष, अथवा गटागटातील संघर्ष ही सभ्यतेच्या (Civilisation) दृष्टीने आवश्यक गोष्ट आहे असे मला वाटते. शांततेची सर्वात उत्कृष्ट हमी कोणती असेल तर चिडाचिडीचे त्रासिकतेचे सार्वत्रिक सामाजिक विभाजन. हे ज्या देशात एका विशिष्ट मर्यादपलीकडे गेले आहे, तो देश स्वत:लाच धोका उत्पन्न करतो. तसेच ज्या देशात ऐक्यभावना पराकोटीची असते, मग ही ऐक्य स्वाभाविक अथवा काही विशिष्ट मार्गांचा अवलंब करून, प्रामाणिक उद्दिष्टांच्या मदतीने अथवा फसवणूक व दडपशाही यांचा उपयोग करून, का होईना, झालेले असले तर ते ऐक्य इतरास धोकादायक ठरते. उदा. इटली व जर्मनी या दोन्ही राष्ट्रांवर राजकीय– आर्थिक उद्दिष्टांच्या बरोबर हिंसेचा अवलंब करून, अत्यंत घाईघाईने ऐक्य लादण्यात आले होते. हे अशा प्रकारे लादलेल्या ऐक्याचे या दोन राष्ट्रांवर झालेले परिणाम दुर्दैवीच होते. एका पराकोटीच्या आणि विभागाचे उपविभाग होण्यातही पराकोटीला गेलेल्या प्रादेशिकतेच्या इतिहासाच्या वाटचालीत या दोन्ही देशांच्या संस्कृतीचा विकास झाला होता. जर्मनांना आपण जर्मन आहोत म्हणून विचार करावयास लादण्याच्या शिकवणुकीचे प्रयत्न आणि एखाद्या छोट्या परगण्याचे अथवा शहराचे आपण स्थानिक रहिवाशी नसून या उलट आपण प्रथम इटालियन अशा प्रकारे विचार करण्यास इटालियनांना शिकविण्याचा प्रयत्न, या दोन्ही गोष्टींमुळे केवळ ज्या परंपरागत संस्कृतीतूनच भविष्यकाळातील या दोन देशांच्या संस्कृतीची संभाव्य वाढ होती तिच्यात बिघाड उत्पन्न झाला.

संघर्ष अनेक प्रकारचे असतात. त्यातून निर्माण होणाऱ्या निष्ठा अनेकवेळा एकमेकांना छेदणाऱ्या असतात. या महत्त्वाच्या वस्तुस्थितीवर भर देऊन एखाद्या राष्ट्रात त्या संघर्षाचे महत्त्व ही कल्पना अधिक असंदिग्धपणे मला मांडता येईल. सामाजिक वर्ग आणि विभाग, याप्रकारे प्रत्येक देशात व समाजात विभाजन असते. आपण फक्त या दोघांचाच विचार करू

या. विभाजनातले हे दोन घटक एकमेकांविरुद्ध काही प्रमाणात कार्यप्रवण असतातच. प्रादेशिक संस्कृतीतून आलेल्या ज्या व्यक्ती असतात, त्यांना काही विशिष्ट समान हितसंबंध आणि काही विशिष्ट गोष्टींबद्दल सहानुभूती वाटत असते. हीच गोष्ट वर्गीय हितसंबंधाबाबतही असते. एकाच प्रादेशिक संस्कृतीत सर्वांचेच वर्गीय हितसंबंध समान नसतात. दोन वेगवेगळ्या प्रादेशिक संस्कृतीतील एखाद्या विशिष्ट वर्गाचे हितसंबंध सारखे असण्याची शक्यता असते. अशा प्रकारे एकमेकांना छेद देणारी अनेक विभाजने प्रत्येक राष्ट्रात असतात. त्याची मदत समाजात शांतता नांदण्यास होते. कारण या अशा विभाजनामुळे समाजात नेहमीच अस्तित्वात असलेल्या द्वेषभावनेत गोंधळ निर्माण होतो आणि ती सर्वत्र पसरल्यामुळे तिचा जोरही कमी होतो. आपल्या स्वत:च्याच समाजात असला गोंधळ असल्याकारणाने असे राष्ट्र आंतरराष्ट्रीय क्षेत्रात शांतता पसंत करते. याचे कारण प्रत्येक व्यक्तीला आपल्या मनातील आक्रमक प्रवृत्तीला वाट करून देण्यासाठी, त्या प्रवृत्तीचा निचरा होण्यासाठी, भरपूर संधी उपलब्ध असते. बहुसंख्य व्यक्तींना परदेशी व्यक्ती आवडत नाहीत. परकीय लोकांबद्दल समाजातील बहुसंख्य लोकांना ज्ञान प्राप्त करून घेणेही शक्य नसते. एखाद्या राष्ट्रात समजा बाकी सर्व गोष्टी समान आहेत. पण समाजात एक वर्गीय उतरंड आहे, हे असे राष्ट्र, या राष्ट्रासारखे ज्या राष्ट्रात सामाजिक संघटन नसते, त्यापेक्षा अधिक शांततावादी व अधिक सहिष्णु असण्याचा संभव आहे.

येथवर, आपण मोठ्या गोष्टींकडून छोट्या गोष्टीकडे गेलो आहोत. अनेक प्रकारच्या संख्येनेही प्रचंड अशा प्रादेशिक संस्कृती आहेत. प्रादेशिक संस्कृतीचे पृथ:करण केले तर त्याही आपल्यापेक्षा अगदी छोट्या छोट्या संस्कृतीपासून तयार झालेल्या असतात. अनेक प्रादेशिक संस्कृतीतून राष्ट्रीय संस्कृती तयार होते, असे आपणास आढळून येते. प्रत्येक खेडे आणि अधिक दृष्य स्वरूपात प्रत्येक मोठे शहर, या दोघांनाही आपली स्वत:ची वैशिष्ट्यपूर्ण अशी प्रकृती असावयास हवी. ती व्यवस्था आदर्श व्यवस्था ठरेल. परंतु मी या पूर्वीच सुचविले आहे की राष्ट्रीय संस्कृतीने बाहेरच्या संस्कृतीशी संबंध ठेवले तर ते अधिक चांगले. या दोघांनी आदान प्रदान करावे. आता आपण अगदी विरुद्ध दिशेने जाणार आहोत– छोट्या गोष्टींकडून मोठ्या गोष्टीकडे. याप्रकारे, मार्ग कापण्यास आपण सुरुवात केल्यानंतर, 'संस्कृती' या संकल्पनेच्या आशयातच थोडा बदल झालेला आढळतो. आता या शब्दाचा अर्थ थोडासा वेगळाच होतो. आपण एखाद्या खेड्याच्या, एखाद्या छोट्या विभागाच्या, ब्रिटन सारख्या एखाद्या बेटाच्या संस्कृतीबद्दल बोलणार असलो, तर त्याचा अर्थ बदललेला आहे असे आढळते. वास्तविक ब्रिटन हे बेट अनेक सुस्पष्ट अशा वांशिक संस्कृतीतून तयार झालेले आहे, असे असले तरीही हा बदल आढळतो. तसेच याबदला संबंधी आपण जेव्हा युरोपीय संस्कृतीचा विचार करताना बोलतो, तेव्हा त्या शब्दाचा मूळ अर्थ जो आपण गृहित धरलेला असतो, त्यात प्रचंड बदल झालेला असतो. ब्रिटनची संस्कृती हा शब्द उच्चारल्यानंतर

आपणास जो बदल आढळतो. त्यापेक्षा युरोपीय संस्कृती या शब्दाच्या अर्थात झालेला बदल कितीतरी पटीने अधिक असतो. समाजातील राजकीय संस्थांपैकी, बहुतेक सर्व संस्था खेडे हा घटक लक्षात घेऊन विचार केला असता, आपणास त्याज्य ठरवाव्या लागतात. त्याजबरोबर, संस्कृतीच्या या अशा छोट्या छोट्या घटकात, शासनाबाबत सर्वसामान्यपणे निश्चित अशी एकवाक्यता असते. होली रोमन एम्पायर या नावाने इतिहासात ओळखले जाणारे साम्राज्य, हे याबाबतीतले एक मोठे बोलके व प्रसिद्ध उदाहरण आहे. या साम्राज्याच्या अस्तित्वाचा बहुतेक काळ हा तसा अस्थिर होता आणि ते साम्राज्य तसे सामान्यपणे तसे नाममात्र अस्तित्वात होते, हेही खरी आहे. पण मुद्दा तो नाही, मुद्दा सरकारी शासन व्यवस्थेच्या ऐक्याबाबतचा आहे. पश्चिम युरोपच्या सांस्कृतिक ऐक्याची प्रकृती काय व कशा प्रकारची आहे. यासंबंधी मी इतरत्र लिहिले आहे. त्याचा पुनरुच्चार मी येथे करीत नाही. परंतु जागतिक संस्कृती या संकल्पनेला अर्थ असलाच, तर तो काय असेल या संबंधी तलाश करण्यास मी मार्गस्थ होणार आहे. जागतिक सरकार असावे आणि जागतिक संघराज्य असावे, यासंबंधीच्या नानाविध योजनांचे जे खंदे पुरस्कर्ते आहेत, त्या सर्वांना,'शक्य कोटीतील' जागतिक संस्कृती कशी असेल याचा शोध घेण्यात निश्चित रस असेल. अस्तित्वात असलेल्या संस्कृती, एका विशिष्ट बिंदूनंतर, एकमेकांच्या विरोधात असतात हे उघड आहे. त्या इतक्या विरोधात असतात की त्यांच्यात दिलजमाई होणे केवळ अशक्य म्हणूनच अशी परिस्थिती आहे तोवर, राजकीय, आर्थिक हे सारेच प्रयत्न विफल ठरणार हे ओघानेच आले. मी एका विशिष्ट बिंदूनंतर असे म्हटले याला एक कारण आहे. ते म्हणजे कोणत्याही दोन संस्कृतीतील संबंधात, त्या दोन्ही संस्कृती नेहमीच दोन परस्पर विरोधी असतात. त्या एकमेकाला छेद देऊन संतुलन साधतील. आकर्षित करणारी एक शक्ती, आणि प्रतिसारण करणारी दुसरी शक्ती. आकर्षण नसले तर त्या दोन संस्कृतींचा एकमेकांवर प्रभाव पडणार नाही. प्रतिसारण नसेल. तर दोन वेगवेगळ्या संस्कृती म्हणून या दोन्ही संस्कृती टिकून राहणार नाहीत. फक्त आकर्षणच असले, तर एक संस्कृती दुसऱ्या संस्कृतीला आपल्यात सामावून घेईल, किंवा त्यांचे मीलन होईल. 'जागतिक सरकार' या कल्पनेचे जे कडवे पुरस्कर्ते असतात, ते काही वेळा एक गोष्ट गृहित धरताना मला आढळून येते. ते ती गोष्ट अजाणता गृहित धरतात हेही खरे आहे. ती गोष्ट म्हणजे संघटनेतील ऐक्याला (याठिकाणी जागतिक सरकार) एक संसिद्ध (Absolute) असे मूल्य आहे. दोन संस्कृतीतील फरक जर या मूल्याच्या आड येत असेल तर त्या संस्कृती रद्दबातल ठरविल्या पाहिजेत. हे पुरस्कर्ते जर मानवतावादी या वर्गात मोडणारे असले, तर ते असे गृहित धरतील की ही रद्दबातल ठरविण्याची प्रक्रिया कोणाला त्रास न देता, अगदी स्वाभाविकपणे घडेल. ते पुरस्कर्ते एक गोष्ट गृहित धरतात आणि आपण ती गोष्ट गृहित धरली आहे हे त्यांच्या गावीही नसते. हे मानवतावादी ज्या संस्कृतीचा घटक आहेत, त्याचा विस्तार होऊन ती जागतिक संस्कृती



अनुक्रमणिका

तयार होणार आहे ही गोष्ट ते अजाणतेपणे गृहित धरतात. आपल्या रशियन मित्रांचा दृष्टिकोन जास्त वस्तुनिष्ठ आहे. त्यांचा तो वस्तुनिष्ठ दृष्टिकोन इत:पर व्यवहारी ठरणार नाही हे खरे. परंतु दोन संस्कृतीत ज्यासंबंधी दिलजमाई होणे शक्य नाही असे घटक असतात. अशा परिस्थितीसंबंधी रशियन मित्रांना अधिक जाणीव आहे. म्हणूनच त्यांचा दृष्टिकोन असा आहे की, आपल्या संस्कृतीशी ज्या संस्कृतीचे जुळणार नाही, तिला उखडून नाहीसे करून टाकले पाहिजे.

जागतिक स्तरावर, नियोजन करणारे लोक आपले काम गांभीर्याने करीत असतात. तसेच जे मानवतावादी आहेत त्यानी वापरलेले मार्ग यशस्वी होतील असा आपला जर विश्वास असेल, तर एक परिणाम संभवतो. संस्कृती संबंधात जे कोणी हिंसक मार्ग वापरतात, त्यांच्यापेक्षा हे मानवतावादी अधिक गंभीर स्वरूपाचा उपद्रव देणारे ठरतील. स्थानिक-प्रादेशिक संस्कृतीचे मूल्य किती मोठे आहे याबद्दल मी या अगोदरच प्रतिपादन केले आहे. त्यावरून एकच निष्कर्ष काढावा लागतो. तो म्हणजे, जी जागतिक संस्कृती ही नुसती 'एकछत्री' संस्कृती आहे ती मुळी संस्कृतीच नाही. मानवता या संकल्पनेतून मानवता काढून घेतलेली ती मानवता ठरेल, ही परिस्थिती मोठीच चक्रावणारी आहे. परंतु याउलट, जागतिक संस्कृती ही कल्पना, आपण सर्वस्वी त्याज्य ठरविणेही बरोबर नाही. युरोपीय संस्कृतीचा आदर्श समोर ठेवून, आपण समाधानी राहणार असलो, तरी सरतेशेवटी त्या संस्कृतीच्या आखीव व रेखीव सरहद्दी ठरविणे आपणास शक्य होणार नाही. युरोपीय संस्कृतीचा असा भूभाग जरूर आहे, पण त्याला निश्चित अशी सरहद्द नाही; आणि या सरहद्दीवर, चीनच्या प्रख्यात भिंतीसारखी चिनी- भिंत उभारता येणार नाही. शुद्ध व स्वयंपूर्ण अशी युरोपियन संस्कृती ही कल्पना, स्वयंपूर्ण अशी राष्ट्रीय संस्कृती, या कल्पनेइतकी घातकी आहे. अखेरीस, दुसऱ्या कोणाच्याही संस्कृतीचा स्पर्श झालेला नाही, अशी स्थानिक संस्कृती, इंग्लंडमधल्या खेड्यात, परगण्यात, टिकवून धरण्याची कल्पना जितकी खुळचट आहे, तितकीच शुद्ध व स्वयंपूर्ण अशी युरोपियन संस्कृती ही कल्पना खुळचट आहे. म्हणूनच एका बाजूने, जागतिक संस्कृती हा आदर्श नजरेसमोर कायम ठेवण्यासाठी आपणावर दबाव हे आहे, हे खरे. पण त्याजबरोबर, आपणास ज्यासंबंधी काहीही कल्पना करता येत नाही असे काही तरी ते आहे; हेही कबूल करणे भाग आहे. अनेक संस्कृतीतील संबंध व्यक्त करणारी ती तर्कशुद्ध संकल्पना आहे. याच स्वरूपात आपणास त्यासंबंधी अंदाज बांधता येतात. आपण असे म्हणतो की ब्रिटनच्या प्रत्येक भागाला, एका विविक्षित अर्थाने, समान संस्कृती असली पाहिजे. त्याजबरोबर, ही समान संस्कृती वेगवेगळ्या स्थानिक आविष्कारातून प्रत्यक्ष कृतीत येते हेही आपण जाणतो. हे जसे आहे. तसेच जागतिक संस्कृतीचेही आहे. म्हणूनच आपण अशा एका समान जागतिक संस्कृतीसाठी झटले पाहिजे, की ती जागतिक संस्कृती अशी असेल की त्यामुळे त्या संस्कृतीत अंतर्भूत असलेल्या घटकांचे वैशिष्ट्य कमी



अनुक्रमणिका

होणार नाही. विवेचनात या ठिकाणी आल्यानंतर, सरतेशेवटी आपणसा 'धर्म' या गोष्टीला सामोरे जावे लागते. येथवरच्या विवेचनात एकाच राष्ट्रातील वा प्रदेशातील स्थानिक स्वरूपाच्या वैशिष्ट्यांचा विचार झाला. परंतु त्या विवेचनात, आपणास धर्म या गोष्टीस सामोरे जावे लागते. येथवरच्या विवेचनात एकाच राष्ट्रातील वा प्रदेशातील स्थानिक स्वरूपाच्या वैशिष्ट्यांचा. विचार झाला. परंतु त्या विवेचनात आपणास धर्म या गोष्टीशी मुकाबला करावा लागला नव्हता. सरतेशेवटी एकमेकांविरुद्ध असलेले धर्म, याचा अर्थ एकमेकांविरुद्ध ठाकलेल्या संस्कृती हाच आहे, म्हणजेच काही झाले तरी, दोन वेगवेगळ्या धर्मात दिलजमाई शक्य नाही. रशियन सरकारच्या अधिकृत दृष्टिकोनानुसार, धर्माच्याबाबतीत त्यांचे दोन आक्षेप आहेत. प्रत्येक नागरिकाची निष्ठा त्याच्या राष्ट्रालाच असली पाहिजे. म्हणजे राष्ट्र हे निष्ठेचे एक केंद्र. धर्म हे निष्ठेचे आणखी एक केंद्र बनते हा त्या दोन आक्षेपातील पहिला आक्षेप. अनेक श्रद्धावान लोकांच्या श्रद्धेवर व पाठिंब्यावर या जगात अनेक धर्म घट्ट पाय रोवून आजही सातत्याने विद्यमान आहेत. हा त्या सरकारचा दुसरा आक्षेप. पहिल्या आक्षेपापेक्षा या दुसऱ्या आक्षेपाचे स्वरूप हे त्यामानाने अधिक गंभीर आहे. याचे कारण ज्या राष्ट्रात फक्त एकच धर्म विद्यमान आहे. त्या ठिकाणी धर्माचे स्वरूप सूक्ष्मदर्शी चलाखीने बदलणे नेहमीच शक्य असते. असे झाले म्हणजे मग, राष्ट्राला विरोध करण्यास प्रोत्साहन देण्याऐवजी राष्ट्राशी निष्ठा म्हणजेच धर्म- निष्ठा असे धर्माला सांगता येते.

जागतिक संस्कृती प्रत्यक्षात येणे अशक्य आहे. शिवाय इतरही अनेक प्रकारच्या अडचणी आहेत. आपणास ज्या नजरेआड करता येणार नाहीत अशा दुसऱ्याही अनेक अडचणी आहेत. त्याही विचारात घेतल्या पाहिजेत. आपण येथवर संस्कृतीविषयी जो विचार केला तो अशाप्रकारे, की त्या सर्व संस्कृती विकासाच्या एका विशिष्ट प्रक्रियेद्वारा अस्तित्वात आलेल्या आहेत. एकाच ठिकाणच्या, एकाच लोकांची संस्कृती कशी विकसित होत गेली हे ती प्रक्रिया आपणास सांगते. परंतु मग वसाहतवाद आणि वसाहती करणे हे प्रश्न शिल्लक राहतातच, 'वसाहत' या शब्दाला दोन वेगवेगळे अर्थ असल्याकारणाने, त्या शब्दाला जगात दोन प्रकारच्या भूमिका पार पाडाव्या लागतात, ही दुर्दैवाची गोष्ट आहे. एक परकीय संस्कृती आणि एक मुळातील देशी संस्कृती यांच्यातले संबंध म्हणजे 'वसाहतवाद' हा प्रश्न, ही परकीय संस्कृती उच्च थरावरची समजली जाते. ती जबरदस्तीने स्थानिक संस्कृतीवर लादण्यात आलेली असते. त्यामुळे निर्माण होणारे प्रश्न न सुटणारे आहेत, व ते अनेक स्वरूपे धारण करतात. दुसरे अनेक प्रश्न व उपप्रश्न या संदर्भात उपस्थित होतात. उदा. ज्या कोणाचा प्रथमच एका खालच्या पातळीवर असलेल्याशी जेव्हा संबंध येतो, तेव्हा एक विशिष्ट प्रश्न असतो. वरच्या पातळीवरच्या लोकाचा खालच्या पातळीवरच्या लोकांशी सांस्कृतिक संबंध येणे हे यापुढील परिस्थितीत शक्य कोटीतले नाही, कारण तशा फारच थोड्या जागा आता शिल्लक आहेत. परकीय संस्कृतीच्या प्रभावामुळे, मूळ देशी संस्कृतीचे

विघटन होण्यास केव्हांच सुरुवात झालेली असणे, हे त्या प्रश्नाचे आणखी एक स्वरूप. या अशा ठिकाणी देशी लोकसंख्येने परकीय संस्कृती ही अगोदरच इतक्या प्रमाणात आत्मसात केलेली असते की यानंतर त्या परकीय संस्कृतीला हुसकावून लावता येईल का हा प्रश्नच आहे. एका वसाहतवादाचा प्रश्न आणखी एक तिसरे स्वरूप धारण करतो. उदा. वेस्ट इंडिज बेटे. अनेक देशातले लोक, कधी स्वखुषीने, तर कधी जबरदस्ती झाल्याकारणाने, या बेटावर आले. ते तसे आले तेव्हाच मुळापासून उखडलेले होते. वेस्ट इंडिज मध्ये आल्यानंतर कोणताही नियम वा सूत्र न पाळता, या लोकांचे मिश्रण झाले. मी येथवर नमूद केलेला प्रश्न, मी न सुटणारा का म्हणतो, व कोणत्या अर्थाने म्हणतो, हे वाचकाच्या लक्षात आले असेल. हा प्रश्न न सुटणारा आहे याचे कारण तो प्रश्न सोडविण्यासाठी, त्याची धार बोथट करण्यासाठी काहीही केले तरी आपण काय करीत आहोत, याचाच आपल्याला पत्ता नसतो. आपणास या सर्वांची जाणीव असली पाहिजे. आपणास जे जे शक्य असेल ते सर्व आपण केले पाहिजे. निदान आपली समजूत व ज्ञान आपणास जे काही सुचविले ते आपण सर्व केले पाहिजे. परंतु आपल्या पकडीत येतील आणि आपल्या नियंत्रणाखाली येतील त्यापेक्षा कितीतरी अधिक शक्ती लोकांच्या संस्कृतीत बदल होतो तेव्हा अंतर्भूत असतात. एखाद्या संस्कृतीचा स्पष्ट, नि:संशय, आणि अत्युतम विकास होतो, तेव्हा तो एक चमत्कारच असतो.

लोकांच्या स्थलांतरातून 'वसाहत करणे' हा प्रश्न निर्माण होतो. इतिहासपूर्व काळात, आशिया आणि युरोप खंडातील लोकांनी, एका भागातून दुसऱ्या भागात, एका खंडातून दुसऱ्या खंडात स्थलांतर केले. पण या इतिहासपूर्व काळात सुरुवाती सुरुवातीला एकटी-दुकटी व्यक्ती स्थलांतर करीत नसे. सर्व टोळीच्या टोळी, किमानपक्षी त्या टोळीचे प्रतिनिधित्व सर्वस्वी करतील इतक्या व्यक्ती, ह्या एकदम एकाच वेळी स्थलांतर करीत असत. म्हणजेच ती सर्वच्या सर्व संस्कृती स्थलांतर करीत होती. आधुनिक काळातील स्थलांतराची गोष्ट अगदी सर्वस्वी वेगळी आहे. आजकाल फारच वरच्या पातळीवरची संस्कृती असलेल्या देशातून लोक स्थलांतर करतात. उदा. इटालीतून अमेरिकेकडे. सामाजिक संघटन हे अगोदरच जेथे गुंतागुंतीचे झालेले आहे, अशा देशातून या लोकांनी स्थलांतर केलेले असते. हे लोक ज्या देशातून आलेले असतात. त्या देशातल्या सर्वच्या सर्व संस्कृतीचे त्यानी कधीही प्रतिनिधित्व केलेले नसते. यदाकदाचित् प्रतिनिधित्व केलेले असलेच, तर ते अगदी भिन्न भिन्न प्रमाणात केलेले असते. एखादे सामाजिक, धार्मिक, आर्थिक, अथवा या सर्वांचेच एक चमत्कारिक मिश्रण आहे, असे उद्दिष्ट नजरेसमोर ठेवून हे लोक स्थलांतर करतात. म्हणूनच, एखाद्या धार्मिक ग्रंथभेदाच्या स्वरूपासारखे, काहीतरी स्वरूप या स्थलांतरास प्राप्त होते. या अशा देशांतरात, अथवा एका देशातून दुसऱ्या व दुसऱ्यातून तिसऱ्या देशात असे स्थलांतर करताना या लोकांना आपल्या मूळ संस्कृतीतील काही भागच

आपल्या बरोबर आणलेला असतो. ते जोवर आपल्या मूळ देशात होते तोवर ते संस्कृतीतील जो भाग आपल्याबरोबर घेऊन आलेले असतात, त्यात सहभागी होत असत. म्हणूनच देशांतर करताना त्यांनी तो भाग आपल्या बरोबर नेलेला असावा. नव्या भूमीवर आल्यानंतर त्यांची म्हणून जी संस्कृती तयार होते व विकसित होते. ती मूळ संस्कृतीशी कोणालाही बुचकळ्यात टाकील इतकी एकसारखी असते; आणि त्याजबरोबर भिन्नही असते. लोक एका देशातून दुसऱ्या देशात जातात. या दुसऱ्या देशातील मूळ– असे जे स्थानिक लोक असतात, त्यांच्याशी या देशांतरित लोकांचे संबंध कसे प्रस्थापित होतात ह्यावरच या देशांतरित लोकांच्या संस्कृतीचा विकास अवलंबून असतो. या नव्या संबंधामुळे देशांतरित लोकांच्या संस्कृतीत गुंतागुंत पैदा होते. हे देशांतर करून आलेले लोक एका नव्या ठिकाणी स्थाईक झाल्यानंतर, या देशात आणखी दुसरे लोक दुसऱ्या एखाद्या देशातून देशांतर करून येतात. त्यामुळे हा सांस्कृतिक विकासाचा प्रश्न आणखीनच गुंतागुंतीचा होतो. आणि मग तो कालांतराने जटिल बनतो. या अशा प्रकारे, मुळात वसाहत करून राहिलेल्या लोकांची एकंदर संख्या आणि युरोपमधल्या देशातून स्थलांतर करून आलेले लोक या दोन गटात सांस्कृतिक– सहानुभूती आणि सांस्कृतिक संघर्ष असे दोन विशिष्ट आकृतिबंध तयार होतात.

सरते शेवटी इंडिया म्हणजेच भारत हे नंबर एकचे विशिष्ट उदाहरण म्हणावे लागेल. संस्कृतीचे नियोजन जो कोणी करू इच्छितो, त्याचा जेणेकरून पराभव होईल अशा प्रकारची प्रत्येक गुंतागुंत या उपखंडात आढळेल. या समाजात सामाजिक– स्थरीकरण आहे. पण ते केवळ निर्मळ असे सामाजिक स्थरीकरण नाही. हे स्थरीकरण हिंदू– जगतातले आहे. या हिंदु जगतात, प्राचीन परंपरानी विद्यमान असलेली उच्च संस्कृती आणि फारच प्राथमिक संस्कृती असणारे टोळीवाले, हे एके ठिकाणी राहात आहेत. भारतात ब्राह्मणवाद आहे आणि मुसलमानही आहेत. एवंच भारतात सर्वस्वी वेगवेगळ्या धार्मिक पायावर उभ्या असलेल्या दोन किंवा अधिक महत्त्वाच्या संस्कृती आहेत. या अशा गोंधळात टाकणाऱ्या परिस्थितीत ब्रिटिशांनी प्रवेश केला. आपली संस्कृती ही जगातील संस्कृतीतील अत्युत्तम संस्कृती आहे, असा आत्मविश्वास ठेवून प्रवेश केला. त्याच्या जोडीला संस्कृती आणि धर्म यांचे संबंध काय असतात, यावद्दल कशालाही रंगरूप नाही अशी भोळसट गृहिते त्यानी मनात बाळगलेली होती. निदान एकोणिसाव्या शतकापासून ब्रिटिशांच्या बाबतीत हे विधान नक्कीच योग्य ठरेल. आपणाला दुसरी व्यक्ती समजत नाही, ती समजावून घेता येत नाही, आणि तिच्याकडे दुर्लक्ष करता येत नाही असे जेव्हा होते तेव्हा त्या व्यक्तीचे, आपणास समजेल अशा व्यक्तित्वात रूपांतर व्हावे, यासाठी आपण अजाणता दबाव टाकतो. हे सर्वसामान्य रीतीला धरूनच आहे. अनेक नवरे आणि त्यांच्या धर्मपत्नी हे एकमेकांवर, असाच दबाव टाकीत असतात. या अशा प्रकारे ज्या व्यक्तीवर दबाव टाकला जातो. प्रभाव टाकण्याचा प्रयत्न होतो, त्या व्यक्तिवर एक परिणाम होण्याचा संभव असतो. त्या व्यक्तीत सुधारणा होण्याऐवजी, त्या





अनुक्रमणिका

व्यक्तीवर दडपण येते, आणि तिचे व्यक्तित्व तिरपागडे होते. म्हणूनच आपल्या व्यक्तित्वाची प्रतिकृती दुसऱ्या कोणात तयार व्हावी, यासाठी दबाव टाकण्याचा अधिकार कोणासही नाही. याचे कारण एकाही व्यक्तीला तसा अधिकार प्राप्त होण्याइतकी ती योग्य व चांगली असत नाही. ब्रिटिश राजवटींमुळे भारताचा जो काही फायदा झाला असेल, तो येत्या काही वर्षात साफ नाहीसा होईल. मागे शिल्लक राहतील. ते एका देशी संस्कृतीत, परक्या संस्कृतीने जो बिघाड उत्पन्न केला त्याचे दुष्परिणाम. एखाद्या परक्या संस्कृतीला, आपल्या संस्कृतीची देणगी देणे आणि मग आपला धर्म तिला देऊ करणे, हे असे करणे ही मूल्यांची अदलाबदल आहे. प्रत्येक युरोपियन व्यक्ती ही ज्या संस्कृतीची घटक आहे, त्या संस्कृतीची ती प्रतिनिधी आहे असे मानले जाते. मग, ती व्यक्ती हे प्रतिनिधित्व चांगल्या अथवा वाईट प्रकारे करीत असेलही. मला एकच मुद्दा या ठिकाणी अगदी ठोसपणे नमूद करावयाचा आहे. तो मुद्दा हा की युरोपियन लोकांपैकी फारच थोड्या व्यक्ती आपल्या धार्मिक श्रद्धांचे प्रतिनिधित्व करण्याच्या लायकीच्या आहेत. इंडियात (भारतात) स्थैर्य प्रस्थापित व्हावे असे कोणास वाटत असेल, तर त्यासंबंधात एकच पर्याय आहे असे दिसते. एकतर त्या देशात (इंडियात) विकास होणे आवश्यक आहे. आपण युरोपीय अशी आशा करूया की हा विकास शांततापूर्ण परिस्थितीत होईल. एकतर इंडिया याने भारताचे रूपांतर अनेक सरंजामी जहागिरींनी (Kingdoms) तयार झालेल्या एका विस्कळित अशा संघराज्यात होईल अथवा एकधर्मी समाजात ती उत्क्रांत होईल. हे प्रत्यक्षात येण्यासाठी सर्व सामाजिक वर्गभेद नाहीसे करावे लागतील. तसेच या समाजाला सर्व धर्म त्याज्य ठरवावे लागतील. असे होणे म्हणजे इंडिया (याने भारत) ची संस्कृती नाहीसे होण्यासारखेच ते आहे.

एखादे राष्ट्र आणि वेगवेगळ्या प्रकारचे त्या राष्ट्रातले परदेशी लोकांची वस्ती असलेले विभाग यांच्यात जे वेगवेगळ्या प्रकारचे सांस्कृतिक संबंध असतात. त्यांचा शोध असलेले विभाग यांच्यात जे वेगवेगळ्या प्रकारचे सांस्कृतिक संबंध असतात. त्यांचा शोध घेण्याचा जराशी वाकडी वाट करूनही प्रयत्न केला, त्याचे कारण एकच आहे. ते म्हणजे एखाद्या राष्ट्रातील जी प्रादेशिकता असते. त्यामुळे जो प्रश्ननिर्माण होतो, त्याकडे या विस्तीर्ण जगाच्या संदर्भात पहाणे आवश्यक आहे, असे मला वाटते. अर्थातच या ठिकाणी उपस्थित न केलेल्या प्रश्नासाठी साधे सोपे सरळ असे उत्तर नाही. मी यापूर्वी एक मुद्दा नमूद केला आहे. तो म्हणजे, या जगातील, आपल्या ज्या व्यावहारिक हालचाली असतात त्यांचे प्रत्यक्ष उद्दिष्ट हे कधीही संस्कृतीची सुधारणा आणि ती संस्कृती परंपरागत करणे, असे नसते. आपणास जे काही करता येईल त्याला अनुषंगून एकच गोष्ट आहे, हे आपल्या मनात जागृत ठेवण्याचा प्रयत्न केला पाहिजे. ती गोष्ट म्हणजे, आपण जी काही कृती करू त्याचा आपल्या स्वत:च्या संस्कृतीवर आणि अन्य लोकांच्या संस्कृतीवर परिणाम होणार आहे. दुसरी एखादी संस्कृती, आपल्या स्वत:च्या संस्कृतीपेक्षा खालच्या पातळीवर असेलही, तसेच एखाद्या संस्कृतीतली



अनुक्रमणिका

काही वैशिष्ट्ये, आपल्याला नापसंतही असतील. ते काहीही असो एक संस्कृती म्हणून दुसऱ्या प्रत्येक संस्कृतीचा आदर करावयास आपणास शिकता येईल. एक संस्कृती म्हणून दुसऱ्या संस्कृतीचा बुद्धीपुरस्सर नाश करणे, हे ज्याची दुरुस्ती होणार नाही असे दुष्कृत्य आहे. माणसांना जनावराप्रमाणे वागविण्याइतकी ती वाईट व दुष्ट प्रवृत्ती प्रकट करणारी वागणूक आहे. आपणास जो प्रदेश उत्तम प्रकारे माहीत आहे, त्या विशिष्ट मर्यादित भूभागात, ऐक्य आणि विविधतेचा जो प्रश्न आहे, त्याकडे आपणास लक्ष पुरविता येईल तसेच या भूभागात योग्य कारवाई करण्यासाठी जास्तीत जास्त संधी आपणास प्राप्त होईल. एवढेच नाही तर आपणास ही संधी वारंवार मिळते. आपले सामर्थ्य व समजूत, या दोन्ही पलीकडे असलेली जी गुंतागुंत आहे. त्यावर आपण नको इतका काळ रेंगाळत राहिलो, तर मग नैराश्य आपला कब्जा घेते. या नैराश्याचा मुकाबला या आपल्याला परिचित असलेल्या भागात आपण जी कारवाई करतो. त्याचा उपयोग करून करता येईल.

या पृथ्वीवर असा फार मोठा भूभाग आहे, की त्या भूभागावर आपल्याला हा जो प्रादेशिकतेचा प्रश्न ज्याप्रकारे परिचित आहे, त्यापेक्षा कितीतरी अधिक वेगळे स्वरूप तो प्रश्न धारण करतो. या वस्तुस्थितीचे आपण स्वत:स नेहमी स्मरण करून देणे आवश्यक आहे. विशेषत: पृथ्वीवरील ज्या भूभागाला, एकापेक्षा अधिक संस्कृती, कधीही अलग करता येणार नाहीत अशा प्रकारे वास्तव्य करून असतात हे आपण सदैव लक्षात ठेवले पाहिजे. सर्व सामान्य हरघडीचे जीवन आणि एखाद्या राष्ट्रातील दोन प्रदेशातले अंतर लक्षात घेऊन, त्या प्रदेशातल्या अतूट अशा गुंतागुंतीच्या संदर्भात ब्रिटनमधल्या प्रादेशिकवाद हा एक चेष्टेचा विषय होईल. बाहेरच्या जगातील प्रादेशिकवाद, हा ब्रिटनमध्ये आपण प्रादेशिकवादासंबंधी जी कल्पना करतो. त्यापेक्षा फारच गुंतागुंतीचा आहे. ब्रिटनमध्ये आणि पाश्चिमात्य जगतात, राजकीय कृती करण्यास प्रोत्साहन मिळावे यासाठी एक विशिष्ट राजकीय तत्त्वज्ञान उपयुक्त ठरते. जगातल्या इतर विभागात, या राजकीय तत्त्वज्ञानापेक्षा भिन्न असलेले तत्त्वज्ञान, राजकीय कृती करण्यासाठी प्रोत्साहक ठरण्याची दाट शक्यता आहे. ही अशी प्रकारची सर्व वैशिष्ट्ये व भिन्नता आपल्या मनात आपण ठेवली पाहिजेत. तसे केले म्हणजे मग, ब्रिटनमध्ये, आपल्याला ज्या परिस्थितीला सामोरे जावयाचे आहे, त्या परिस्थितीबद्दल अधिक चांगली जाण येईल. ब्रिटनमध्ये सर्वसामान्यपणे, एकजिनसी संस्कृती आहे. ती एकाच धर्माच्या परंपराशी संलग्न आहे. ब्रिटनमध्ये ही अशी अनुकूल परिस्थिती असल्याकारणाने राष्ट्रीय संस्कृती ही संकल्पना टिकवून धरता आली; व यापुढेही येईल. ही राष्ट्रीय संस्कृती ब्रिटनमधल्या अनेक विभागातील अनेक विभागीय संस्कृतीतून, आपल्याला आवश्यक असलेल्या जीवनद्रव्यांचा पुरवठा प्राप्त करून घेईल. या विविध विभागातही, अनेक आणखीही छोटे छोटे विभाग असतील. यातील प्रत्येक छोट्या विभागाची स्वत:ची अशी स्थानिक संस्कृती असेल व तीही राष्ट्रीय संस्कृतीस सहाय्यभूत ठरेल.

---





अनुक्रमणिका

# भोजनातील मसाल्याचे पदार्थ

सौ. सुमती जोशी

तऱ्हेतऱ्हेचे मसाल्याचे पदार्थ हा भारतीय पाककृतींचा आत्मा ! पावभाजी मसाला, बिर्याणी मसाला, पाणीपुरी मसाला, काळा मसाला, गोडा मसाला, चाट मसाला, सांबार मसाला, रस्सम मसाला अशी मारुतीच्या शेपटासारखी तऱ्हेतऱ्हेच्या मसाल्यांची न संपणारी यादी !गणितात दिलेल्या अंकांची अदलाबदल आणि एकीकरण (परम्युटेशन्स आणि कॉंबिनेशन्स) करून अनेक संख्या तयार करता येतात. त्याप्रमाणे जिरे, मोहरी, हळद, तिखट, मिरी दालचिनी, लवंग, वेलची, शहाजिरे, दगडफूल, जायफळ, जायपत्री, आलं, सुंठ, धने, हिंग, तमालपत्र या मूळ मसाल्याच्या पदार्थांचे वेगवेगळ्या प्रमाणात आणि विविध प्रकारे एकत्रीकरण करून शेकडो प्रकारचे मसाले तयार करता येतात. मूळ पदार्थ जरी ठराविक असले तरी या एकत्रीकरणानंतर तयार झालेल्या मसाल्याचा स्वाद वैशिष्ट्यपूर्ण आणि आगळावेगळा ! सप्तसुरांच्या एकत्रीकरणानंतर त्यातील प्रत्येक सूर वेगळा ओळखणे हे सर्वसामान्यांना अशक्य, त्याप्रमाणे या मसाल्याच्या पदार्थांच्या एकत्रीकरणाने तयार केलेल्या मसाल्यातील मूळ पदार्थ स्वतंत्रपणे ओळखणे फारच कठीण !

प्राचीन काळी खाद्यपदार्थ टिकविण्यासाठी प्रामुख्याने मसाल्याचे पदार्थ वापरीत असल्यामुळे "पदार्थ टिकविण्याकरता वापरावयाचे तीक्ष्ण वासाचे औषध" अशी मसाल्याच्या पदार्थाची व्याख्या करीत असत. ऑक्सफर्ड इंग्रजी शब्दकोशातील 'स्पाइस' या शब्दाची व्याख्या अधिक सुस्पष्ट आणि आपल्याला अभिप्रेत असलेला अर्थ ध्वनित करणारी आहे. "खाद्यपदार्थाला रुची आणण्याकरता किंवा पदार्थ टिकवण्याच्या त्याच्या गुणधर्मामुळे अन्य कारणाकरता वापरावयाचा तीक्ष्ण सुवास असलेला वनस्पतीजन्य पदार्थ." हा पदार्थ क्षुधावर्धक आणि क्षुधोत्तेजकही असतो. त्याच्या नुसत्या सुवासाने किंवा कल्पनेने तोंडाला पाणी सुटते. तो पदार्थ खाण्याची तीव्र इच्छा निर्माण होते असा या मसाल्याच्या पदार्थाचा असाधारण महिमा, आणि तितकाच मनोरंजक आहे त्यांचा समाजसांस्कृतिक इतिहास !

इ. स. १२७१ मध्ये मार्को पोलो हा इटालियन धाडसी खलाशी आपले वडील आणि काका यांना घेऊन आशिया खंडाच्या सफरीवर निघाला. प्रामुख्याने मसाल्याचे पदार्थ आणि अन्य वस्तूंचा व्यापार हा हेतू त्या सफरीमागे होता. पण त्यापूर्वीपासून युरोपीय लोक मसाल्याचे पदार्थ वापरीत असत. लॅटिन ही प्राचीन रोमन साम्राज्यातील साहित्यिकांची, विद्वानांची आणि शासनव्यवहाराची भाषा. या भाषेत 'अॅरोमा' किंवा 'अॅरोमॅटा' हा शब्द मसाल्याच्या पदार्थाचा निर्देश करण्यासाठी वापरीत. 'सेव्हिल' ही दक्षिण स्पेनच्या

अँङ्युलेशिया भागाची राजधानी इसवी सनाच्या सहाव्या शतकात व्यापाराचे आणि सांस्कृतिक केंद्र म्हणून प्रसिद्ध होती. इसिओडोर (Isidore) (इ. स. ५६० ते ६३६) हा सुप्रसिद्ध स्पॅनिश आर्चबिशप. मध्ययुगातील बहुतेक युरोपीय लेखकांनी इसिओडोररचित 'ज्ञानकोश' संदर्भग्रंथ म्हणून वापरलेला आढळतो. शब्दव्युत्पत्तिशास्त्रातही इसिओडोर पारंगत होता. इसिओडोरने आपल्या खाद्यपदार्थविषयक ग्रंथात म्हटले आहे,''ॲरोमॅटिकस म्हणजे भारत, अरेबियन व अन्य देशांनी आमच्याकडे पाठविलेली सुगंधी द्रव्ये. परमेश्वरचरणी अर्पण करावयाची सुगंधी द्रव्ये म्हणून त्यांचा वापर करतात. त्यांचा सुवास भोवतालच्या वातावरणात दरवळतो. त्यांचा सुगंध हवेच्या झोताबरोबर विस्तीर्ण प्रदेशांत पसरतो.'' इसिओडोरने आपल्या ज्ञानकोशाच्या आठव्या प्रकरणांत मिरी, दालचिनी,वेलची, गंधरस या मसाल्याच्या पदार्थांची नावे नोंदवली आहेत आणि नवव्या प्रकरणात हे केशर, गुलाब, व्हायोलेट, लिलि, वेलची अशी विविध सुगंधी द्रव्ये देणाऱ्या झुडुपांची वनस्पातीशास्त्रीय माहिती दिली आहे. इसवीसनाच्या सहाव्या शतकाच्या अखेरीस मानवाने केलेला वनस्पतीशास्त्राचा सखोल अभ्यास कौतुकास्पद आणि आश्चर्यकारक आहे.

सुप्रसिद्ध रोमन बादशहा हेड्रीयन Hadrian (इ. स. ७६ ते १३८) याने आपल्या नोंदीत मसाल्याच्या पदार्थांकरता 'ॲरोमॅटिक्स' हाच शब्द वापरला होता. ॲपिशिअस (Apicius) हा इसवीसनाच्या पहिल्या शतकातील रोमन निसर्गतज्ज्ञ. त्याने मसाल्याच्या पदार्थांच्या मिश्रणाकरता काँडिमेंटा मॉंतारिया 'Condimenta Mentaria ' हा शब्द वापरला आणि त्यांत कोणत्या मसाल्याच्या पदार्थांचा अंतर्भाव होतो त्याची लांबलचक यादीच दिली होती. कोथिंबीर, पुदिना, पेपरमिंट यासारख्या 'मसाला' म्हणून वापरल्या जाणाऱ्या हिरव्या पदार्थांसाठी ॲपिशिअसने ''काँडीमेंटा व्हिरिडिया'' "Condimenta Viridia " हा शब्द योजला होता. स्वत: ॲपिशिअस इसवी सनाच्या पहिल्या शतकात होऊन गेला. परंतु त्यानंतरच्या काळातील चवदार खाद्यपदार्थांच्या भोक्त्यांनी 'अपेशिअस' हे नाव धारण केले. ॲपिशिअसने खाद्यपदार्थांच्या पाककृतींचे एक भले मोठे पुस्तक लिहिले होते. पुढील पाच शतकात अनेकांनी ॲपिशिअसच्या या पुस्तकाच्या हस्तलिखित प्रती तयार केल्या असतील. त्यांतील पाचव्या शतकातील हस्तलिखित प्रत आजही अस्तित्वात आहे. इ. सनाच्या आठव्या शतकांत इटलीतील व्हिनिडेरिअस (Vinidarious) या उल्लेखनीय व्यक्तीने Excerpta (extracts) 'अेक्सर्प्टा ' नावाचे ॲपिशिअसच्या भल्या मोठ्या पुस्तकाचे सार' असणारे पुस्तक लिहिले. चविष्ट खाद्यपदार्थ तयार करण्याकरता घरात कोणते मसाल्याचे पदार्थ असलेच पाहिजेत त्याची यादी व्हिनिडेरिअसने दिली होती.

हा संदर्भग्रंथ आकर्षक असून मसाल्याच्या पदार्थावर अनेक दृष्टींनी प्रकाश टाकणारा होता. ॲरोमॅटिकस आणि काँडीमेंट्स् या दोन शब्दांनंतर पिमेंटम 'Pimemtum' हा तिसरा शब्द 'मसाल्याचे पदार्थ' सूचित करण्यासाठी या ग्रंथात प्रथम वापरला होता. यापूर्वी पिमेंटम

हा शब्द खाद्यपदार्थातील रंगद्रव्यासाठी वापरीत म्हणजे 'पिमेंटम' मध्ये फक्त केशराचा समावेश होत असे. व्हिनिडेरिअसच्या ग्रंथात हा संकुचित अर्थ जाऊन त्या शब्दाला व्यापक अर्थ प्राप्त झाला. मिरी, आलं, लवंग, दालचिनी, पोळ, जटामांसी (Spikenard) या मसाल्याच्या पदार्थांबरोबर धने, जिरे, पार्सली, तीळ, ब्राह्मी (Rue) सेलरी, पुदिना, महाळुंगाची पाने (Citron leaves), कांदा, लसूण या साऱ्यांचा समावेश युरोपीय लोक 'पिमेंटम'मध्ये करू लागले. इ. स. ५०० ते ७५० या काळात गॉल, जर्मनी या प्रदेशांतील लोक कोणते मसाल्याचे पदार्थ वापरीत असत ते आपल्याला या यादीवरून लक्षात येते. Sylphium 'सिल्फिअम'' हा भूमध्यसामुद्रिक प्रदेशातील मसाल्याचा पदार्थ रोमनांना प्रिय होता. Umbelliferae अंबेलिफेरी या वनस्पती कुटुंबातील या वनस्पतीचे वैशिष्ट्य म्हणजे तिला येणारा पुष्पगुच्छ. पुष्पगुच्छातील प्रत्येक फुलाला लांबट देठ असून हे सर्व देठ खोडाच्या एका बिंदूपासून निघतात आणि वर्तुळाकार पुष्पगुच्छ तयार होतो. पार्सली, फेनेल, धने हे पदार्थ याच वनस्पती कुटुंबाचे घटक आहेत. ही 'सिल्फिअम' वनस्पती आता भूमध्यसामुद्रिक प्रदेशात किंवा जगाच्या पाठीवर अन्यत्र कोठेही आढळत नाही. आठव्या शतकानंतर काळाच्या ओघात ही वनस्पती नामशेष झाली आणि म्हणूनच विस्मृतीच्या पडद्याआड गेली !

पिमेंटम या शब्दाचा नवा अर्थ कोणतेही मसाल्याचे पदार्थ असा असला तरी कोलंबसने त्याचा उपयोग 'मिरची' या अर्थाने कसा केला ते मिरचीच्या इतिहासात आपण पाहाणार आहोत. 'पिअर पॉइव्ह' या धाडसी फ्रेंच तरुणाची कथा लवंगेच्या .इतिहासात वाचल्यावर 'सर्व मसाले' या अर्थाने 'पॉइव्ह' हा शब्द फ्रान्समध्ये का रूढ झाला असावा हे वाचकांच्या लक्षात येईल. प्राचीन फ्रेंच भाषेत मसाला आणि मध घातलेल्या वाइनला पीमेंत 'Piement' असे म्हणत. अशी वाईन शक्तिवर्धक औषध म्हणून वापरीत. प्रेतावर ठराविक उपचार करतानासुद्धा अशा वाइनचा उपयोग करीत.

लॅटिन भाषेतील 'स्पीशीज' (species) हा शब्द विविध कालखंडात वेगवेगळ्या अर्थाने वापरला जाई. सुरुवातीला शासनातर्फे विकल्या जाणाऱ्या खाद्यपदार्थांना स्पीशीज म्हणत. पाचव्या शतकापूर्वी तूर्स (Tours) येथील ग्रेगरीने फळे, धान्य, तेल आणि वाइन या चार गोष्टींकरता 'स्पीशीज' हा शब्द योजला. त्यानंतर अन्नपदार्थातील चैनी आणि विलासी पदार्थांना स्पीशीज हा शब्द लागू करण्यात आला. पाचव्या शतकातील तत्त्वज्ञ आणि राजकारणी 'मॅक्रोबिअस' याने आपल्या लेखनात 'मसाल्याचे पदार्थ' या अर्थाने स्पीशीज हा शब्द वापरला. आणि त्या अर्थाने तो शब्द लॅटिन भाषेत रूढ केला. त्यानंतरच्या काळात सहाव्या शतकात ''स्पाइस'' हा शब्द मौल्यवान आणि खाद्यपदार्थांत वापरावयाच्या उंची मसाल्याच्या पदार्थांसाठी युरोपियन वापरू लागले. जिरे (cumin) बडिशेप (dill) आणि केशर हे तीन पदार्थ युरोपमध्ये भरपूर प्रमाणात होत. पण 'अतिपरिचयात अवज्ञा' अशी या

पदार्थांची अवस्था झाली होती. पौर्वात्य देशातून आयात करण्यात येणाऱ्या महाग मसाल्याच्या पदार्थांच्या तुलनेत हे पदार्थ कमी दर्जाचे मानले जात. व्यापाऱ्यांच्या दृष्टीने ते पदार्थ नगण्यच होते. "प्रमुख मसाले" या शीर्षकांत त्याची गणना नसल्यामुळे इतर मसाल्याच्या पदार्थाप्रमाणे त्यांच्याभोवती 'तेजोवलय' नव्हते.

पाकशास्त्र आणि शब्दव्युत्पत्तिशास्त्र या दोन्ही दृष्टीने चिनी लोकांनी युरोपियनांना मागे टाकले होते. फ्रेंच विदुषी फ्रँकॉय सब्बा हिने चौदाव्या शतकातील चिनी पाकशास्त्राचा अभ्यास केला. मसाल्याचे पदार्थ वापरण्यात चिनी लोक आघाडीवर होते. मध्ययुगीन काळापासून चिनी लोकांनी liaowu लिआवु हा शब्द मसाल्याच्या पदार्थासाठी योजला होता.

सहाव्या शतकापासून रूढ असलेला "स्पाइस" हा शब्द आपण आजही वापरतो. अन्य युरोपीय भाषांतसुद्धा 'स्पाइस' हाच शब्द थोड्याफार फरकाने वापरतात. फ्रेंचमध्ये epice एपिस, इटालियन भाषेत spezie स्पीझी, स्पॅनिशमध्ये especia अेस्पेशिआ, जर्मनमध्ये espezeri स्पेझेरी हे शब्द मसाल्याचे पदार्थ दर्शवितात.

चीनमधील एका दंतकथेनुसार पाच हजार वर्षांपूर्वी होऊन गेलेल्या चेन- नाँग Chen-Nang या बादशहाच्या राज्यांत मसाल्याच्या पदार्थांची झाडे किंवा झुडपे होती असे मानतात. परंतु पुरेसा पुरावा न मिळाल्यामुळे या दंतकथांमधील माहिती विश्वासार्ह वाटत नाही. मसाल्याच्या पदार्थांचा पहिला खात्रीलायक पुरवा इजिप्शियन पॅपिरायमधील लेखनात इ. स. पूर्व २८०० साली आढळतो. इ. स. पूर्व २२०० च्या सुमारास नैऋत्य आशियामध्ये (सध्याचा इराक) 'सुमेरियन' लोक राहात असत. इतिहासकारांनी मान्यता दिलेली ही पहिली प्रगत संस्कृती असून क्युनिफॉर्म लिखाणाचा शोध सुमेरियन लोकांनी लावला. क्युनिफॉर्म पद्धतीने लिहिलेल्या 'टॅब्लेट्समध्ये मसाल्याच्या पदार्थांचा उल्लेख आढळतो. प्राचीन इजिप्शियन पुदिना, मरवा, ज्युनिपर (काळ्या फळांचे व काटेरी पानांचे औषधी तेल देणारे झुडुप ) यासारख्या सुगंधी वनस्पती आणि लवंग, दालचिनी, वेलची, वाहवा (एका जातीची दालचिनी) यासारखे मसाल्याचे पदार्थ वापरीत असत. अर्थात् हे सर्व पदार्थ इतके किमती असत की असे पदार्थ वापरणे सर्वसामान्य जनतेच्या आवाक्याबाहेरचे समजले जाई. गोरगरिबांना व सामान्य जनतेला कांदा- लसणीवर समाधान मानावे लागे. इजिप्तचे राजे, राजपुत्र, धर्मगुरु अशा महत्त्वाच्या स्थानांवरील व्यक्तींसाठी हे विलासी, मौल्यवान पदार्थ राखून ठेवलेले असत. धार्मिक कार्यात, औषध म्हणून किंवा सौंदर्यवर्धक अशा तीन प्रकारे मसाल्याच्या पदार्थांचा उपयोग करीत. प्रत्यक्ष खाद्यपदार्थात हे पदार्थ किती प्रमाणात वापरीत असत याचे फारसे उल्लेख आढळत नाहीत. परमेश्वराला अर्पण करावयाचे अन्न या पदार्थांमुळे शुद्ध होते अशी इजिप्शियनांची श्रद्धा होती. फ्रान्सप्रमाणे इजिप्तमध्येसुद्धा प्रतिष्ठित व्यक्तींच्या निधनानंतर त्यांच्या प्रेताची जपणूक करताना तऱ्हेतऱ्हेची सुगंधी द्रव्ये आणि मसाल्याचे पदार्थ वापरीत असत.

परमेश्वराला अर्पण करावयाच्या अन्नपदार्थात विशिष्ट मसाल्याचे पदार्थ वापरलेच पाहिजेत अशी दैवी आज्ञा बायबलमध्ये केलेली आहे. (Exodus 30 xxiv 24 ) या आज्ञेप्रमाणे बोळ, दालचिनी आणि मधुर कॅलॅमस विशिष्ट प्रमाणात परमेश्वरचरणी अर्पण करावयाचे असतात. या ठिकाणी Calamus कॅलॅमस म्हणजे ऊस असा अर्थ अभिप्रेत असावा. हा पारंपारिक विधी पार पडल्यावर ओव्हनमध्ये भाजलेले सर्व मांस आणि तळणीतून काढलेले सर्व खाद्यपदार्थ ज्या धर्मगुरुने हा विधी पार पाडला त्यालाच द्यावे अशी ही आज्ञा बायबलमध्ये आढळते. म्हणजे हे सर्व मसाल्याचे खाद्यपदार्थ मानवाच्या पोषणाकरता वापरत असत. ग्रीक देवताना तसेच 'जेहोवा' या हिब्रू लोकांच्या देवतेला मसाल्याचे पदार्थ लावून भाजलेल्या मांसाचा भाजकट आणि धुरकट सुवास अतिशय प्रिय होता. सुगंधी आणि उंची पदार्थ परमेश्वरचरणी अर्पण करावयाची परंपरा सर्व धर्मात प्राचीन काळापासून चालत आलेली आपल्याला दिसते.

इ. स. ९७० ते ९३० या काळात प्राचीन इस्त्राएलमध्ये सॉलोमन नावाचा राजा होऊन गेला. त्याच्या शहाणपणाबद्दल तो प्रसिद्ध होता. त्याने आपल्या राज्यात भव्य राजवाडे, प्रेक्षणीय इमारती बांधल्या. जेरुसलेमचे सुप्रसिद्ध मंदिर सॉलोमनच्याच कारकीर्दीत बांधले गेले. याच काळात अरेबियामधील शीबा हा देश सोनं आणि मसाल्याच्या पदार्थांच्या व्यापाराबद्दल प्रसिद्ध होता. इ. स. पूर्व ९५०च्या सुमारास शिबाचीच राणी सॉलोमन बादशहाला भेटण्यासाठी इस्त्राएलमध्ये गेली. आपले अनेक सरदार, उंटांचा काफिला या लवाजम्याबरोबर राणीने खास नजराणा आणला होता. या नजराण्यात मौल्यवान् रत्नांबरोबर अनेक मसाल्याचे पदार्थ सुद्धा होते. तसेच अलगमची रोपेही तिने राजाला भेट दिली. ही रोपे राजाने आपल्या राजवाड्याभोवती लावली. अलगम म्हणजे बहुतेक 'चंदन' असावे. अर्थात् 'चंदन' हे फक्त सुवासिक द्रव्यच राहिले. खाद्यपदार्थात त्याचा समावेश झाला नाही.

इसवीसनापूर्वीच्या कित्येक शतकांपासून इजिप्शियनांनी तसेच सॉलोमन या इस्त्रायलच्या राजाने ओफिर (सध्याचे सोमालिया) आणि पॉंटस (सध्या एडन) या देशांशी व्यापारी संबंध प्रस्थापित केले होते. इजिप्त ही एक सामर्थ्यवान सागरी सत्ता होती. मसाल्याचे पदार्थ, सुगंधी द्रव्ये आणि इतर मौल्यवान् वस्तू भारतातून खास इजिप्तकरता पाठविल्या जात व दक्षिण अरेबियामधील बेरेनीस Berenice या बंदरात हा माल उतरवीत. बेरेनीसमधून या मौल्यवान वस्तूंनी भरलेले कॅरॅव्हॅन इजिप्तमधील टायर Tyre आणि सिडॉन Sidon या प्रमुख व्यापारी केंद्रांकडे जात असत. इजिप्तमध्ये इ. स. पूर्व १५०३ ते १४८२ पर्यत हॅटशेपसूट Hatshepsut या कर्तबगार राणीचे राज्य होते. आपल्या कारकीर्दीत राणीने इजिप्तची सांस्कृतिक परंपरा उज्ज्वल केली. तिने केलेल्या एका मोहिमेत तिने सर्व प्रकारचे मुबलक मसाल्याचे पदार्थ इजिप्तमध्ये आणले. त्याने वर्णन दिर- अेल- बहारी या मंदिरातील शिलालेखात आढळतात. इजिप्तमधील 'अलेक्झांड्रिया' बंदर हे मसाल्याच्या पदार्थांच्या

व्यापाराचे प्रमुख केंद्र झाले होते. फोनेशियामधील लोक (सध्याचे लेबेनॉन आणि सिरीया) इसवीसनापूर्वी २००० ते १००० या काळांत उत्तम व्यापारी म्हणून प्रसिद्ध होते. उत्तम रेशमी वस्त्रे कोरीवकाम केलेल्या चंदनी आणि हस्तीदंती वस्तू, दागदागिने, मसाल्याचे पदार्थ या साऱ्या वस्तू फोनेशियन स्पेन, ब्रिटन येथे आणीत आणि त्या वस्तूंच्या बदल्यात टिन आणि अँबर हे धातू मिळवीन. त्यांचा व्यापार आशिया आणि आफ्रिका खंडापर्यंत चालत असे. मसाल्याचे पदार्थ वजनाला हलके असतात. म्हणून मसाल्याचे पदार्थ आणणाऱ्या जहाजात फोनेशियन खलाशी मिठाची पोती ठेवीत. ही पोती अतिशय जड असल्यामुळे जहाजाचा तोल सांभाळण्यासाठी (Ballast) त्यांचा उपयोग होई. फोनेशियनांनी पश्चिम युरोपपर्यंत आणलेला हा माल उत्तर युरोपीय देशांना पुरवण्याचे काम जे व्यापारी करीत त्यांना 'व्हायकिंग' Viking असे म्हणत. मिठाच्या इतिहासात आपण यांची माहिती करून घेतलीच आहे. अशा तऱ्हेने तीन हजार वर्षापूर्वी दळणवळणाची अतिप्रगत साधने नसूनसुद्धा भारत आणि अतिपूर्वेकडील देशातील सर्व मसाल्याचे पदार्थ सर्व युरोपीय देशात पोचत असत.

## हळद

काही खाद्यपदार्थ असे असतात की एखाद्या देशाच्या संस्कृतीचा ते अविभाज्य घटक बनतात. जन्मापासूनच्या अनेक संस्कारांशी त्या पदार्थाचे संदर्भ जुळलेले असतात. पिढ्यान् पिढ्या चालत आलेला हा सांस्कृतिक वारसा आपण अगदी अजाणतेपणे पुढे नेत असतो. हळद या अशाच काही पदार्थांपैकी एक आहे. भारतीय संस्कृतीत हळद ही पावित्र्याचे, मांगल्याचे प्रतीक मानली जाते. नवजात अर्भकाला पहिले सहा महिने तरी तेल हळदीने मालिश करतात आणि दूध हळदीने न्हाऊ घालतात. तरुणपणी दूध, हळद, डाळीचे पीठ चेहऱ्याला लावून नवयौवना तारुण्यपीटिकांपासून आपले संरक्षण करण्याचा प्रयत्न करतात. 'शुभ' म्हणून कोंब फुटलेल्या 'लेकुरवाळ्या' हळकुंडाने नवविवाहितेची ओटी भरतात. अशा अनेक सांस्कृतिक संदर्भाची जंत्री तयार करता येईल. भारतीय संस्कृतीतील हळदीचे स्थान अनन्यसाधारण आहे हे मात्र निश्चित ! या सांस्कृतिक प्रतीकांचे पडसाद बोली भाषेतही उमटतात. वधूला विवाहाच्या आधी हळद लावण्याचा समारंभ असतो. एकनाथांनी आपल्या अभंगात "उटिली वधूवरे, हळदुली स्वानंदे" असे सुंदर वर्णन केले आहे. लग्नात वधूवरांस लावलेली हळद मंगलस्नान घालून समारंभपूर्वक काढतात. त्याला हळद उतरणे असे म्हणतात.

अशा या हळदीचा आल्याप्रमाणे 'झिंजिबरेशिअे' या वनस्पती कुटुंबात समावेश होतो. हळद, हरिद्रा, हल्दी, कुरकुमा, भारतीय केशर इत्यादी नावानी ओळखल्या जाणाऱ्या हळदीचे शास्त्रीय नाव आहे कुरकुमा लोंगा. "Curcuma Longa "आल्याप्रमाणेच हळद हे

सुद्धा जमिनीखाली आडवे वाढणारे रायझोम या आकारचे अन्नसंचयी खोड. या खोडाची बाहेरील पातळ साल आल्यासारखी फिकट चॉकलेटी किंवा गव्हाळ वर्णाची आणि आतला रंग पिवळा धमक. आल्याचं भावंडं शोभेल असा हळकुंडाचा आकार. कर्दळीच्या पानांसारखी दिसणारी लांबट, पसरट व टोकाशी निमुळती होणारी मोठी पाने हे या झुडुपाचे वैशिष्ट्य. या पानांनासुद्धा हळदीचा विशिष्ट वास येतो. या पानांवर केलेले पातोळे त्या स्वादामुळेच खाद्यरसिकांना आवडतात. श्रावण महिन्यांत अनेक घरी हे पातोळे आवर्जून करतात. या झाडाला पिवळ्या फुलांचा फुलोरा येतो. अर्थात् हा फुलोरा नुसता शोभेचा ! चांगला 'डोळा' (कोंबा) असलेला हळदीचा तुकडा लावून नवीन झाडाची निर्मिती करतात. त्यामुळे झाडाच्या पुनरुत्पादनाच्या दृष्टीने या फुलोऱ्याचा काहीच उपयोग नसल्यामुळे त्याला फारसे महत्त्व नसते. हळद तयार करताना जमिनीखालील मांसल खोड स्वच्छ धुतात. साल काढतात आणि उन्हात वाळवतात. ही हळकुंडे चांगली खडखडीत वाळली की त्यांची पावडर करतात. ही पावडर म्हणजेच पिवळी धमक हळद. ज्या बरणीत अगर भांड्यात हळद भरून ठेवतात, त्याच्याशी हळद 'प्रामाणिक' असते कारण, कित्येक दिवस त्या बरणीचा अगर भांड्याचा हळदीचा वास आणि रंग जाता जात नाही !

आल्याप्रमाणे हळदीचे मूळ स्थान भारत. भारताप्रमाणे मॉरिशस किंवा बोरबाँ येथेही हळदीचे उत्पादन होत असे. हळद हे जमिनीखालचे खोड तर केशर म्हणजे फुलांतील पुंकेसर. या दोन्हींत जमीन अस्मानाचा फरक. पण या दोहोंच्या केशरी रंगातील साम्यामुळे फ्रेंच लोक हळदीला 'बोरबाँ केशर' असे म्हणत असत. बौद्ध भिक्षू आपल्या कंबरेला बांधावयाच्या दोऱ्या रंगविण्यासाठी हळद वापरीत. Dioscoride डायोस्कोराइड्स् हा इसवी सनाच्या पहिल्या शतकातील ग्रीक डॉक्टर. त्याने वनस्पती आणि खनिजांचे औषधी गुणधर्म मटिरिआ मेडिका या ग्रंथात एकत्रित केले होते. डायोस्कोराइड्सला हळदीची शास्त्रीय माहिती होती. पावडर करण्यापूर्वी हळदीचे खोड त्याने पाहिले असावे कारण हळद आल्यासारखी दिसते अशी नोंद त्याच्या लेखनात आढळते. हळदीविषयी तो म्हणतो, "भारतात निर्माण झालेल्या व कडसर वासाच्या हळदीत अंगावरची लव काढण्याचा आश्चर्यकारक गुणधर्म असतो." तान्ह्या मुलाला तेलहळद लावण्याचा शास्त्रीय संदर्भ आपल्याला या विधानात आढळतो.

पश्चिम युरोपमध्ये हळद फारशी वापरत नसत. पण अरब आणि पर्शियन लोकांना मात्र हळद फार आवडत असे. हळदीच्या केशरासारख्या आकर्षक रंगामुळे हळद हे केशराचेच दुसरे रूप आहे असे अरब आणि पर्शियन लोकांना वाटत असे. ते हळदीला कोरकोम Kourkoum म्हणत असत. मध्ययुगीन काळात युरोपातील फक्त स्पॅनिश लोकांना हळद आवडत असे. त्यांनी हळदीचे नामकरण कुरकुमा Curcuma असे केले होते. लॅटिनमध्ये हळदीला टेरा मेरिटा Terra Merita म्हणत असत. त्याचा अर्थ आहे लायक भूमी किंवा

यथायोग्य भूमी. पण हे नाव लॅटिनमध्ये कसे आले ते मात्र समजत नाही. सोळाव्या शतकात इंग्रज हळदीला टर्मरेट Turmaret असे म्हणत असत. पुढे त्याचे रुपांतर टर्मरिक Turmeric असे झाले. आज विसाव्या शतकाच्या अखेरीस युरोपमधील इंग्रज माणसे हळदीची प्रमुख ग्राहक आहेत. "त्यांची भारतीय साम्राज्याची ओढ" हे कदाचित त्यांच्या हळदीच्या अधिक वापराचे गुपित असेल !

वैदिक वाङ्मयात 'निषाद' या जातिवाचक नावाचा उल्लेख आहे. त्याचा अर्थ हळद खाणारे (Nisha निशा = हळद Ad अद् = खाणे) यजुर्वेदात या निषादांच्याच स्वानिन् (कुत्रे राखणारे), चांडाळ (कुत्रे खाणारे) अशा पोटजातींचे संदर्भ आढळतात. आर्य प्रामुख्याने हळद, आले, मेथी आणि लसूण या चार मसाल्याच्या पदार्थांची लागवड करीत असत. मोहरी आणि मिरे हे दोन मसाल्याचे पदार्थसुद्धा आर्य खाद्यपदार्थांत वापरीत असत. परंतु एकंदरीत मसाल्याचे पदार्थ वापरण्याचे आर्यांचे प्रमाण अत्यल्प होते. दक्षिण भारतांतील खाद्यपदार्थात मात्र हळद, आले, मिरी आणि लवंगा या सर्व मसाल्याच्या पदार्थांचा उपयोग खूप प्रमाणात होत असे.

विवाह ही व्यक्तीच्या आयुष्यांतील महत्त्वाची घटना ! लग्नाच्या वेळच्या अक्षता म्हणजे हळदीने पिवळे केलेले तांदुळाचे दाणे. बहुतेक भारतीय जमातीत या पवित्र अक्षतांचा वधूवरांवर वर्षाव करून उपस्थित मान्यवर लग्नविधी साजरा करतात. अरब स्त्रिया ज्याप्रमाणे आपली पावले आणि तळहात अलता लावून रंगवतात. त्याप्रमाणे अनेक भारतीय जमातीतील आणि विशेषत्वाने तामीळ स्त्रिया आपले हातपाय हळदीने रंगवतात. उत्तर प्रदेशातील 'काव्यकुब्ज' जमातीत हळदटलेल्या अक्षतांची पुरचुंडी प्रवेशद्वाराशी बांधण्याची प्रथा होती. विवाहाच्या वेळी याच जमातीतील धार्मिक विधी पार पाडणारे भटजी वेगवेगळ्या धान्याच्या सहाय्याने आकाशस्थ ग्रहगोलांची पूजा करीत. मसूर डाळीने मंगळाची, पांढऱ्याशुभ्र तांदुळांनी चंद्राची तर हळदीने गुरू ग्रहाची पूजा करण्याची पद्धत त्या जमातीत होती.

इ. स. ११३० च्या सुमारास मध्य भारतातील कल्याण प्रांताचा राजा सोमेश्वर याने 'मानसोल्हास' हा ग्रंथ लिहिला होता. त्यांत अनेक खाद्यपदार्थांच्या कृती व वर्णनेही दिली आहेत. बहुतेक तिखट पदार्थात त्या काळी हळद व हिंग घालत असत असा उल्लेख त्यात आढळतो. 'रोहु' माशाचे कालवण बनवताना खवले काढून माशाला हिंग व मीठ लावून ठेवतात व नंतर असे माशाचे तुकडे हळदीच्या पाण्यात बुडवितात व मग तळतात अशाही सामिष पाककृती मानसोल्हासात आढळतात. प्राचीन काळी बंगालमधील पारंपारिक भोजनाची सुरुवात 'शुकतो' या कडुलिंबाच्या पानापासून केलेल्या कडसर पदार्थाने होत असे तर शेवट रसगुल्ले, चमचम यासारख्या मधुर पदार्थाने करीत. 'शुकतो' तयार करताना वांगी, बटाटे, गाजर, कच्ची केळी इत्यादी भाज्यांबरोबर आलं, मोहरी आणि हळद हे मसाल्याचे पदार्थ

वापरीत असत. 'वर्णनक समुच्चय' या इ. स. १५२०या सुमारास लिहिलेल्या ग्रंथात तत्कालीन गुजराथी खाद्यपदार्थांची सम्यक् यादीच दिली होती. भोजनाच्या वेळच्या बहुतेक सर्व तिखट पदार्थात आले, मिरची आणि हळद घालत असल्याचा उल्लेख त्यात होता. हळदीचा उग्र दर्प, मिऱ्यासारखा वास आणि भडक रंग या सर्व गुणधर्मांमुळे आग्नेय आशियातील बहुतेक तिखट पदार्थांत हळद घालण्याची प्रथा पूर्वापार चालत आली आहे. महाराष्ट्रीय भोजनातील जवळजवळ सर्वच भाज्या आमट्यांमध्ये मोहरी, हिंग, हळद हे त्रिकूट असतेच! मसालेभाताचा सुंदर रंग हळदीमुळेच येतो. इतकंच काय पण पुरणाला सुंदर रंग येण्यासाठी चण्यांची डाळ शिजवताना त्यांत कणभर हळद घालतात.

हळदीच्या विशिष्ट रंगामुळे प्राचीन काळी सर्व आशिया खंडात हळदीच्या झाडाला जादूमय झाड असे म्हणत असत. तसेच भाताच्या शेताच्या मध्यभागी हळदीचा गड्डा लावला तर भाताचे पीक उत्तम येते व बरकत होते अशी शेतकऱ्यांची श्रद्धा असे.

हळदीत अनेक औषधी गुणधर्म आहेत. हळद ही जंतुनाशक समजली जाते. कुठेही लहानशी जखम झाली किंवा खरचटले तर त्यावर चटकन हळद लावल्यास रक्तस्त्राव थांबतो आणि रोगजंतूंचे संक्रमण (इन्फेक्शन) त्यांत होत नाही. हा अगदी साधा, घरगुती प्रथमोपचार मानला जातो. गरम दुधात चिमटीभर हळद टाकून ते दूध घेतल्यास सर्दी, खोकला बरा होतो. अशा दुधामुळे घसा दुखत असल्यास बरे वाटते. कावीळ या रोगामध्ये रुग्णाच्या त्वचेला पिवळेपणा येतो व डोळेसुद्धा पिवळे दिसतात. पिवळ्या रंगाशी असणाऱ्या साध्यर्म्यामुळे प्राचीन काळी हळद ही काविळीवर गुणकारी समजली जाई.

बंगाल आणि दक्षिण चीनमधील हळद उत्तम समजली जाते. पेरु आणि वेस्ट इंडीज बेटांवर हळदीचे उत्तम पीक येते. हळदीत सुमारे २ ते ५.५ टक्के आवश्यक तेले असतात व ती ऊर्ध्वपातनाने काढतात. टर्मरोन Turmerone $C_{15}H_{22}O$ आणि अर टर्मरोन ar Turmerone $C_{15}H_{20}O_6$ हे त्यातील प्रमुख घटक असतात. तसेच यांतील कुरकुमिन Curcumin $C_{21}H_{20}O_6$ या घटकामुळे हळदीला नारिंगी पिवळा रंग प्राप्त होतो. हळदीचा रंग लागलेल्या कागदावर जर अल्कली पदार्थ पडला तर पिवळ्या रंगाचे लालसर चॉकलेटी रंगात रूपांतर होते व वाळल्यावर तो रंग जांभळट दिसतो. पदार्थाच्या अल्कली गुणधर्माची ही कसोटी मानली जाते. हळदीचे डाग पडलेले कपडे धुताना याची प्रचीती आपणास नेहमीच येते. उपहासगर्भ अर्थाने सुद्धा या हळदीचा म्हणी व वाक्प्रचारात उपयोग केलेला आपल्याला आढळतो. उतावळ्या स्वभाच्या व्यक्तीला उद्देशून 'पी हळद आणि हो गोरी' हा म्हण अनेकदा वापरतात. थोड्याशा यशाने हुरळून गेलेल्या व्यक्तीला 'अर्ध्या हळकुंडाने पिवळा होऊ नकोस' असा सल्ला वडीलधारी मंडळी देतात. एखादी क्षुल्लक बाब न जुळल्यामुळे मोठे जुळत आलेले कार्य मोडत असल्यास 'हळकुंडासाठी लग्न मोडू नकोस' असा इशारा अनुभवी व्यक्ती देतात.

# मिरची

दालचिनी, मिरी, आलं, हळद, लवंग, वेलची, जायफळ हे सारे मसाल्याचे पदार्थ अतिपूर्वेकडील देशांतील रहिवासी. मसाल्याच्या पदार्थाच्या कुटुंबातील हे सगेसोयरे एकमेकांना धरून राहणारे. पण त्यांची सखी 'मिरची' मात्र एकटीच दूरदेशी राहिला अमेरिकेसारख्या खंडप्राय देशातील उष्ण कटिबंधाच्या पट्ट्यातील प्रदेशात मिरची निर्माण झाली, तिथेच ती 'स्थायिक' झाली आणि कित्येक शतके तिने एकांतवास पत्करून 'अज्ञातवास' भोगला! पंधराव्या शतकापर्यंत मिरचीची ओळख जगाला झाली नव्हती. ती अमेरिकेतच बंदिवासात होती!

इतिहास पूर्वकाळात अमेरिकेतील रेड इंडियन्सना रानावनात मिरचीची रोपे सापडली. हा तिखट पदार्थ आपल्या उदरभरणाच्या सामुग्रीला प्रामुख्याने मांस व इतर कंदमुळांना चांगली चव आणेल असे त्यांना वाटले आणि त्यांनी मिरचीचा आहारात समावेश केला. दक्षिण अमेरिकेतील मेक्झिको आणि पेरू या प्रदेशात मिरचीच्या अस्तित्वाचे पुरातत्त्वशास्त्रीय पुरावे आढळतात. मिरचीचे उत्पादन अमेरिकेत प्राचीन काळापासून होत असले पाहिजे याचा हा पुरावाच होय! पण मिरची चौदाव्या शतकापर्यंत पडदासीन राहिली. पंधराव्या शतकाच्या अखेरीस कोलंबसने अमेरिकेचा शोध लावला आणि या खंडप्राय देशातून त्याने बटाटे, टोमॅटो आणि मिरच्या हे तीन पदार्थ युरोपमध्ये आणले. कोणत्याही नवीन गोष्टीला चटकन मान्यता देणे हे मानवी स्वभावात बसत नाही. सुरुवातीला युरोपियनांनी टोमॅटोवरची आपली नाराजी नकारानेच दर्शविली आणि काही काळ लोटल्यानंतर मात्र या लालचुटुक 'फळभाजीला' मानाचे स्थान दिले. बटाट्यालासुद्धा सुरुवातीला कसे वाळीत टाकले होते आणि नंतर त्याला कसे आपलेसे केले हे बटाट्याच्या इतिहासात आपण पाहिलेच आहे. पण लोकांनी मिरचीची मात्र या दोन पाहुण्यासारखी अवहेलना केली नाही. साऱ्या जगाने विशेषत: चीन,भारत, स्पेन, आफ्रिका इत्यादि देशवासीयांनी मिरचीचे स्वागत केले आणि आपल्या आहारात मिरचीला 'अढळस्थान' दिले.

ख्रिस्तोफर कोलंबसच्या जर्नलमध्ये मिरचीचा पहिला उल्लेख आढळतो. १५ जानेवारी १४९३ रोजी कोलंबसने हिस्पॅनिओला या वेस्ट इंडीजमधील बेटाचे वर्णन केले होते. "येथे आढळणारा मिरची हा पदार्थ आपल्याकडे मिळणाऱ्या मिऱ्यांपेक्षा चांगला आहे." अशी नोंद कोलंबसने केली होती. पंधराव्या शतकातले हिस्पॅनिओला म्हणजे सध्याचे हैती आणि डॉमिनिकन रिपब्लिक. आपल्याला सापडलेल्या या नवीन पदार्थाला नाव काय द्यावे यावर कोलंबसला फारसा विचार करावा लागला नाही. कोणतेतरी नवीन शब्द धुंडाळण्यापेक्षा आपल्या 'मातृभाषेतील' 'मसाला' या शब्दाच्या जवळचा शब्द त्याने निवडला. स्पॅनिश भाषेत Pimienta पिमिएंटा म्हणजे 'मसाला' या स्पॅनिश पिमिएंटापेक्षा अधिक चांगला

आणि झणझणीत म्हणून मिरचीचे नामकरण कोलंबसने Pimienta पिमिएंटो असे केले. कॅरिबीअन बेटावरील (वेस्टइंडीज) लोक या झणझणीत पदार्थाला 'ahi' असे म्हणत असत. अमेरिकन रेड इंडियनसुद्धा मिरचीला याच नावाने संबोधित असत. यावरून कदाचित वेस्ट इंडीजची बेटे हे सुद्धा मिरचीचे मूळ स्थान असेल असा अंदाज वर्तवता येतो.

इ. स. ९०० ते १२०० च्या सुमारास 'टॉलटेक' लोकांची मध्य मेक्झिकोमध्ये सत्ता होती. टॉलटेक संस्कृतीचा इसवीसन बाराशेच्या सुमारास अस्त होत असताना 'ॲझटेक' लोकांनी मध्य मेक्झिकोमध्ये आपले वर्चस्व स्थापण्यास सुरुवात केली. ॲझटेक ही प्रगत संस्कृती असून त्यांनी मेक्झिकोमध्ये अनेक शहरे वसवली. सुंदर मंदिरे, भव्य राजवाडे, पिरॅमिडस् बांधले. सोळाव्या शतकात स्पॅनिश लोकांचे आक्रमण होईपर्यंत मेक्झिकोमध्ये ॲझटेकांचे साम्राज्य राहिले. हे टॉलटेक्स आणि ॲझटेक्स मिरचीचा भरपूर प्रमाणात वापर करीत असत आणि मिरचीला 'चिली' या नावाने संबोधित असत. इंग्रजीतही चिली म्हणजे मिरची. या सर्व माहितीवरून मेक्झिको आणि वेस्ट इंडीजची बेटे मिरचीचे मूळ 'स्थान' असावीत. असा निष्कर्ष काढता येतो. अमेरिकेतील रेड इंडियन्सनासुद्धा मिरची माहीत होती. परंतु युरोपियनांनी जेव्हा उत्तर अमेरिकेत वसाहती स्थापण्यास सुरूवात केली तेव्हा तेथे मिरच्यांचा प्रचार व प्रसार झाला.

स्पॅनिश आणि पोर्तुगीजानी पंधराव्या शतकाच्या अखेरीस युरोपियनांना मिरचीची ओळख करून दिली. परंतु युरोपियनांच्या 'हळव्या' जिभेला मिरचीचा झणझणीत स्वाद झेपला नाही. आफ्रिका, अरेबिया, आशिया येथील लोकांनी मिरचीचे उत्साहाने स्वागत केले. "मिरची म्हणजे पदार्थाला चव आणणारा आश्चर्यकारक पदार्थ" अशी त्यांची खात्री झाली आणि अनेक खाद्यपदार्थात मिरचीचा अंतर्भाव होऊ लागला ज्याप्रमाणे जंगलात क्षणार्धात वणवा पसरतो त्याप्रमाणे अल्पकाळात मिरच्या साऱ्या जगाला माहीत झाल्या.

भारतात तर मिरची 'पाहुणी' म्हणून आली आणि घरचीच झाली! मसाल्याच्या पदार्थाचा व्यापार करणाऱ्या भारतीय व अतिपूर्वेकडील व्यापाऱ्यांनी मिरचीला आपल्या यादीत अग्रस्थान दिले. "कानामागून आली आणि तिखट झाली" ही म्हण तिखट मिरचीच्याबाबतीत खरी ठरली. बहुतेक तिखटमिठाच्या भारतीय खाद्यपदार्थात इतर मसाल्याचे पदार्थ नसले तरी मिरची असतेच! भारतात मिरचीचे उत्पादन आणि व्यापार इतक्या सहजतेने होऊ लागला की जणू काही मिरची याच भूमीत जन्मली आणि वाढली असावी असा बघणाऱ्याचा समज होई. सर्वसाधारण नागरिकांना

"मिरची ईस्ट इंडिजमधून आली की वेस्ट इंडीजमधून?" हेच कोडे वाटू लागले. निसर्गतज्ज्ञांचे सुद्धा याबाबतीत कसे गैरसमज होत याचे एक बोलके उदाहरण पहा बव्हेरियन निसर्गतज्ज्ञ लिओनार्ड फक्स Leonard Fuchs (इ. स. १५०१ ते १५५६) याने आपल्या निसर्गविषयक ग्रंथात मिरच्यांचा उल्लेख केला आहे. तो त्या ग्रंथात म्हणतो,

"छोट्या, मोठ्या टोकदार आणि रुंद अशा चारही जातीच्या मिरच्यांचे कलकत्ता हे मूळ स्थान आहे." मिरच्या भारतीय खाद्यपदार्थात किती 'समरस' झाल्या होत्या याची प्रचीती आपल्याला वरील विधानावरून येते.

· सुप्रसिद्ध दक्षिण भारतीय कवी पुरंदरदास (इ. स. १४८० ते १५६४) याला मिरचीचे गुणधर्म माहीत होते. त्याने मिरचीला उद्देशून केलेल्या काव्याचा सारांश वाचकांना मनोरंजक वाटेल. तो म्हणतो, "मी तुला हिरव्यागार रंगात पाहिले. पण तू जसजशी पिकू लागलीस तसतसा तुझा रंग लाल होऊ लागला. तुझ्या दर्शनाने मला मोहिनी घातली आणि तुझ्या चवीने मला जिंकले. तू गरिबांची रक्षणकर्ती आहेस आणि उत्तम खाद्यपदार्थांची चववृद्धी करणारी आहेस. पण तू चुकून जरी दाताखाली आलीस तरी पांडुरंग विठ्ठलाची आठवण येणेसुद्धा कठीण ! इ. स. १७५० मध्ये Rumphius रंफियस याने आपल्या लेखनात 'अचार' (लोणचे) या शब्दाची व्युत्पत्ती दिली आहे. वेस्ट इंडीज लोक 'मिरचीला 'अही' म्हणत. पर्शियन आणि अरेबिक लोकांनी त्याचे रूपांतर 'achi' अची असे केले. अचीचा वापर करून सिद्ध केलेला झणझणीत पदार्थ म्हणजे 'अचार'!

मिरचीच्या अनेक जाती असल्या तरी प्रामुख्याने त्याचे तीन प्रकारे वर्गीकरण करणे सोयीचे असते.

१. कॅप्सिकम ॲनम– 'ॲनम' या नावातच या मिरचीचे झाड वार्षिक असल्याचे सुचवले आहे. कॅप्सिकम ॲनम म्हणजेच सिमला मिरची किंवा भोपळी मिरची. आकाराने मोठी, काळपट हिरव्या रंगाची, तेजस्वी अंगकांतीची, आतून पोकळ, वजनाला हलकी मिरची जगाच्या पाठीवरील सर्व देशात प्रसिद्धीच्या शिखरावर आहे. तिखटपणा अजिबात नसल्यामुळे या मिरचीला "Sweet Peper" 'स्वीट पेपर' असे म्हणतात. उत्तम स्वाद असल्यामुळे कच्च्या कोशिंबिरीत, पिझ्झात या मिरचीचा उपयोग करतात. जून झाल्यावर मात्र ही मिरची पिवळी पडते व सडते. म्हणजे या मिरचीचे तिखट करता येत नाही. भोपळी मिरचीच्या वर्ल्ड बीटर, बेलपेपर, धारवाड स्थानिक, कॅलिफोर्निया वंडर इत्यादी जाती प्रसिद्ध आहेत.

२. कॅप्सिकम फ्रुटिसन्स Copsicum frutescens या जातीच्या मिरचीची लागवड भारतात सर्वत्र होते. आंध्र प्रदेश, आसाम, बिहार, राजस्थान, कर्नाटक, मध्यप्रदेश, महाराष्ट्र इत्यादी राज्यात या मिरचीचे विक्रमी पीक काढतात. याची झाडे ४५ ते ७५ सेंमी उंचीची असतात. पर्णसंभार विपुल असून प्रत्येक पान गुळगुळीत, एकाआड एक, अंडाकृती आणि टोकाकडे निमुळते होणारे असते. प्रत्येक पानाच्या बेचक्यात एकटे फूल येते. या फुलात परागीभवन व फलन प्रक्रिया झाल्यावर जे फळ येते ते म्हणजे मिरची! मिरची लांबट, टोकाकडे निमुळती, हिरव्या रंगाची आणि तिखट गराची असते. पिकल्यावर ती लाल होते. या मिरचीचे तिखट करतात. या मिरचीच्या अनेक उपजाती असून त्या तिखटपणाला कमी

जास्त असतात. काश्मिरी मिरची आणि कर्नाटकातील बेडगी मिरची या तिखटपणाला कमी असून त्याचा रंगलालचुटूक असतो. अर्थात् पदार्थात काश्मिरी मिरचीचे तिखट वापरणे. चवीच्या व रंगाच्या दृष्टीने हितकारक ठरते! मिरचीला लाल रंग कॅप्सॅन्थीन Capsanthin $C_{40}H_{58}O_3$ या घटकामुळे येतो. काश्मिरी मिरचीत हा घटक अधिक प्रमाणात असतो हे ओघानेच आले!

३. लवंगी मिरची : ७५ सें मी पासून २ मीटरपर्यंत उंच वाढणारी ही बहुवर्षीय (अनेक वर्षे जगणारी) वनस्पती झुडुपासारखी वाढते. या मिरच्या आकाराने लहान, अत्यंत तिखट व भरपूर बियांच्या असतात. या मिरच्या उष्ण कटिबंधातील प्रदेशात भरपूर प्रमाणात होतात. या मिरच्या सर्वात स्वस्त असल्यामुळे त्यांचे तिखटही गरिबांच्या खिशाला परवडण्यासारखे असते. बहुतेक मिरचीचा तिखटपणा तिच्या आकाराच्या व्यस्त प्रमाणात असतो. म्हणून तर सिमला मिरच्या बिनतिखट, मध्यम आकाराच्या बेताच्या तिखट असतात तर सर्वात लहान लवंगी मिरच्या म्हणजे प्रत्यक्ष आग! आफ्रिकेतील छोट्या पिली पिली मिरच्या आणि वेस्ट इंडीजमधील Zozio झोझिओ मिरच्या झणझणीतपणाच्या बाबतीत आपल्या लवंगी मिरचीलाही मागे टाकतात. मिरचीचा तिखटपणा त्यातील Capsaicine कॅप्सॅसीन $C_{18}H_{27}O_3N$ या घटकामुळे असतो. अर्थात हा घटक या जातीच्या मिरच्या सर्वाधिक असतो.

उष्ण कटिबंधात वाढणाऱ्या मिरचीच्या झुडुपाला युरोपमधील थंड हवा सोसवत नाही. मिरचीचे रोप जर थंड हवेच्या प्रदेशात वाढवायचे असेल तर काचगृहातील तापमान कृत्रिम रितीने वाढवून तेथे मिरचीची रोपे वाढवावी लागतात. स्पेनमध्ये सर्व प्रकारच्या मिरच्यांचे उत्पादन भरपूर प्रमाणात होते. सौम्य जातीच्या मिरच्यांना पॅप्रिका Paprika असे म्हणतात. त्या जातीच्या मिरच्यांचे स्पेनमधील उत्पादन पंधरांशे टनाहूनही अधिक असते. मिरचीमध्ये अे आणि सी व्हिटॅमिन भरपूर प्रमाणात असल्यामुळे रेड इंडियनच्या आहारात असलेली व्हिटॅमिन्सची उणीव मिरच्यांमुळे काही अंशी भरून निघत असे. इन्का, माया, आणि ॲझटेक या संस्कृतीतील लोक मिरचीच्या तिखटपणाचा लोकांना त्रास देण्यासाठी दुरुपयोग करीत असत. मिरचीमध्ये जंतुनाशक गुणधर्म आहेत असा प्राचीन काळी समज असल्यामुळे ज्या पदार्थाच्या उत्तम स्थितीबद्दल संशय असेल, त्या पदार्थावर तिखट पेरण्याची पद्धत असे. एखादी खोली जंतुनाशक करण्यासाठी तेथे मिरच्यांची धुरी तयार करीत. पोटातील विविध संक्रामणे (इन्फेक्शन) डायरिया, जंत, यासारख्या अनेक व्याधींवरील एकच उपाय म्हणजे मिरची वापरणे असा आफ्रिकेतील लोकांचा समज होता. अज्ञानाचा अंध:कार अनेक गैरसमज निर्माण करण्यास आणि पसरविण्यास पुरेसा असतो याचे हे उत्तम उदाहरण आहे. वैज्ञानिक संशोधनाने दशदिशा उजळल्यावर हे उपाय नसून अपाय होते हे मानवाच्या लक्षात आले तिखट खाणे हे मूळव्याध आणि पोटावरील विकारांवरील औषध नाही. उलट या विकारात तिखट खाणे म्हणजे जखमेवर मीठ चोळण्यासारखे आहे याची जाणीव आधुनिक वैद्यकीय

विज्ञानाने मानवाला करून दिली.

टोमॅटो, तंबाखू, वांगे, बटाटे आणि मिरच्या हे भिन्न प्रकृतीधर्माचे पदार्थ सोलॅनेशिअे या एकाच वनस्पती कुटुंबाचे घटक. तंबाखूचे पान, बटाट्याचे जमिनीखालील अन्नसंचयी खोड माणसाला उपयुक्त वाटले. तर टोमॅटो, वांगे आणि मिरची यांची फळे खाद्यपदार्थ चविष्ट करण्यासाठी मानवाने वापरली. अमेरिकेतील टोमॅटो, इटालियन खाद्यपदार्थाचा 'आत्मा' झाला. आणि इटालियनांच्या मनात प्रश्न उभा राहिला, " अरे इतकी वर्षे आपण टोमॅटोशिवाय खाद्यपदार्थ कसे तयार केले?" त्याप्रमाणे प्रत्येक भारतीयाच्या मनात विचार येईल, "अवघ्या चार शतकापूर्वी आपले पूर्वज मिरचीशिवाय खाद्यपदार्थ कसे तयार करीत?

परदेशातून आलेल्या आणि भारतीय खाद्यपदार्थात अत्यावश्यक ठरलेल्या मिरचीची ही चटकदार कहाणी !

## दालचिनी

मसाल्याच्या पदार्थातील 'दालचिनी' हा महत्त्वाचा मसाल्याचा पदार्थ ! प्राचीन काळापासून लोकांना दालचिनी माहीत होती. दालचिनीचा पहिला निश्चित उल्लेख बायबलमध्ये आढळतो. Kynnamomon 'किन्नामोमन' हे दालचिनीचे ग्रीक नाव. इजिप्तमधील पॅपिरायमध्येसुद्धा किन्नामोमनबद्दल सर्व माहिती लिहिलेली होती. म्हणजे दालचिनीला ज्येष्ठ जावयासारखा ज्येष्ठ मसाल्याच्या पदार्थाचा मान देण्यास काहीच हरकत नाही ! शब्दव्युत्पत्ति नि शास्त्रज्ञांना (इटायमॉलॉजिस्ट) किन्नामोमन हा ग्रीक शब्द Kaimanis 'कैमानिस' या (मॅले) मलेशियन शब्दाच्या जवळचा वाटतो कारण मलेशियन भाषेत कैमानिस म्हणजे दालचिनी Cassia कॅसिआ ही दालचिनीची आणखी एक जात. रानटी दालचिनी किंवा चिनी दालचिनी म्हणून ओळखली जाते. या झाडाचे खोड दालचिनीच्या खोडासारखे असून याचा वास अधिक उग्र आणि झोंबणारा असतो. भारतीयांनी या दालचिनीची रोपे चीनमधून मिळवली.

दालचिनीचे शास्त्रीय नाव Cinnamomum Zeylanicum सिनॅमोमम झीलॉनिकम किंवा Cinnamomum Verum सिनॅमोमम व्हेरम. लॉरेशिअे कुलातील हे झाड सुमारे आठ मीटर उंच असते. याचे मूळ स्थान श्रीलंका आणि दक्षिण भारत. भारताच्या पश्चिम किनाऱ्यावरची जंगले (उ. कारवार), मलेशिया, ब्रह्मदेश या देशातही दालचिनीचे वृक्ष आढळतात. आंबोली आणि खंडाळा घाटातही ही झाडे तुरळक प्रमाणात आढळतात. दालचिनीच्या झाडाच्या फांद्या काहीशा चपट्या असून त्यावर बारीक व खोलगट रेषा असतात. दालचिनीची पाने म्हणजेच स्वयंपाकात वापरत असलेले तमालपत्रे. ही पाने लांबट, अरुंद, भाल्यासारखी टोकदार, प्रथम लाल व नंतर हिरवी चकचकीत असतात. त्याच्या देठापासून ३ ते ५ प्रमुख शिरा निघून टोकाकडे जातात. आपण वापरत असलेली दालचिनी म्हणजे खोड व फांद्यांचे साल. कोवळ्या



अनुक्रमणिका

फांद्या व खोड यापासून काढलेली साल गुळगुळीत व फिक्या रंगाची असते. परंतु जून फांद्या व खोडावरची साल गर्द पिवळी व खडबडीत असते. ही दालचिनी जितकी फिक्या रंगाची तितकी ती उत्तम दर्जाची !

दालचिनीचे झाड सुमारे ४ ते ६ वर्षाचे झाल्यावर त्यापासून दालचिनी काढता येते. दालचिनी काढण्याची प्रक्रिया पावसाळ्यात करणे सोयीस्कर याचे कारण ही बाह्यसाल मूळ खोडापासून चटकन वेगळी करता येते. दालचिनी काढण्याच्या वेळी झाडाचे खोड जमिनीलगत कापतात 'Gonakokotha' गोनाकोकोथा नावाच्या अर्धगोलाकृती पात्याने दालचिनीच्या खोडाची साल काढतात. त्यानंतर Urachi 'उराची' नावाच्या पितळेच्या दांड्याने खोड वरखाली घासतात. त्यामुळे खोडाच्या उती (tissueo) मोकळ्या होतात Talana kokatha तलनकोकाथा हे नाव असलेल्या सुरीने उरलेल्या खोडाच्या सालाची गोल गोल भेंडोळी काढतात. ही सर्व भेंडोळी कमी अधिक व्यासाची असल्यामुळे टेलिस्कोपच्या रचनेप्रमाणे एकात एक बसतात व त्याचा सुमारे १ मीटर उंचीचा दंडगोल तयार होतो. ४ ते ५ दिवस वाळवल्यावर ती सर्व भेंडोळी एकत्र आणतात व पुन्हा एकदा उन्हात वाळवतात. त्यानंतर सल्फरच्या सहाय्याने त्या दालचिनीचे विरंजन करतात व मग दालचिनीची प्रत ठरवितात.

प्राचीन काळापासून भारताचा जगातील अन्य देशांशी व्यापार व दळणवळण होत असे. इ. स. पूर्व ५०० ते १२०० पर्यंतच्या कालखंडात भारतात चिनी, अरब इत्यादि देशातील अनेक प्रवासी येत असत इसवीसनाच्या तेराव्या शतकापासून युरोपीय प्रवाशांनी भारताला भेटी देण्यास सुरुवात केली. यात इटालियन, पोर्तुगीज, इंग्लिश, फ्रेंच असे अनेक देशातील लोक होते. भारताशी व्यापारी संबंध प्रस्थापित करणे हा त्यांचा प्रमुख उद्देश होता. या सर्व प्रवाशांनी भारतीय संस्कृती तेथील चालीरीती, खाण्यापिण्याच्या पद्धती आणि शेतकी उत्पादने यांची सविस्तर वर्णने केलेली आहेत. त्या ऐतिहासिक नोंदीमुळे आपल्याला प्राचीन भारताची बरीचशी माहिती मिळते.

जॉन मोंटो कॉरव्हिनो या इटालियन धर्मगुरूची पेकिंग येथे नेमणूक झाली होती. पेकिंगला जाताना पर्शियामार्गे तो इ. स. १२९२ मध्ये भारतात आला आणि वर्षभर राहिला. "वर्षाचे बाराही महिने उन्हाळा असल्यामुळे वर्षभर पिके घेणारा समृद्ध प्रदेश" असे दक्षिण भारताचे वर्णन त्याने केले होते. "उत्तम मसाल्याचे पदार्थ तयार करणारा देश" अशी भारताची युरोपभर ख्याती झाली होती. निकोलाय दि कॉन्टी हा व्हेनिसमधील व्यापारी ! कालिकत बंदरातील मिरी, दालचिनी या मसाल्याच्या पदार्थांची विपुलता पाहून तो प्रभावित झाला होता.

इ. स. १५०५ ते १५०८ या कालखंडातील प्रथितयश प्रवासी म्हणजे Ludovicdi Venthema लुडोविको दी वर्थीमा ! मिरी, दालचिनी, आले, सुंठ, लवंगा इत्यादि मसाल्याच्या पदार्थांची बाजारातील रेलचेल हे विजयनगरच्या (कर्नाटक) साम्राज्याचे वैभव होते असे त्याने नमूद केले होते. थॉमस स्टीव्हन्स हा ब्रिटिश धर्मगुरू इ. स. १५७९ च्या सुमारास भारतात

आला आणि चाळीस वर्षे येथेच राहिला. ''भारतात दालचिनी होत असली तरी उत्तम प्रतीची दालचिनी सिलोनमध्ये होते'' असे उल्लेख त्याच्या लेखनात आढळतात.

भारतीय लोक दालचिनीचा उपयोग सढळ हाताने करीत असत. ग्रीक आणि रोमनांना दालचिनी हा पदार्थ माहीत होता. तरीसुद्धा त्यानी अन्नपदार्थात दालचिनीचा उपयोग करण्यास खूप उशिरा म्हणजे सुमारे तिसऱ्या व चौथ्या शतकात सुरुवात केली. अर्धा चमचा दालचिनीची पूड घातलेला कपभर चहा म्हणजे डायरियावरील उत्तम औषध असा अनेकांचा समज होता. म्हणून दालचिनी वापरली जाऊ लागली. त्यानंतर दालचिनीचा कामोत्तेजक गुण मानवाच्या लक्षात आला आणि त्या दृष्टीने लोक दालचिनीचा उपयोग लोक करू लागले.

मध्ययुगीन राजवटीत चिनी टाओइस्ट लोकांना 'कॅसिया-चिनी दालचिनी ही अमरत्व प्राप्त करून देणारी 'अमृत' या संकल्पनेशी मिळती जुळती वनस्पती' असे प्रकर्षाने वाटत असे. त्याबद्दलची एक चिनी आख्यायिका सुप्रसिद्ध होती. चंद्रावरील काळा डाग हा सशासारखा दिसतो. हा चंद्रावरील ससा प्रत्यक्षात अतिउंच चिनी दालचिनीच्या झाडावरून आधार घेऊन खाली आला. त्या सशाने दालचिनीच्या झाडाची साल कुरतडून खाल्ली. त्यामुळे त्या झाडात 'अमृत' तयार झाले. या अमृतामुळे दालचिनीच्या झाडाला हा सोनेरी रंग आणि अमरत्व बहाल करण्याचा दैवी गुण प्राप्त झाला. अशी ही चिनी दंतकथा सुरस व चमत्कारिक !

दालचिनीच्या सुगंधामुळे दालचिनी झिरझिरीत कापडात बांधून त्याची पुरचुंडी माणसे आपल्याजवळ ठेवीत असत. यामुळे कोणत्याही रोगापासून त्या व्यक्तीचे संरक्षण होते असा त्या काळातील लोकांचा समज होता. स्वत:जवळ सुवासिक दालचिनीची पुरचुंडी बाळगणे हा गावातील दुर्गंधीचा स्वत:स उपद्रव होऊ नये यासाठी उत्तम उपाय होता.

आज ज्या देशाचे नाव तुर्कस्तान आहे त्यास प्राचीन काळी 'आशिया मायनर' म्हणत असत. आशिया आणि युरोप खंडाच्या सीमारेषेवर असल्यामुळे पूर्व व पश्चिमेकडील 'लोकांची युद्धभूमी' असे स्वरूप त्याला प्राप्त झाले होते. शेकडो वर्षे ग्रीक, मेसोडोनियन आणि रोमनांनी आशिया मायनरवर राज्य केले होते. तेथे Antiochus अँटिऑकस व त्याचा मुलगा Seleucus सिल्युकस हे सुप्रसिद्ध राजे होऊन गेले. ते दानशूर म्हणून प्रसिद्ध होते. आशिया मायनरमधील प्रसिद्ध बंदर मिलेटस येथे अपोलो देवतेचे मंदिर होते. या मंदिराला या पितापुत्रांनी दालचिनी (सिनॅमोमम झीलॅनिकम) आणि चिनी दालचिनी (कॅसिआ) यांची देणगी दिली होती. ही माहिती त्या मंदिरात कोरलेल्या शिलालेखावरून आपल्याला समजते. प्राचीन काळी दालचिनी हा किती मौल्यवान पदार्थ समजला जाई त्याचा हा पुरावाच आहे.

निरो हा इसवीसनाच्या पहिल्या शतकातील (इ. स. ५४ ते ६८) रोमन बादशहा त्याच्या क्रौर्यासाठी व कुकर्मासाठी कुप्रसिद्ध आहे. प्रत्यक्ष आईचा खून करणाऱ्या निरोने आपली पत्नी पॅपिआ ही गर्भार असताना तिला लाथ मारून तिची हत्या केली. या राक्षसी कृत्यानंतर पत्नीची अंत्ययात्रा आणि अंत्यविधी मात्र खूप थाटामाटात केला. प्राचीन रोममध्ये कॅपिटॉलीन या डोंगरावर

ज्युपिटरचे मंदिर होते. या डोंगराच्या पायथ्याशी सुगंधी द्रव्याचे विक्रेते आणि औषधे तयार करणारे वैदू आपल्याजवळील वस्तू विकत असत. राणीच्या अंत्यविधीसाठी या लोकांकडील सर्वच्या सर्व दालचिनी निरोने हस्तगत केली. रोममध्ये जेथे जेथे दालचिनीचे साठे होते ते जमा केले.ही सर्व दालचिनी पॅपिआच्या प्रेताबरोबर अग्नीच्या स्वाधीन केली! मृतव्यक्तीच्या अंत्यविधीत सुगंधी द्रव्य म्हणून चंदन वापरण्याची प्रथा आपल्याकडे आहे. तेच महत्त्व प्राचीन काळी रोमन साम्राज्यात दालचिनीला होते !

गॅलन हा ग्रीक राजवैद्य इसवीसन पूर्व १२९ ते ९९या कालखंडात होऊन गेला. शरीर रचनाशास्त्र, औषधशास्त्र यावर मूलभूत संशोधन करून त्याने अनेक पुस्तके लिहिली होती. त्याच्या मतानुसार बहुतेक रोमन बादशहांच्या खजिन्यात दालचिनीचा भरपूर साठा असे. लिव्हिया या रोमन सम्राज्ञीने आपला पती ऑगस्टस याच्या सन्मानार्थ पॅलॅटिन टेकडीवर सुंदर मंदिर उभारले होते आणि या मंदिरात मध्यभागी सुवर्णपात्रात दालचिनीचे मोठे तुकडे ठेवलेले असत. कॉर्बी या फ्रान्सच्या परगण्यातील धर्मपीठात दालचिनीचा भरपूर साठा केलेला होता. 'दुसरा चिल्पेरिक' या फ्रॅंकिश राजाने कॉर्बीच्या धर्मपीठाला पाच पौंड (१.६किलो) दालचिनीची भेट दिली अशी नोंद अधिकृत कागदपत्रात आढळते. सोने चांदी रत्नासारखी दालचिनी रोमन लोकांना मौल्यवान वाटत असे !

निसर्गतज्ज्ञ प्लीनीच्या वनस्पतीशास्त्रावरील गाढ्या अभ्यासाची झलक आपण भाज्या आणि फळांच्या इतिहासात पाहिलीच आहे. ग्रीक रोमन वनस्पतीशास्त्रज्ञ डॉक्टर डायोस्कोराइड्स् आणि ग्रीक इजिप्शियन भूगोलतज्ज्ञ टॉलेमी यांचाही आपापल्या विषयांतील ज्ञानाचा अधिकार उल्लेखनीय होता. म्हणूनच इसवीसनाच्या पहिल्या व दुसऱ्या शतकांतील युरोपीय जनता या तिघांच्या नोंदी प्रमाणभूत मानीत असे. 'दालचिनी' हा मसाल्याचा पदार्थ तांबड्या समुद्रातील व्यापारी केंद्रातून युरोपमध्ये येत असेत या हिरोडोटसच्या नोंदीला या तिघांनीही दुजोरा दिला होता. इजिप्तमधील फॅरोहा या राजाच्या राजवटीतसुद्धा इथिओपिआ किंवा अरब राष्ट्रांकडून तांबड्या सुमुद्रातील व्यापारी केंद्रात दालचिनी येत असे. इसवीसनापूर्वीच्या तिसऱ्या शतकापासून सिल्क रोड हा मार्ग आशिया आणि युरोप खंडातील व्यापारासाठी रूढ झाला होता ही गोष्ट सत्य आहे असे टॉलेमीने सुद्धा नमूद केले होते. मध्य चीनमधील झीयॅन येथून निघणारा हा मार्ग इराण इराक या देशातून Antioch या दक्षिण तुर्कस्तान आणि सिरीयाच्या सीमारेषेवरील शहराला येऊन मिळत असे. अँटिऑक हे शहर प्राचीन काळी सिरीयाच्या राजधानीचे शहर असून इसवीसनापूर्वी तिसऱ्या शतकात अँटिऑक (पहिला, दुसरा असे आठ राजे) राजांनी वसवले होते. हे राजे अपोलो देवतेला दालचिनी अर्पण करीत असत हा उल्लेख वर आलाच आहे. सिल्क रोडने, फळे, भाज्या, मसाल्याचे पदार्थ व इतर अनेक वस्तू आशिया खंडातून युरोपमध्ये पाठविल्या जात असत. या व्यापारात अनेक युरोपीय लोक गुंतलेले होते. लेबॅनॉन, सिरीया येथील धर्मयुद्धात एके काळी भाग घेतलेले योद्धे उपजीविकेचा व्यवसाय मिळवण्याच्या



अनुक्रमणिका

शोधात होते. या व्यापारात सहभागी होऊन आपला हेतू साध्य होईल या हेतूने हे लोक लेबॅनीज आणि सिरीयन बंदरात स्थायिक होत असत. यापैकी अनेक लोक पुढे मसाल्याच्या पदार्थांचे, विशेषत: दालचिनीचे व्यापारी झाले आणि या व्यापारात त्यानी भरपूर पैसा कमावला. दळणवळणाची अप्रगत साधने आणि कष्टदायक प्रवास यामुळे पश्चिम युरोपमधील रहिवाशांना मात्र हा व्यापार फार दूरवरचा आणि धोकादायक वाटे.

पश्चिम युरोपमधील ख्रिश्चन लोकांनी आपली धार्मिक स्थाने मुसलमानांच्या तावडीतून सोडविण्यासाठी इसवीसनाच्या अकराव्या शतकापासून तेराव्या शतकापर्यंत जी युद्धे केली त्याना 'क्रुसेडस्' असे म्हणतात. या युद्धातील सैनिक जेव्हा आपल्या मायदेशी परत जात तेव्हा त्यांच्या सन्मानार्थ सेन्स किंवा अन्य धर्मपीठातील धर्मगुरू भाताची खीर देत असत. त्यांत भरपूर बदाम आणि सुवासाकरता दालचिनीची पूड घालत असत. त्यामुळे ती खीर लज्जतदार होई आणि योद्धे खूष होत. जॉइनव्हिलने आपल्या राजाबरोबर अलेक्झांड्रिया येथे जाताना इ. स. १२४८ साली या खिरीचा आस्वाद घेतला होता. या दालचिनीबद्दल उत्सुकतेने विचारणा केल्यास बाजारातील मुसलमान व्यापारी दिशाभूल करणारी माहिती देत असत. "नदीत जाळे टाकून मासे पकडतात त्याप्रमाणे नाईल नदीतून दालचिनी मिळवतात. ही नाईल नदी पृथ्वीच्या पठाराच्या कडेने वाहात असून ती स्वर्गाच्या विरुद्ध दिशेला आहे." अशा फसव्या माहितीवर जॉइनव्हील सारख्या युरोपियन प्रवाशांच्या विश्वास बसत असे; कारण दालचिनी कोणत्या झाडापासून निर्माण होते? ही दालचिनी म्हणजे झाडाचा कोणता भाग असतो? ती जगातील कोणत्या देशात प्रामुख्याने आढळते याची फारशी माहिती मध्ययुगीन युरोपीय मानवाला नव्हती. त्यामुळे युरोपात दालचिनीची प्रतिष्ठा आणि किंमत दोन्हीही जास्त असे !

इ. स. १२७१च्या नोव्हेंबरमध्ये मार्को पोलो हा सुप्रसिद्ध इटालियन प्रवासी आपले वडील, आणि काका या दोघांसह मध्य आशियाच्या सफरीवर निघाला. तुर्कस्तानच्या आग्नेयेकडे इस्केन्डेरम Iskenderum नावाचे बंदर आहे. त्याकाळी या बंदराला 'अलेक्झांड्रेटा' Alexandretta असे नाव होते. या बंदराजवळील लायस (Layas) या शहरी मोठी बाजारपेठ होती. मसाल्याचे पदार्थ, रेशमी कापड, सोने आणि इतर अनेक मौल्यवान वस्तू आशिया खंडातील अनेक देशांमधून येथे आणल्या जात. या ठिकाणी युरोपमधील व्हेनिस, जिनोआ व अन्य देशातील व्यापाऱ्यांची या वस्तू खरेदी करण्यासाठी झुंबड उडे. हे व्यापारी लायसच्या बाजारपेठेतील माल खरेदी करीत आणि आपापल्या देशात विक्रीसाठी घेऊन जात. पण हा सर्वमान्य मार्ग पोलो कुटुंबीयाना चोखाळायचा नव्हता. त्यांची झेप तत्कालीन सर्वसामान्य युरोपीय व्यापाऱ्यांच्या पुढची होती. आशिया खंडातील माल लायसमध्ये विकत घेण्यापेक्षा आशिया खंडातील देशांना प्रत्यक्ष भेटी द्याव्यात व तेथे तो माल हस्तगत करावा असे त्यांना वाटत होते. म्हणून खुष्कीच्या मार्गाने पोलो कुटुंबीय 'ऑर्मझ' या बंदरात आले. "ऑर्मझ या बंदरात भारतातील व्यापारी मसाल्याचे पदार्थ, रेशमी कापड, सोने व मौल्यवान रत्ने घेऊन येत असत."

अशी नोंद मार्को पोलोच्या प्रवासवर्णनात आढळते. ऑर्मझ या बंदरातून मोठे जहाज घेऊन चीनला जावे असा बेत त्याने केला. परंतु समुद्रातील भीषण वादळांना तोंड देत आपले जहाज चीनपर्यंत आपण पोहोचेल किंवा नाही याबद्दल मार्को पोलो साशंक होता. आपल्या सफरीच्या नोंदीत तो म्हणतो, "वादळात समुद्रसफरीवर निघणे फारच धोकादायक असते. अनेक खलाशांना या वादळात जलसमाधी मिळाल्यामुळे त्यांचे नामोनिशाणसुद्धा शिल्लक रहात नाही. भारतीय समुद्रातील ही वादळे उग्र आणि भीतिदायक असतात." अशा तऱ्हेच्या धोक्याच्या इशाऱ्यांमुळे लोक या व्यापारात सहभागी होणार नाहीत आणि पर्यायाने आपल्याला प्रतिस्पर्धी सुद्धा निर्माण होणार नाही हा मार्को पोलोचा अंतस्थ हेतू होता.

पोलो कुटुंबीय दालचिनीच्या व्यापाराबाबत धूर्तपणाने आणि कावेबाजपणाने वागत. सिरीया आणि कान्स्टंटिनोपोल येथे समुद्रमार्गे आलेली दालचिनी बंदरात उतरवण्याचे काम त्यांचे व्हेनिसमधील सहकारी करीत असत. या सहकाऱ्यांना दालचिनी कोणत्या देशातून येते, किंवा ती कशी मिळवतात याबद्दलची काहीही माहिती नसे. पोलो कुटुंबीयाना दालचिनीची इत्थंभूत माहिती असली तरी आपल्या सहकाऱ्यांना ते त्या माहितीचा पत्ता लागू देत नसत. उत्कृष्ट दर्जाची, मौल्यवान दालचिनी सिलोनमध्ये मिळते हे ठाऊक असूनसुद्धा आपल्या लेखनात 'सिलोन' हे देशाचे नाव मार्को पोलो देत नाही. उलट "जगातील सर्वात सुंदर बेट" असा संदिग्ध स्वरूपात तो सिलोनचे वर्णन करतो. कमी दर्जाच्या चिनी दालचिनीबद्दल (कॅसिआ) बरीच माहिती त्याने लिहिली होती आणि तिबेटमध्ये या दालचिनीचे अमाप पीक येते हेसुद्धा नमूद केले होते. मसाल्याच्या पदार्थाच्या व्यापाराचा पूर्ण मक्ता आपल्याकडे रहावा या स्वार्थी हेतूने तो अधिक माहिती देण्याचे टाळतो, तरीसुद्धा मसाल्याच्या पदार्थांची चटकदार व तोंडाला पाणी सुटवणारी वर्णने मार्को पोलो आपल्या पुस्तकात अवश्य करतो. तो म्हणतो "मलबारमध्ये उत्तमोत्तम मसाल्याचे पदार्थ मुबलक प्रमाणात पिकतात. हे सर्व मसाल्याचे पदार्थ, विशेषतः दालचिनी मोठमोठ्या जहाजातून एडनला आणतात व तेथून ते पदार्थ 'अलेक्झांड्रिया' येथे आणतात." अलेक्झांडर दी ग्रेट या मॅसिडोनच्या राजाने (इ. स. पूर्व ३५६– ३२३) पर्शिया पादाक्रांत केला आणि इजिप्त, सिरीया आणि मेसापोटेमिया यावर विजय मिळवला. इजिप्तमध्ये असताना त्याने वसवलेले शहर तेच हे अलेक्झांड्रिया ! भूमध्य समुद्रातील इजिप्तचे हे बंदर व्यापाराचे प्रमुख केंद्र बनले. मार्को पोलोने प्रस्थापित केलेली दालचिनीच्या व्यापाराची परंपरा पुढे तेराव्या व चौदाव्या शतकातील इटालियन व्यापाऱ्यांनी चालू ठेवली आणि दालचिनीच्या व्यापारावर संपूर्ण कब्जा मिळवला. या एकधिकारशाहीचा फायदा घेऊन या व्हेनेशियन व्यापाऱ्यांनी दालचिनीचे अव्वाच्या सव्वा भाव निश्चित केले.

इसवीसनाच्या चौदाव्या शतकात दालचिनी हा इटालियन स्वयंपाकातील एक आवश्यक पदार्थ बनला. दालचिनीशिवाय खाद्यपदार्थ तयार करणे इटालियनांना जवळजवळ अशक्य झाले होते. त्यामुळे व्यापाऱ्यांनी ठरविलेल्या चढ्या किंमती देऊन लोक दालचिनी खरेदी करीत. युरोपीय

लोकांना अनेक खाद्यपदार्थात दालचिनीचा स्वाद आवडत असे तऱ्हतऱ्हेची सॉसेस बनवताना दालचिनीचा मुक्त हस्ताने वापर होत असे. शाकाहारी तसेच मांसाहारी पदार्थात इतर मसाल्याच्या पदार्थांबरोबर दालचिनी प्रामुख्याने घालत. त्यामुळे पदार्थ स्वादिष्ट आणि चविष्ट होतात असे तत्कालीन खाद्यरसिकांचे मत होते. तेराव्या व चौदाव्या शतकांतील ६७% फ्रेंच पदार्थांत दालचिनी घालीत असत असे ऐतिहासिक नोंदीवरून सिद्ध होते. ॲपल कॉम्पोत, राइस पुडिंग यासारखे काही पदार्थ सोडले तर फ्रेंचांनी दालचिनी वापरण्याचे प्रमाण आता बरेच कमी केले आहे, तर क्युबेकमधील फ्रेंच कॅनॅडियन आपल्या या दालचिनी भरपूर प्रमाणात वापरण्याच्या सवयीशी प्रामाणिक राहिले आहेत. इटली, स्पेन, कॅटालोनिया येथील रहिवाशानीसुद्धा पूर्वापार चालत आलेली खाद्यपदार्थात दालचिनी वापरण्याची परंपरा आजतागायत चालू ठेवली आहे. मध्ययुगीन इंग्लिश लोक मात्र दालचिनीचा उपयोग मर्यादित म्हणजे सुमारे ८ टक्के अन्नपदार्थात करीत असत. असे असूनसुद्धा सोळाव्या शतकात सुरू झालेल्या आणि दहा पिढ्या चाललेल्या दालचिनीच्या युद्धात अखेर इंग्लंडनेच विजय मिळवला.

'कोंबडं झाकून ठेवलं तरी उजाडायचं थांबत नाही' अशी आपल्याकडे एक म्हण आहे. दालचिनीबद्दलची माहिती इटालियन व्यापाऱ्यांनी कितीही गुप्त ठेवायचा प्रयत्न केला तरी पोर्तुगीजांना त्याची प्रथम चाहूल लागली. वास्को दि गामा या धाडसी पोर्तुगीज खलाशाने (१४६९ ते १५२४) केप ऑफ गुड होप मार्गे भारताला येण्याचा सागरी मार्ग शोधला होता. "सिलोन म्हणजे उत्कृष्ट दालचिनी" हे समजल्यामुळे दालचिनीच्या लोभाने पोर्तुगीजांनी सोळाव्या शतकांच्या प्रारंभी सिलोनवर कब्जा मिळवला. इ. स. १५०५ साली पोर्तुगीजांनी ११ टन दालचिनी लिस्बनला पाठविली अशी नोंद इतिहासात आढळते. यापूर्वी भारतातील कलकत्ता शहरावर हिंसक बॉम्बहल्ला करून पोर्तुगीजांनी ४०० क्विंटल दालचिनी भारतीय व्यापाऱ्यांकडून इस्तगत केली होती आणि ती अल्वारिझ कॅब्रल या बोटीतून निर्यात केली होती. दुर्दैवाने ती बोट वादळात सापडली आणि चारशे क्विंटल दालचिनी सागराच्या उदारात गडप झाली ! या प्रचंड नुकसानीची भरपाई जणू काही त्या अकरा टन दालचिनीच्या निर्यातीने पोर्तुगीजांनी केली. सिलोनमधील दालचिनी भारतीय दालचिनीपेक्षा उत्कृष्ट दर्जाची असे. त्यामुळे पोर्तुगीजांना सिलोनमधील दालचिनीच्या व्यापारावर सर्वस्वी आपले वर्चस्व टिकवायचे होते. गोवा ते ओमन या संपूर्ण प्रदेशावर त्यांनी अर्धशतकाहून अधिक काळ दहशतीचे वातावरण कायम ठेवून राज्य केले. पोर्तुगीजांनी अनेक सिंहली लोकांना गुलाम केले. अरब आणि मलबारी व्यापाऱ्यांची जहाजे पहाताक्षणी समुद्रात बुडवली. अलेक्झांड्रा, जिनोआ येथील व्यापारी किंवा त्यांचे अडते कोठे आढळल्यास त्यांचे जीवन संपुष्टात आणले. सिलोनमार्गे अन्य युरोपीय व्यापाऱ्यांनी दालचिनीचा व्यापार करू नये म्हणून पोर्तुगीजांनी आफ्रिकन किनाऱ्यावरील 'मोझॅम्बिक' हे बंदर उद्ध्वस्त केले आणि तेथे स्वत:चे टेहळणी केंद्र स्थापन केले. वास्तविक सिलोन आणि भारतात होणारा हा मौल्यवान पदार्थ ! त्याच्या व्यापारावरील स्वत:ची मक्तेदारी टिकवण्यासाठी पोर्तुगीजांनी

अवलंबलेले हे दंडेलशाही मार्ग व क्रूर वर्तणूक पाहून कोणाही सुजाण माणसाला खेदच होईल!

सतराव्या शतकापासून पोर्तुगीजांची मक्तेदारी संपुष्टात आली. डच लोकांनी दालचिनीचा व्यापार करण्यास सुरुवात केली. अर्थात् सिलोनी लोकांचा यात काहीच फायदा झाला नाही. उलट त्यांना एकाच्याऐवजी आता दोन मालकांची मर्जी सांभाळावी लागली. इ. स. १६५६ मध्ये डच व्यापाऱ्यांनी दालचिनीच्या व्यापाराचे सर्व अधिकार मिळवले आणि हे अधिकार डच ईस्ट इंडिया कंपनीकडे सुर्पूद केले. या वसाहतीतील व्यापारासाठी लागणारे आर्थिक साह्य व्यापारी आणि बँकर पुरवत असत आणि या गुंतवणुकीवर अल्प काळात भरपूर नफा कमवीत. या व्यापारी आणि बँकर मंडळींना राजाश्रय लाभत असे आणि या व्यापारामुळे त्या राजांना कीर्ती मिळत असे.

डच व्यापारी पद्धतशीरपणे काम करणारे पण पाषाणहृदयी होते. सिलोनमधील जंगलातील दालचिनीच्या झाडापासून दालचिनी काढण्यास डचांनी सुरुवात केली. तेथील मजुरांना कामाला लावले. दालचिनीच्या झाडाची साले ओरबाडण्यास व या संपत्तीची लूटमार करण्यास त्यांनी मागेपुढे पाहिले नाही. डच व्यापारी प्रतिवर्षी सुमारे २७० टन दालचिनी युरोपमध्ये पाठवीत असत. अशा तऱ्हेने टनावारी दालचिनी काढल्यामुळे दालचिनीचा साठा संपुष्टात येईल की काय अशी भीती निर्माण झाली. दालचिनीचे साठे अन्य कोणी हस्तगत करत नाही ना इकडे डच डोळ्यात तेल घालून लक्ष ठेवीत.

मध्ययुगापासून दालचिनीच्या विक्रीचा दर कमी झाला असला तरी दालचिनीची लोकप्रियता वाढली होती. युरोपमधील बहुतेक लोक दालचिनीचा उपयोग अनेक खाद्यपदार्थात करू लागले होते. दालचिनीच्या या वाढत्या मागणीला कसे तोंड द्यायचे असा प्रश्न डच व्यापाऱ्यांना पडला होता. त्यावेळी दि कोक De Coke या वसाहतवाद्याने दालचिनीच्या रोपांची लागवड करण्याची कल्पना मांडली. यापूर्वी हा विचार कोणाच्याच मनात आला नव्हता. दालचिनीच्या रोपाची लागवड केल्यापासून तीन ते चार वर्षात दालचिनी काढता येते. पहिल्या २-४ वर्षात हे उत्पादन कमी असले तरी ७-८ वर्षानंतर या नवीन झाडांपासून प्रचंड प्रमाणात दालचिनी मिळू लागली. त्यामुळे दालचिनीचे भाव आणखी कमी झाले. शेवटी किंमती स्थिर राखण्याकरता डचांना काही प्रमाणात दालचिनी जाळावी लागली. कधी कधी दालचिनी घेऊन येणारी जहाजे जाणूनबुजून उशिरा बंदरात आणावी लागत. या व्यापारात डचांना कोणीही प्रतिस्पर्धी नव्हता. तरीसुद्धा दालचिनीच्या विक्रीच्या दराचा व साठ्याचा अंदाज घेत किंमती स्थिर ठेवणे ही व्यापाऱ्यांच्या दृष्टीने तारेवरची कसरतच होती.

इ. स. १७९६ साली इंग्रजांनी सिलोनमध्ये प्रवेश केला आणि डचांचे दालचिनीचे साम्राज्य कोसळले. डचांचे इंग्रजांबरोबरचे राजकीय संबंध संपुष्टात आले होते आणि त्यांचे फ्रेंचांशी राजकीय संबंध प्रस्थापित करण्याचे प्रयत्न चालू होते. ब्रिटिशांची सिलोनमधील वर्तणूक डच व पोर्तुगीज यांच्या मानाने अत्यंत सभ्यपणाची होती. पोर्तुगीज आणि डचांप्रमाणे ते क्रौर्याने

वागले नाहीत.

थोड्या कमी प्रतीची दालचिनी वापरण्याची त्यांची तयारी होती. तसेच दालचिनींची रोपे लावणे, वाढवणे, दालचिनी काढण्याची खटाटोपाची प्रक्रिया करणे या सर्व गोष्टी ब्रिटिशांच्या काळात लोकशाही पद्धतीने होत असत. त्याचा पुरेपूर फायदा ब्रिटिशांना मिळाला. दालचिनीचा व्यापार संपूर्णपणे त्यांच्या ताब्यात आला. एकोणिसाव्या शतकाच्या मध्यात दालचिनीचे सिलोनमधील उत्पादन प्रतिवर्षी एक हजार टन इतके वाढले. दालचिनीचे उत्पादन फक्त सिलोन आणि भारतापुरते मर्यादित राहिले नाही. मलेशिया, जावा, मॅडॅगॅस्कर, मॉरिशस अशा अनेक ठिकाणी दालचिनीचे उत्पादन सुरू झाले. वेस्ट इंडीजची बेटे, ब्राझिल आणि गिआना या देशातही नव्याने दालचिनीची लागवड करण्यात आली. आजचा इजिप्त म्हणजे फॅरोहाचा प्राचीन देश ! पॅरिसच्या हरितगृहात तयार केलेली दालचिनीची दोन रोपे एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीला इजिप्तमध्ये पाठवली होती. आता इजिप्तच्या भूमीत दिमाखाने वाढत असलेली दालचिनीची झाडे म्हणजे या दोन रोपांची वंशावळच होय !

गेली दोन शतके प्रगत तंत्रज्ञान व आधुनिक उपकरणे यामुळे दालचिनीपासून तेल काढतात. सालीतील तेलाचे प्रमाण अत्यल्प म्हणजे ०.५ ते १ टक्का असते. हे तेल ऊर्ध्वपातन पद्धतीने मिळवतात. त्यांत सिनॅमिक अल्डी हाइड ($C_9H_8O$) हा महत्त्वाचा रासायनिक घटक असतो. मद्याला स्वाद आणण्याकरता तसेच सौंदर्यप्रसाधने तयार करताना या तेलाचा उपयोग करतात. तीव्र जंतुनाशक गुणधर्मामुळे या तेलाचा औषधातही वापर करतात. दालचिनी या मसाल्याचा उपयोग प्रारंभी औषध म्हणून होत असे. या तेलाने मानवाला पुन्हा एकदा या मसाल्याच्या मूळ गुणधर्माकडे आणले !

## मिरी

मिरी हा तिखट, उग्र वासाचा, महाग मसाल्याचा पदार्थ. मिऱ्याच्या या गुणधर्मावरून मराठी साहित्यात फार छान म्हणी आणि वाक्प्रचार रूढ झाले आहेत. मिऱ्याप्रमाणे तिखट, कडक, जिव्हारी लागेलसे भाषण करणाऱ्या व्यक्तीला अथवा भाषणाला 'मिरीमारा' हे विशेषण लावतात. 'एखाद्या व्यक्तीने दुसऱ्याच्या डोक्यावर चांगल्या मिऱ्या वाटल्या' म्हणजे त्या व्यक्तीने दुसऱ्याला चांगलाच धडा शिकवला ! फुकट जेवणाऱ्या माणसाने जास्त मिजास दाखवू नये या अर्थाची "अन्नसत्री जेवणे आणि मिरपूड मागणे" ही म्हण वापरली जाते तर "मिरी नासली तरी जोंधळ्याच्या भावाने जात नाहीत" या म्हणीतून मिरी किती मौल्यवान होती हे आपल्याला समजते.

मराठी साहित्यात आपल्या गुणवैशिष्ट्यांचे दर्शन घडवणाऱ्या मिऱ्याचे शास्त्रीय नाव आहे "पाइपर नायग्रम." पिपॅरेशिअे या वनस्पतीशास्त्रीय कुटुंबात मिऱ्याच्या वेलीचा समावेश होतो. जमिनीची धूप होऊ न देणारे 'पाइपर ॲडन्कम' उग्र वासाची मिरी येणारे "पाइपर क्युबेबे",



अनुक्रमणिका

शोभेचे तुरे येणारे "पाइपर ऑर्‌नॅटम" ही पाइपर या जीनसमधील आणखी काही झाडे ! आपल्या सर्वांच्या परिचयाचा आणि अनेकांचा आवडता आणखी एक वेल 'पाइपर' या जीनसमध्ये येतो – तो म्हणजे 'पाइपर बीटल' – विड्याच्या पानांचा वेल ! कात, चुना, सुपारी व अन्य सुगंधी द्रव्ये घालून तयार केलेला त्रयोदशगुणी विडा अनेकांच्या जीवनाची 'रंगत' वाढवतो !

पाइपर नायग्रम हे मिऱ्याचे वेल द्राक्षाच्या वेलासारखे असतात. जंगलात वाढणारे वेल एखाद्या मोठ्या वृक्षाच्या आधाराने वाढतात. अशा जंगली वेलींची उंची ६ मीटरसुद्धा असते. पण बागाईतदार जेव्हा मिऱ्याच्या रोपांची मुद्दाम लागवड करतात तेव्हा या वेलींना आधारासाठी लाकडी किंवा लोखंडी पट्ट्याचे सुरेख 'मांडव' घालतात व त्यावर मिऱ्याच्या वेली चढवतात त्यामुळे या वेलींच्या उंचीवर आपोआपच नियंत्रण राहाते. त्यांची उंची साधारणपणे २।। ते ३ मीटर असते. मिऱ्याच्या वेलीची पाने जाड, हिरवीगार असतात आणि त्यांचा आकार इस्पिकच्या एक्क्यासारखा दिसतो. पानांमधील रेषा देठापासून निघून काहीशा समांतर असतात व पानाच्या टोकाशी त्या पुन्हा एकत्रित होतात. झाडाच्या कमकुवत खोडाला प्रत्येक पेराजवळ एकच पान येते व या पानाच्या विरुद्ध बाजूस छोट्या, नाजूक, पांढऱ्या फुलांचे कणिश (Spike) येते. या एका कणिशात जवळ जवळ पन्नास फुले असतात. दक्षिण भारतात मिऱ्याचे जे रानटी वेल येतात ते बहुवार्षिक असतात म्हणजे वर्षानुवर्षे (सुमारे ४० वर्षे) त्या वेलीला मिरी येत राहतात. तसेच हे वेल बहुधा डायोशिअस असतात. पुंपुष्पे व स्त्रीपुष्पे ही वेगवेगळ्या वेलींवर येतात. मुद्दाम लागवड केलेल्या मिऱ्याच्या वेली वार्षिक असतात. एका वर्षात त्यांचा जीवनक्रम पूर्ण होऊन फलधारणा झाल्यावर वेल मरतो व दरवर्षी नव्याने लागवड करावी लागते. या वेली मोनेशियस असतात. अर्थात् पुंपुष्पे व स्त्रीपुष्पे ही एकाच वेलीवर येतात. परपरागीभवनानंतर फलन होते व छोटी छोटी हिरवी फळे वेलीवर दिसू लागतात. ही फळे पक्व होऊ लागली की ती लाल, काळपट चॉकलेटी होतात. ही फळे म्हणजेच मिरी ! ही फळे पक्व होण्यापूर्वी वेलीवरून काढली आणि उन्हात वाळवली तर ती सुरकुततात आणि काळी होतात. यांनाच आपण काळी मिरी म्हणतो. काही वेळा ही फळे झाडावरच पूर्णपणे पक्व होऊ देतात व मग वेलीवरून काढतात. मग त्याचे साल काढतात. साल काढल्यावर फिक्कट रंगाचे मिऱ्याचे बी उरते त्या मिऱ्याच्या बिया वाळवतात व मग त्याची पूड करतात. यालाच पांढरी मिरी म्हणतात. कधी कधी हिरवी मिरी मिठाच्या पाण्यात किंवा व्हिनेगारमध्ये ठेवतात. अशी कॅन किंवा बाटलीतील हिरवी मिरी युरोपातील अनेक देशांतील प्रतिष्ठित आणि फॅशनेबल लोकांकडे अनेक खाद्यपदार्थात वापरतात. मिरपूड करून ठेवल्यास त्याचा स्वाद कमी होतो. म्हणून तर जेवताना आवश्यक असेल तेवढीच मिरपूड ताजी ताजी तयार करतात. पाश्चात्त्य देशात घरोघरी अशी पूड करण्याची छोटीशी यंत्रे असतात. पदार्थ शिजताना त्यात मिरपूड घातली तर तिचा स्वाद जातो व ती कडसर लागते. म्हणून पदार्थ खाण्याच्या वेळी त्यावर मिरपूड पेरतात.

'पाइपर लाँगम' ही मिऱ्याची एक प्राचीन जात. चरकसंहिता. बृहत्संहिता अशा प्राचीन संस्कृत वाङ्मयात तसेच तामिळ ग्रंथात मिऱ्याचे उल्लेख अनेक ठिकाणी आले आहेत. संस्कृत आणि बंगालीत या मिऱ्यांना "पिप्पली" म्हणतात. ही जात मूळची भारतातील आहे. दक्षिण भारतात या जातीच्या मिऱ्यांचे प्रचंड उत्पादन होत असे. इ. स. पूर्व दोन हजार वर्षे या जातीची मिरी दक्षिण भारतातून निर्यात होत असत. परंतु आता या मिऱ्यांचे उत्पादन अत्यंत कमी असून त्यांचा वापरही तुरळक होतो. या मिऱ्याची झुडुपे असतात आणि त्यांना हिरव्या मिरची सारख्या दिसणाऱ्या लांबट शेंगा येतात. या शेंगातील लांबट दाणे म्हणजे ही लांबट मिरी. या झाडाची मुळे – "पिप्पलीमुळे" आयुर्वेदिक औषधात वापरतात. प्राचीन काळी वापरात असलेली ही लांबट मिरी बाराव्या शतकापर्यंत प्रचारात राहिली. पुढे मात्र त्याची जागा गोल मिऱ्यांनी घेतली.

वैदिक काळात मोहरी, हळद, दालचिनी आणि पिप्पली हे मसाल्याचे पदार्थ प्रामुख्याने वापरत असत. आर्य एका ठिकाणी स्थायिक झाले, शेती करू लागले. खाद्यपदार्थ तयार करताना काळ्या मिऱ्यांबरोबर हिंगाचा वापर करू लागले. अशक्त व्यक्तींनी, आजारातून नुकत्याच बऱ्या होत असलेल्या रुग्णांनी आणि कष्टाची कामे करणाऱ्यांनी सुदृढ प्रकृतीसाठी जरूर मांसाहार घ्यावा असे चरकाचे मत होते. बृहदारण्यक उपनिषदातही मांसाहाराचा पुरस्कार केलेला आढळतो. शिजवलेल्या मांसाचे एकूण सात प्रकार सुश्रुताने वर्णिलेले होते. त्यात लांबट मिरी (पिप्पली) आणि काळी मिरी (मरीचा) घालून स्वादिष्ट आणि चविष्ट केलेल्या मांसाहारी खाद्यपदार्थांच्या अनेक पाककृती सुश्रुताने दिल्या होत्या.

इसवी सनाच्या दहाव्या शतकानंतरच्या उत्तर व दक्षिण भारतातील खाद्यपदार्थांच्या लिखित नोंदी इतिहास संशोधनात सापडतात. मध्य भारतातील कल्याण या प्रदेशाचा राजा सोमेश्वर (इ. स. ११३०) याने 'मानसोल्हास' या आपल्या ग्रंथात राजाची कर्तव्ये, त्याचा दिनक्रम, आवडीनिवडी, जीवनपध्दती अशा अनेक गोष्टींबद्दल आपले विचार व्यक्त केले होते. या ग्रंथराजात एकूण १०० विभाग असून ते पाच भागात एकत्रित केले होते. त्यांतील एका विभागात भोजनपध्दती आणि पाककृतींची सविस्तर माहिती सोमेश्वर राजाने दिली होती. त्या पाककृतीत अनेक ठिकाणी मिऱ्याचा उल्लेख येतो. इ. स. १७०० साली कर्नाटकात होऊन गेलेल्या बसवराज राजाने "शिवतत्त्वरत्नाकर" हा मौल्यवान ग्रंथ लिहिला होता. त्या ग्रंथात आपले राज्य, प्रजा, त्यांच्या चालीरीती या माहितीबरोबरच चौसष्ट कलांपैकी 'पाकशास्त्र' या कलेविषयी बरेच विचार व्यक्त केले होते. या दोन्ही ग्रंथात शाकाहारी तसेच मांसाहारी पदार्थांच्या पाककृती दिल्या होत्या. या सर्वच पाककृतीत मिरपुडीचा भरपूर वापर केलेला आढळतो. डाळिंबाच्या दाण्यांवर मिरपूड पसरून मग ते दाणे तुपावर परतले तर एक अप्रतिम शाही पाककृती होते असाही उल्लेख मानसोल्हासात येतो.

शिकवकोट्याचार्य यांच्या कन्नड ग्रंथात (इ. स. ९२०) 'इडली' या पदार्थाचा प्रथम लिखित उल्लेख आढळतो. दक्षिण भारतातील एखाद्या घरंदाज कुटुंबात जेव्हा ब्रह्मचारी भिक्षा मागण्यास

येई, तेव्हा त्याला भिक्षा म्हणून घालावयाच्या अठरा पदार्थात इडलीचा समावेश असे. त्यानंतर इडलीचा उल्लेख दक्षिण भारतीय वाङ्‌मयात अनेकदा येतो. पण बहुतेक ठिकाणी इडलीच्या पिठात मिरपूड, जिऱ्याची पूड आणि हिंग घालून मग त्या पिठाची इडली तयार करत असत असे उल्लेख आढळतात. आता आपण इडलीच्या पिठात मिरी घालत नसलो तरी 'कांचिपुरम् इडली' या प्रकारात इडलीच्या पिठात मिरी, हिंग, हळद, काजूचे तुकडे घालून इडली करतात. ही इडली फार – चविष्ट लागते. गव्हाच्या पिठापासून करावयाच्या एका गोड पदार्थात वेलची, दूध, केशर याबरोबर मिरपूडसुद्धा घालत. असा उल्लेख 'मानसोल्हासात' आढळतो ! संस्कृत वाङ्‌मयात अनेक ठिकाणी भारतात होत असलेल्या तऱ्हेतऱ्हेच्या मद्याची माहिती आढळते. यापैकी 'मैरेय' या मेसाश्रिंगी झाडाच्या सालीपासून बनवलेल्या मादक पेयात स्वादाकरता मिरपूड आणि इतर मसाले घालत असत. 'संभारिकी' हे मद्य तर भरपूर मसाल्याचे पदार्थ घातलेले असे.

इ. स. १५२० साली 'वरणक समुच्चय' हा ग्रंथ लिहिला. या ग्रंथाच्या लेखकाचे नाव अज्ञात असले तरी त्यात गुजराथ प्रांतात होत असलेल्या सर्व खाद्यपदार्थांची यादी दिली होती. तांदूळ, बाजरी या तृणधान्यांपासून केलेले अनेक तिखट पदार्थ, डाळी आणि कडधान्ये यापासून बनवलेल्या वड्यांच्या मिश्रणात आलं, तिखट, हळद याबरोबरच मिरी वापरत असत अशी नोंद या ग्रंथात आढळते. तोंडली, शिराळी, घोसाळी, गोवार, पापडी, मुळा इत्यादि अनेक भाज्यांत स्वादाकरता मिरपूड घालत असत असाही उल्लेख वरणक समुच्चयात आढळतो.

भारतीय लोक 'पिप्पली' या जंगली, लांबट मिऱ्याचे पहिले निर्यातदार होते. या मिऱ्यांचे युरोपियनानी विलक्षण उत्साहाने स्वागत केले आणि त्याचे "पिप्पली" हे संस्कृत नावसुद्धा थोड्या फार फरकाने आपलेसे केले. ग्रीकमध्ये पेपेरी (Peperi), फ्रेंच भाषेत पॉव्ह (Poiver), लॅटिनमध्ये पाइपर (Piper), इटालियन भाषेत पेपे (Pepe), जर्मनमध्ये पेफर (Pfefper), इंग्लिशमध्ये पेपर (Pepper) अशी मिऱ्याची युरोपियन भाषांमधील नावे वरील विधानाची सत्यता पटवतात.

युरोपियनांनी 'दालचिनी' हा मसाल्याचा पदार्थ प्रथम औषधाकरता वापरला व मग ते खाद्यपदार्थात दालचिनीचा वापर करू लागले. पण मिऱ्याच्या बाबतीत तसे घडले नाही. इसवी सनाच्या सहाव्या शतकात युरोपियनांची या चिटुकल्या काळ्या बियांशी ओळख झाली आणि अल्पावधीत त्या ओळखीचे घनिष्ट मैत्रीत रूपांतर झाले ! युरोपियनांनी आपल्या खाद्यपदार्थात मिऱ्याला मानाचे स्थान दिले. हिप्पोक्रेटस (इ. स. पूर्व ४६० ते ३७७) हा ग्रीक डॉक्टर म्हणजे औषधशास्त्राचा जनक. त्याच्या लेखनात 'मिरी' या मसाल्याच्या पदार्थाची वर्णने आली होती. त्याने 'मिरी' हा पदार्थ औषध म्हणून कसा उपयोगी आहे त्याचे वर्णन केले होते. ग्रीक व रोमन लोक सहाव्या शतकापूर्वी खाद्यपदार्थात काळपट, जांभळ्या लांबट मर्टल (Myrtle) नावाच्या फळांचा स्वादाकरता उपयोग करीत. पण मिऱ्याची ओळख झाली आणि युरोपियनांच्या पाकशास्त्रांतील मर्टलची जागा मिऱ्याने घेतली. तरीसुद्धा भूमध्यसामुद्रिक प्रदेशातील लोक काही

विशिष्ट पाककृतीत मर्टलच वापरतात. इतर अनेक मसाल्याच्या पदार्थांप्रमाणे मिऱ्यामुळे प्रकृती उत्तम राहाते, अन्नाचे पचन चांगले होते. भूक वाढते अशी प्राचीन काळी युरोपियनांची खात्री होती. कामवासना उद्दिपित करण्याचा खास गुणधर्म मिऱ्यात आहे अशीही त्यांची श्रद्धा होती.

सर्व मसाल्याच्या पदार्थात मिऱ्यांचा प्रसार फार जलद झाला. (इ. स. २३ ते ७९) प्लीनीने आपल्या 'नॅचरल हिस्टरी' या ज्ञानकोषाच्या सातव्या भागात मिऱ्याबद्दलची त्या काळात ज्ञात असलेली माहिती नमूद केली होती. प्लीनी म्हणतो, "मिऱ्याचा झोंबणारा झणझणीत स्वाद हा सर्वांना हवाहवासा वाटतो. मिरी म्हणजे जंगली झाडाच्या बिया ! तरीसुद्धा सोने चांदी या मौल्यवान धातूंप्रमाणे मिरी वजनावर विकत घेतात." खाद्यपदार्थावर स्वादाकरता मिरपूड पेरावी ही सुपीक कल्पना कोणाच्या मनात कशी आली असावी याचे प्लीनीला आश्चर्य वाटत असे. सपाटून भूक लागावी म्हणून त्या व्यक्तीने सर्वप्रथम खाद्यपदार्थावर मिरपूड पेरली असावी आणि मग ती 'प्रथा' म्हणून अन्य लोकांनी उचलून धरली असावी अशीही शंका प्लीनीच्या मनांत येते. मिरी महाग असल्यामुळे मिऱ्यांमध्ये मिऱ्यासारख्या भासणाऱ्या ज्युनिपरच्या बियांची भेसळ करतात असा सावधानतेचा इशारा देण्यास प्लीनी विसरत नाही. अन्नपदार्थातील 'भेसळ' ही नवीन बाब नसून अनादिकाळापासून चालत आलेली प्रथा आहे; माणूस बदलला तरी मानवी स्वभावाच्या छटा त्याच राहतात हेच खरं !

रोमनांना आवडत असलेली मिरी लांबट जातीची होती. बाराव्या शतकापासून गोल काळी मिरी युरोपियनांना आवडू लागली आणि चौदाव्या शतकापर्यंत लांबट मिऱ्यांची जागा काळ्या मिऱ्यांनी घेतली. ॲरिस्टॉटल आणि प्लेटोचा शिष्य थिआफ्रेटस याने "वनस्पतींची माहिती" असा शास्त्रीय ग्रंथ संपन्न केला. युरोपमधील सर्व वनस्पतींची शास्त्रीय माहिती या ग्रंथात एकत्रित केली होती. या ग्रंथात मिऱ्याची माहिती देत असता थिओफ्रेटसने मिऱ्याच्या दोन स्वतंत्र जातींमधील फरकसुद्धा स्पष्ट केला होता. "गोल मिऱ्यांपेक्षा लांबट मिऱ्यांचा वास तीक्ष्ण झोंबणारा आणि कडवटपणाकडे झुकणारा असतो. म्हणूनच ही मिरी रोमनांना अधिक प्रिय असतात" असे थिओफ्रेटस नमूद करतो. तो म्हणतो, "विषहारक हा मिऱ्याचा सर्वात महत्त्वाचा गुणधर्म! विषाच्या दुष्परिणामांच्या निवारणासाठी मिऱ्याचा उपयोग होतो !"

इसवी सनाच्या पहिल्या शतकात डायोस्कोराइड्स्, प्लीनी आणि गॅलन या तिघांनीही आपापल्या लेखनात अनेक ठिकाणी काळी मिरी आणि पांढरी मिरी यांचे उल्लेख केले होते. त्यावरून काळ्या मिऱ्यांची विशिष्ट पद्धतीने साल काढल्यावर फिक्कट दिसणारी पांढरी मिरी मिळतात याची प्लीनी सोडून इतर तिघानाही माहीती होती असे वाटते. प्लीनीचा मात्र याबाबतीत थोडा गैरसमज होता. "शेंगा उघडण्यापूर्वी त्या तोडल्या आणि उन्हात वाळवल्या तर लांबट मिरी मिळतात पण त्या शेंगा झाडावरच जून होऊ दिल्या तर त्यातून पांढरी मिरी मिळतात. ही पांढरी मिरी उन्हात वाळवल्यावर त्यांचा रंग बदलतो व पृष्ठभाग सुरकुतलेला दिसू लागतो. या प्लीनीच्या नोंदींवरून लांबट मिरी आणि काळी मिरी ही एकच आहेत असा त्याचा समज

होता हे स्पष्ट होते ! असा गैरसमज होण्याचीही काही कारणे होती. थिओफ्रेटस, डायोस्कोराइड्स, गॅलान, प्लीनी यांनी कितीही वर्णने केली असली तरी प्रत्यक्ष मिऱ्याचे वेल किंवा झुडुपे कोणीच पाहिली नव्हती. इसवीसनाच्या सहाव्या शतकात म्हणजे जवळजवळ पाचशे वर्षानंतर धर्मप्रसाराकरता देशोदेशी हिंडणारे धर्मगुरू, प्रवासी आणि काही अरब यांनी मिऱ्याचा वेल असून तो द्राक्षाच्या वेलाप्रमाणे एखाद्या झाडावर उंचउंच वाढतो हे शोधले. ही मिरी भारतातून येतात आणि भारत देश कुठेतरी पूर्वेकडे आहे एवढेच युरोपियनांना माहीत होते. पण तो नक्की कोठे आहे हे अज्ञातच होते. त्यामुळे मिऱ्यांचा प्रवास दालचिनीप्रमाणेच झाला. अलेक्झांड्रिया हे बंदर मिऱ्याच्या व्यापाराचे प्रमुख केंद्र होते. रोमन, बिझेंटाइन आणि मुसलमान या तिन्ही साम्राज्यात मिऱ्यावर पंचवीस टक्के जकातकर लादला होता.

गरीब असो वा श्रीमंत, मिरी हा रोमनांच्या भोजनातील अत्यावश्यक घटक बनला होता. बहुतेक सर्व खाद्यपदार्थात रोमन लोक मिऱ्यांचा सढळ हाताने वापर करीत. त्यामुळे प्रत्येक रोमन कुटुंबात अधिक प्रमाणात मिरी खरेदी करणे आवश्यक होत असे. मिऱ्याच्या चढ्या किंमती गरीब, तसेच मध्यमवर्गीय रोमनांना परवडत नसत. अल्पसंख्य अति श्रीमंत व्यक्ती सोडल्या तर सामान्य जनतेला मिऱ्याच्या महागाईची झळ जाणवत असे. मिऱ्याच्या किंमतीवर नियंत्रण ठेवण्याच्या हेतूने रोमन बादशहा डायोक्लीशनने (इ. स. २८४ ते ३०५) मिऱ्याच्या किंमती निश्चित केल्या होत्या. लांबट मिरी प्रतिपौंड १५ दीनार, काळी मिरी प्रतिपौंड ४ दीनार आणि पांढरी मिरी प्रतिपौंड ७ दीनार – अर्थात रोमन लोक ज्याला पौंड किंवा लिब्रा म्हणत असत. तो इंग्लिश पौंडाच्या पाऊणपट असे – म्हणजेच सुमारे ३०० ग्रॅम असे. म्हणजे उपरिनिर्दिष्ट मिऱ्याचे भाव ३०० ग्रॅमचे होते ! हे भाव मिऱ्याच्या महागाईची साक्ष देतात !

रोमन साम्राज्याशी एकनिष्ठ असलेले मांडलिक राजे 'राजसेवाधर्म' म्हणून रोमन अधिकाऱ्यांना 'मिरी' भेट म्हणून देत असत. रोमन साम्राज्याचा ऱ्हास झाला तेव्हा परिस्थिती बरोबर उलट झाली. रोमन अधिकारी इतर श्रेष्ठ राजांना स्वामिनिष्ठेचे प्रतीक म्हणून मिऱ्यांची भेट पाठवू लागले. इसवी सनाच्या तिसऱ्या व पाचव्या शतकाच्या दरम्यान जरमॅनिक टोळ्यांनी रोमन साम्राज्यावर हल्ला केला. त्यापैकी ऑस्ट्रोगोथ या लोकांनी इटलीमध्ये तर विझीगोथ यांनी स्पेनमध्ये आपले साम्राज्य स्थापन केले. (Alaric) ॲलरीक या ऑस्ट्रोगोथ राजाने इ. स. ४०८ साली रोमवर कब्जा मिळवला आणि खंडणी म्हणून रोमन अधिकाऱ्यांकडून ५ हजार पौंड सोने, तीस हजार पौंड चांदी आणि तीन हजार पौंड मिरी घेतली होती. थिओडोसिअस (तिसरा) या बादशहाने ॲटिला या पराक्रमी राजाला कित्येक पौंड मिरी भेट म्हणून दिली होती.

इतिहासातील मिरी या पदार्थाचे हजारो पौंडाचे उल्लेख वाचल्यावर सामान्य माणसाच्या मनात प्रश्न उभा राहतो की हजारो पौंड मिरी हे लोक कशासाठी वापरीत असत? घटकाभर आपण असे धरून चाललो की राजवाड्यात होणाऱ्या प्रत्येक बारीक सारीक पदार्थात मिरपूड घालत असत आणि राजवाड्यातील मुदपाकखान्यात शेकडो माणसांसाठी पाकसिद्धी होत असेल



अनुक्रमणिका

तरीसुद्धा ॲलरिकने खंडणी म्हणून घेतलेली तीन हजार पौंड मिरी स्वयंपाकघरात वापरली जाणे अगदी अशक्य होते. खाद्यपदार्थात मसाल्याचे पदार्थ विशेषत: मिरी विशिष्ट प्रमाणात घातली तरच तो पदार्थ खाण्याजोगा होतो. पदार्थातील मसाल्याच्या पदार्थाचे प्रमाण जर आवश्यकतेपेक्षा अधिक झाले तर तो पदार्थ खाववत नाही, त्याची चव बिघडते. मिऱ्यासारखा स्वयंपाकातील महत्त्वपूर्ण आणि भरपूर प्रमाणात उपलब्ध असणारा मसाल्याचा पदार्थ आपल्या खजिन्यात भरपूर प्रमाणात आहे हे रोमन सम्राटांच्या प्रतिष्ठेचे लक्षण झाले होते. 'मिऱ्यांचा प्रचंड साठा असणे' हे त्यांच्या सामर्थ्याचे आणि पौरुषत्वाचे प्रतीक झाले होते !

मध्ययुगीन काळात युरोपमध्ये कर्जापोटी भरावयाच्या रकमेप्रीत्यर्थ किंवा जागेचे भाडे म्हणून मोठमोठ्या जमीनदारांना मिरी हा खाद्यपदार्थातील सर्वात उपयुक्त घटक देण्याची प्रथा होती. फ्रेंच भाषेमध्ये तर कोणतीही वस्तू मिऱ्यासारखी महाग आहे असे म्हणत असत. युरोपमध्ये विवाहसमारंभात दिलेल्या हुंड्यात अनेकदा मिऱ्यांचा समावेश असे. एखाद्या कैद्याच्या सुटकेसाठी किंवा एखाद्या गुन्ह्याबद्दल दंड म्हणून मिरी देत असत. बर्ट्रांड (Bertrand) आणि Rostaing de Noveo रोस्तों दि नोव्हज् या धर्मगुरूंनी विश्वासघातकी ज्यूंवर मिऱ्याच्या स्वरूपात 'ख्रिसमस कर' लादला होता. या धर्मगुरूंच्या दृष्टीने 'ख्रिश्चन श्रद्धा अमान्य करणे' हा ज्यूंचा विश्वासघात होता. ज्यू धर्मीयांना आपल्या धर्माची स्वतंत्र स्मशाने आणि शाळा चालविण्यासाठी सुद्धा ख्रिश्चन धर्मपीठांना मिऱ्याच्या स्वरूपात कर द्यावा लागत असे.

इ. स. ६७० साली तिसऱ्या क्लॉतेने, (Clotaire ) कॉर्बी येथे धर्मपीठाची स्थापना केली तेव्हा जो महसूल (रेव्हेन्यु) जमा केला त्यात ३० पौंड मिऱ्याचा समावेश होता. व्हिकॉम्ने रॉजर हा फ्रान्सचा राजा प्रजेने केलेल्या बंडात इ. स. ११०७ साली मारला गेला. तेव्हा राजाच्या मुलाने सैन्याच्या मदतीने बंडखोरांचा बंदोबस्त केला आणि असे बंड केल्याबद्दल शिक्षा म्हणून प्रत्येक कुटुंबाला प्रतिवर्षी ३ पौंड मिरी सरकारी खजिन्यात जमा करण्याची सक्ती केली. युरोपमध्ये 'मिऱ्याचा व्यापार' हा प्रमुख व्यवसाय असे. धान्याचे व्यापारी, औषधांचे व्यापारी तसे मिऱ्यांचे व्यापारी आणि त्यांच्या संघटना असत. मध्ययुगीन काळात इंग्लंडमध्ये मिऱ्यांच्या व्यापाऱ्यांच्या संघटनेमार्फत मसाल्याच्या पदार्थांचा व्यापार होत असे. अशा संघटनेची लिखित नोंद ११८० साली प्रथम आढळते.

इसवीसनाच्या चौदाव्या शतकापासून इटालियन, पोर्तुगीज, डच, इंग्लिश दर्यावर्दी भारतात व्यापारासाठी येऊन गेले. दक्षिण भारतातील मसाल्याच्या पदार्थांनी त्यांना मोहिनी घातली. इटालियन फ्रेंच आणि ग्रीक लोकांच्या स्वयंपाकात मिऱ्याला किती महत्त्वपूर्ण स्थान होते ते आपण पाहिले. पण अन्य युरोपवासीयाना या मसाल्याच्या पदार्थांची फारशी माहिती नव्हती. भारतातील उदंड मसाल्याच्या पदार्थांचा उपयोग समजल्यावर या खलाशांनी प्रचंड प्रमाणावर त्यांचा व्यापार सुरू केला त्याची माहिती आपण दालचिनीच्या इतिहासात करून घेतली आहे. दालचिनीबरोबर मिरीसुद्धा युरोपीय देशात घरोघरी पोचली आणि या मसाल्याच्या पदार्थांनी

मांसाहारी युरोपियनांच्या खाद्यपदार्थांची चव आमूलाग्र बदलली ! हेन्स शिल्टबर्गर या जर्मन सैनिकाने इ. स. १४१० च्या सुमारास भारतातील तीन प्रकारच्या मिऱ्यांची (लांबट, काळी व पांढरी मिरी) वर्णने केली होती. वास्को दि गामाने आपल्या पहिल्याच सफरीत पंधराशे टन मिरी दक्षिण भारतातून युरोपात नेल्याच्या नोंदी सापडतात. प्राचीन तामीळ लेखनातील नोंदी या नोंदीशी मिळत्याजुळत्या व दुजोरा देणाऱ्या होत्या.

मार्को पोलो जेव्हा भारतात आला तेव्हा दक्षिण भारतात विपुल प्रमाणात मिऱ्याचे उत्पादन होत असे. "द्राक्षाच्या वेलीप्रमाणे वाढणाऱ्या मिऱ्याच्या वेलीवर मिऱ्यांचे घोस येतात. मे, जून, जुलै मध्ये मिरी काढतात. मिरी हे जंगलातील उत्पादन नसून दक्षिण भारतीय शेतकरी मुद्दाम मिऱ्यांची लागवड करतात. त्या वेलींचे संगोपन करतात तेव्हाच मिऱ्यांचे उत्तम पीक येते." अशी नोंद मार्को पोलोच्या (इ. स. १२५४ ते १३२४) लिखाणात आढळते. ही मिरी उत्कृष्ट दर्जाची असत आणि युरोपीय देशात निर्यात होत असत. इ. स. १५२२ पर्यंत मिऱ्याच्या किंमती मात्र चढ्याच राहिल्या. त्यानंतर वास्को दि गामाने (१४६९ ते १५२४) केप ऑफ गुड होपला वळसा घालून भारताला पोचण्याचा सागरी मार्ग शोधला आणि पोर्तुगीज मिऱ्याच्या व्यापाराच्या स्पर्धेत उतरले. व्हेनिसमधील व्यापारी या स्पर्धेत टिकाव धरू शकले नाहीत. कारण पोर्तुगीज व्यापाऱ्यांनी मिऱ्याच्या व्यापारात आपले वर्चस्व प्रस्थापित करण्यासाठी रोमन व्यापाऱ्यांपेक्षा मिऱ्याच्या किंमती कमी ठेवल्या. मिरी पिकवणाऱ्या बऱ्याचशा प्रदेशांचा कब्जा त्यांनी मिळवला. चिनी लोकांशीसुद्धा पोर्तुगीज व्यापारी सलोख्याचे संबंध ठेवीत. लिस्बनमधील पोर्तुगीज व्यापारी खरे दर्यावर्दी होते. हा प्रदीर्घ सागरी प्रवास करण्याची चिकाटी व शारीरिक आणि मानसिक क्षमता त्यांच्यात पुरेपूर होती.

सतराव्या शतकापासून डच व्यापारीसुद्धा या स्पर्धेत सामील झाले. बेल्जियममधील अँटवर्प हे (Antwerp) हे व्यापाराचे प्रमुख केंद्र झाले होते. वास्को दि गामाने शोधलेल्या समुद्रमार्गे डच व्यापारी अँटवर्पहून सरळ भारतात येत आणि भारतातील मसाल्याचे पदार्थ उत्तर युरोपीय देशांना पुरवीत. मिऱ्याचा व्यापार त्यानंतर प्रामुख्याने डच लोकांच्या हाती गेला. युरोपियनांप्रमाणे चिनीसुद्धा स्वयंपाकात मिऱ्याचा अधिक प्रमाणात वापर करीत असत. जावाच्या किनाऱ्यावरील 'बेंटम' हे बंदर मिऱ्याच्या जागतिक व्यापाराचे केंद्र झाले होते. तेथे चिनी व्यापारी मोठ्या संख्येने उपस्थित राहात. सुंदा बेटे म्हणजे समुद्रातील मॅलो बेटांचा समूह. याचे दोन प्रकार असून मोठी (Greater) सुंदा बेटे म्हणजे सुमात्रा, जावा, बोर्निओ, सुलावेसी हे देश तर छोट्या (Lesser) सुंदा बेटात बाली. सुम्बावा, फ्लोअर्स, सुम्बा आणि टिमूर यांचा समावेश होतो. या सुंदा बेटातून उत्कृष्ट दर्जाची मिरी 'बॅटम' बंदरात येत असत. बँटमची मिऱ्याची बाजारपेठ हळूहळू चिनी व्यापाऱ्यांनी काबीज केली. मिऱ्याचे भाव ठरविणे, ते कमी जास्त करणे, बंदरात 'माल' ठराविक प्रमाणातच उतरविणे हे व्यापारांतील डावपेच खेळण्यात चिनी व्यापारी तरबेज असत. मिऱ्याच्या उत्पादकांना फसवून 'मिऱ्याच्या व्यापाराचे अडते' म्हणून चिनी व्यापारी स्वत:चीच नेमणूक करून घेत. या

अडत्यांच्या दलालीचे दरही प्रचंड असत. त्यामुळे डच आणि पोर्तुगीज व्यापाऱ्यांना बॅटमच्या बंदरात जहाज घेऊन आल्यावर या चिनी अडत्यांमार्फत मिऱ्यांची खरेदी करावी लागत असे. सध्याच्या माफिया टोळीचाच हा प्राचीन प्रकार होता. व्यापारांतील या वाईट पद्धती टाळण्यासाठी फ्रेंचांनी हिंदी महासागरातील बोरबॉन आणि मॉरिशस या आपल्या मालकीच्या बेटांवर मिऱ्याची लागवड केली. तसेच वेस्ट इंडीज आणि गिआना येथेसुद्धा मिऱ्याची लागवड केली होती. परंतु ती तितकीशी यशस्वी झाली नाही. अमेरिका आणि आफ्रिका या दोन्ही खंडातील जमीन आणि हवामान मिऱ्याच्या पिकाला पोषक नसल्यामुळे तेथे मिऱ्याचे उत्पादन होत नाही.

गिआना मिरी ही मिऱ्याची एक वेगळीच जात ! गुलामांचा व अन्य पदार्थांचा व्यापार करण्याच्या निमित्ताने आफ्रिकेच्या पश्चिम किनाऱ्यावर युरोपियन व्यापाऱ्यांची वर्दळ वाढली आणि पूर्वेकडून येणाऱ्या काळ्या मिऱ्यांना एक प्रतिस्पर्धी निर्माण झाला. गिआना मिरी युरोपियनांच्या भोजनाच्या टेबलावर दिसू लागली. युरोपीय लोक काळ्या मिऱ्यांऐवजी स्वादा–करता तऱ्हतऱ्हेच्या पदार्थांत गिआना मिरी वापरू लागले. प्लीनीने या गिआना मिऱ्यांचा उल्लेख 'आफ्रिकन मिरी' असा केला होता. कोणा रसिक व्यापाऱ्याच्या सुपीक डोक्यातून या गिआना मिऱ्यासाठी 'स्वर्गाचे धान्य' असे आकर्षक नाव निघाले ते माहीत नाही. परंतु या नावाची मोहिनी युरोपियनांना पडली असावी. तेराव्या शतकात व पुन्हा एकदा सोळाव्या शतकात हे स्वर्गाचे धान्य प्रसिद्धीच्या शिखरावर पोचले. 'मेनॅजिअर दि पॅरिस' या ग्रंथात शिळी. वास येत असलेली वाईन सुधारण्यासाठी त्यांत गिआना मिऱ्याची पूड घालावी असा उपाय सांगितला होता. काळ्या मिऱ्यापेक्षा ही मिरी कमी झणझणीत असत व त्याचा स्वादही सौम्य असे. तरीसुद्धा हे 'स्वर्गाचे धान्य' गिआनाच्या सामुद्रधुनीतून उत्तर आफ्रिकेत येत असे व तेथून ते सिसिली आणि इटलीमध्ये नेत असत. प्रबोधनकाळानंतर व सतराव्या शतकात या मिऱ्यांच्या प्रसिद्धीला ओहोटी लागली. अठराव्या शतकात पुन्हा एकदा या मिऱ्यांचा वापर काही काळापुरता युरोपियन लोक करू लागले. परंतु एकंदरीत गिआना मिऱ्यांचे महत्त्व कमी झाले होते. दुसऱ्या महायुद्धात जेव्हा पूर्वेकडील प्रदेशातून मिरी आयात करता येत नव्हती तेव्हा फ्रेंचांनी पश्चिम आफ्रिकेतून गिआना मिरीच मोठ्या प्रमाणावर आयात केली होती. युद्ध चालू असताना याच गिआना मिऱ्यांच्या स्वादावर फ्रेंच सैनिक व नागरिक खाद्यपदार्थांचा आस्वाद घेत असत.

आफ्रिकन लोकांना गिआना मिरी अजूनसुद्धा आवडतात. Fiery 'झणझणीत सूप' हा गिआनामधील रहिवाशांचा लोकप्रिय व राष्ट्रीय पदार्थ ! कोणत्याही प्राण्यांचे मांस, मासे, कोंबडीचे मांस किंवा भाज्या – कशापासूनही हे सूप बनवता येते. या सुपाला तिखटपणा आणण्यासाठी आता मिरच्या वापरत असले तरी अमेरिकन मिरच्यांची ओळख होईपर्यंत गिआनामधील रहिवाशी हा राष्ट्रीय पदार्थ गिआना मिरपुडीने स्वादिष्ट करीत असत. गॅम्बिया ते लागॉस या प्रांतात कुठेही मिळणारे हेच ते प्रसिद्ध 'पेपे' सूप !

भारत, इंडोनेशिया, मलेशिया, श्रीलंका हे मिऱ्याची लागवड करणारे प्रमुख देश असले

तरी मिऱ्याच्या उत्पादनात भारताचा प्रथम क्रमांक आहे. केरळ, कर्नाटक, तामिळनाडू यात सर्वाधिक उत्पादन होत असून आसाम, प. बंगाल, ओरिसा, अंदमान निकोबार बेटे आणि महाराष्ट्राच्या कोकणपट्टीत (सिंधुदुर्ग, रत्नागिरी, रायगड जिल्ह्यांत) मिऱ्याची लागवड करण्याचे प्रयत्न चालू आहेत. केरळमध्ये बहुतेक सर्व जिल्ह्यात मिऱ्याची लागवड होत असली तरी सुमारे ४४ टक्के उत्पादन एकट्या कननोर जिल्ह्यात होते. कर्नाटकात उत्तर व दक्षिण कारवार आणि तामिळनाडूत निलगिरी आणि कन्याकुमारी हे जिल्हे मिऱ्याच्या उत्पादनात अग्रेसर आहेत.

मिऱ्याच्या निर्यातीपासून भारताला मसाल्याच्या पदार्थांपैकी सर्वात जास्त परकीय चलन मिळते. मसाल्याच्या पदार्थांच्या निर्यातीपासून मिळणाऱ्या एकूण उत्पन्नापैकी सुमारे ५० टक्के उत्पन्न मिऱ्याच्या निर्यातीपासून मिळते. भारतातून होणाऱ्या मिऱ्याच्या निर्यातीसंबंधी सल्ला देण्याचे व देखरेख करण्याचे कार्य कोचीन येथील स्पाइसेस एक्सपोर्ट प्रमोशन कौन्सिल ही संस्था करते.

भारतात मिऱ्यासंबंधी अनेक ठिकाणी संशोधन होते. केरळ राज्यातील कासरगोड येथील सेंट्रल प्लँटेशन क्रॉप रिसर्च इन्स्टीट्यूट, कननोर जिल्ह्यात पण्णिआर येथील मिरे संशोधन केंद्र आणि म्हैसूर येथील सेंट्रल फूड टेक्नॉलॉजिकल रिसर्च इन्स्टीट्यूट ही संशोधनाची प्रमुख केंद्रे आहेत. मिऱ्यामध्ये पायपरीन नावाचे अल्कलॉईड, बाष्पनशील (बाष्परूपाने उडून जाणारे) तेल व झणझणीत ओलिओरेझिन हे महत्त्वाचे घटक असतात. मिऱ्यातील बाष्पनशील तेलाचा उपयोग काही पेये व मद्ये यात स्वादकारक घटक म्हणून करतात. तसेच सुगंधी द्रव्ये, साबण व औषधे यांतही त्याचा समावेश करण्यात येतो.

## आले (जिंजर)

झिंजिबरेशिअे Zingiberaceae वनस्पतीशास्त्रीय कुटुंबातील या वनस्पतीचे शास्त्रीय नाव आहे 'झिंजिबर ऑफिसिनेल. (Zingiber officinale.) जेमतेम १ मीटर उंचीच्या या ठेंगण्या ठुसक्या बहुवार्षिक झाडाची पाने प्रशस्त, लांबट व टोकाशी निमुळती होणारी. जमिनीखाली असणाऱ्या 'रायझोम' या मांसल खोडापासून ही पाने फुटतात. झाडाची पाने म्हणजे त्या झाडाचे स्वयंपाकघर आणि आल्याच्या या स्वयंपाकघरात होणारी पाकसिद्धीही आगळीवेगळी ! विशिष्ट उग्र वासाचा तिखट रस ही पाने तयार करतात आणि जमिनीखाली आडव्या वाढणाऱ्या खोडात् तो साठवतात. फिक्कट चॉकलेटी रंगाचे बाह्यावरण असलेले हे खोड म्हणजेच आपले 'आले'. या झाडाला येणारा फुलोरा फारच आकर्षक ! मऊ जाड पिवळ्या पाकळ्यांना लालचुटुक कडा-निसर्गाने साधलेली ही हळदीकुंकवाची रंगसंगती मनाला मोहिनी घालणारी. काही जातीच्या आल्याच्या फुलोऱ्यात वेगळेच रंगांचे मिश्रण आढळते. सुंदर जांभळ्या पाकळ्यांवर पिवळे छोटे छोटे ठिपके. कीटकांना आकर्षून घेण्यासाठी निसर्गाने केलेल्या या योजना स्तिमित करणाऱ्या आणि परिणामकारक.

दक्षिण भारत हे आल्याचे जन्मस्थान. पाँडेचरीजवळील 'जिंजी' या गावी आले विपुल प्रमाणात आढळले. प्राचीन भारतातील विद्वानांची ज्ञानग्रहणाची भाषा संस्कृत. आल्याचे खोड हे काहीसे प्राण्यांच्या शिंगासारखे भासते म्हणून संस्कृत विद्वानांनी त्याचे नामकरण केले 'शृंगवेरम्' (शिंगासारखे दिसणारे). पर्शियन भाषेत त्याचे रूपांतर झाले झुंगेबीर (dzumebir) तर ग्रीकांनी त्याचे नाव ठेवले झिगिब्रिस (dziggibris) लॅटिन ही प्राचीन युरोपातील विद्वानांची भाषा. लॅटिनमध्ये आल्याने झिंजिबर Zingiber या नावाने प्रवेश केला. बाराव्या शतकात फ्रेंचानी 'जिंजिब्रर' gingiibre या नावाने आल्याला आपल्यात सामावून घेतले. पुढे चौदाव्या शतकात फ्रेंचांनी त्याचे नाव जिंजाम्ब्र gingembre असे बदलले. इटालियन आल्याला gengiovo जेंजिव्हो किंवा zinzebro झिंझेब्रो म्हणत असत. इंग्रजीमध्येसुद्धा प्रारंभी Gingiber जिंजिबर या नावाने संबोधलेले आले पुढे ginger 'जिंजर' या सोप्या सुटसुटीत नावाने ओळखले जाऊ लागले. जर्मन भाषेतील इंगेवर ingewer, इंगेबी ingeber या प्राचीन नावाचे ingwer इंग्वर असे आधुनिकीकरण झाले. सर्व युरोपियन भाषांतील आल्याची नावे 'जिंजर' या नावाशी साम्य असलेली आणि त्याच्या जन्मस्थानाची स्मृती कायम ठेवणारी भासतात. मराठीत 'आले' हे नाव कसे आले ते माहीत नाही. पण संस्कृतमध्ये आर्द्रक, हिंदीत अदरख, बंगालीत आदा, गुजराथीत आदु ही नावे आल्याच्या जवळची वाटतात एवढे मात्र खरे !

जगाच्या इतिहासात अनेक राजे होऊन गेले. परंतु ज्यांनी आपल्याला लाभलेल्या सुसंधीचा लाभ घेऊन रयतेच्या उद्धाराकरता व राज्याच्या विकासोकरता उल्लेखनीय कामगिरी केली त्याची आठवण हजारो वर्षानंतरसुद्धा इतिहासकार ठेवतात. पर्शियाचा सुप्रसिद्ध बादशहा 'पहिला डेरिअस' हा अशाच सम्राटांपैकी एक होता. (इ. स. पूर्व ५५० ते ४८६) दळणवळण सुधारण्यासाठी रस्ते बांधून व्यापाऱ्यांचे एक खास पथक त्याने भारतात पाठवले. याच व्यापाऱ्यांनी मायदेशी परतताना भारतातून आले व मसाल्याचे पदार्थ पर्शियात नेले. भारतीय लोक आल्याचा वापर विविध पदार्थात किती सढळ हाताने करतात हे या पर्शियन व्यापाऱ्यांनी पाहिले होते. परंतु त्या काळातील पर्शियन तसेच ग्रीक आणि रोमन लोकांनासुद्धा आले मर्यादित स्वरुपातच भावले असावे असे ऐतिहासिक नोंदीवरून दिसून येते.

युरोपियनांना इसवीसनाच्या पहिल्या शतकापासून आले माहीत होते. अेपिशिअस या इसवीसनाच्या पहिल्या शतकातील आहारतज्ज्ञाने आपल्या पाकशास्त्रातील पुस्तकात आल्याचा उल्लेख क्वचितच केला होता. "मिऱ्याच्या झाडाचेच आले हे मूळ आहे" अशी डायोस्कोराइड्स आणि गॅलन यांची गैरसमजूत होती. गोल मिरी आणि लांबट मिरी याबद्दलचे प्लीनीचे ज्ञान कसे विपरीत होते हे आपण मिऱ्याच्या विवेचनात पाहिले. प्लीनीची आल्याबद्दलची शास्त्रीय माहिती बरीचशी बरोबर होती. परंतु त्यात तो पुढे म्हणतो, "आले हे पांढरी मुळे असलेले, लवकर कुजणारे छोटेसे झुडुप असते." इथे जमिनीखाली असल्यामुळे प्लीनी आल्याला मूळ म्हणतो. वास्तविक आले म्हणजे जमिनीखालील अन्नसंचयी खोड असते हे आपणा सर्वांना

ज्ञात आहे. प्लीनीने आल्याचे झाड वाढविण्याचा प्रयत्न केला असावा असे वाटते. आल्याचा भाव प्रतिपौंड ६ दीनार (जवळजवळ ३०० ग्रॅमला २० डॉलर) होता असेही प्लीनीने नमूद केले होते. प्लीनी हा शेतकीतज्ज्ञ आणि द्रष्टा होता. फळे, भाज्या, खाद्यपदार्थ याविषयी इसवीसनाच्या पहिल्या शतकात त्याने केलेल्या नोंदीवरून आज दोन हजार वर्षानंतर आपल्याला त्याकाळातील युरोपची इत्यंभूत माहिती मिळते. ट्रॉग्लोडाइटस् Troglodytes या डोंगराळ भागातून आले युरोपमध्ये येत असे,असे प्लीनीने लिहिले आहे. ट्रॉग्लोडाइटस् हा प्रदेश इजिप्तमध्ये असावा असे संशोधकांना वाटते. इजिप्तमधील अलेक्झांड्रिया बंदर हे मसाल्याच्या पदार्थांची मोठी बाजारपेठ होती हे आपण दालचिनी मिऱ्याच्या इतिहासात पाहिलेच आहे. भारतातील आले अलेक्झांड्रियामार्गे युरोपमध्ये जात असावे या विधानाला प्लीनीच्या नोंदींमुळे दुजोरा मिळतो.

ब्रूनो लॉरिअक्स Bruno Laurioux या आधुनिक काळातील विद्वानाने "मध्ययुगीन स्वयंपाकशास्त्राला अगदी आगळेवेगळे नवे स्वरूप देणारा पदार्थ" या शब्दात आल्याचा गौरव केला आहे. स्वयंपाकशास्त्रात उत्तम गती असणाऱ्या तज्ज्ञांनी आपल्या कल्पकतेने अनेक खाद्यपदार्थांत आल्याचा वेगवेगळ्या स्वरूपात वापर केला. कधी जमिनीखालच्या कोवळ्या खोडाला त्याच्या नैसर्गिक अवस्थेत वापरले तर कधी त्याचे बारीक तुकडे केले. कधी किसले तर कधी वाटले. कधी कधी तर चक्क वाळवलेल्या आल्याचा पावडरीच्या (सुंठ) स्वरूपात ते पाककृतीत समाविष्ट केले. मध्ययुगीन कालखंडात 'आलं' हा मसाल्याचा पदार्थ प्रसिद्धीच्या शिखरावर होता. त्याचे अनेक औषधी उपयोग लोकांना माहीत होते. आयुर्वेदात आल्याचे पाचक, सारक, अग्निदीपक, रुचिप्रद असे अनेक गुणधर्म सांगितले आहेत. आले कफ, सर्दी, खोकला, दमा, वांति, उदारवायू, शूक (तीव्र वेदना) अशा अनेक विकारांवरील गुणकारी औषध मानले गेले आहे. आलेपाक आणि सुंठ साखर या स्वरूपात प्राचीन काळापासून लोक आल्याचा औषधासारखा उपयोग करीत असत. इंग्रजीमध्ये 'ऑफिसिनॅल' हे विशेषण असून त्वरित उपयोगात आणण्यासाठी तयार ठेवलेले औषध या अर्थाने वापरतात. आल्याच्या 'झिंजीबर ऑफिसिनॅल' या वनस्पतीशास्त्रीय नावातच त्याच्या औषधी गुणधर्मांचा अंतर्भाव आहे. 'नावात काय आहे' असे नसून "नावातच सर्व काही आहे" असे म्हणणे आल्याच्या दृष्टीने योग्य ठरेल!

बिझँटिअम Byzantium हे प्राचीन ग्रीक शहर इसवीसनापूर्वीच्या सातव्या शतकात वसवले होते. इ. स. ३२४ ते ३० या काळात कॉन्स्टंटीन यांनी ते पुन्हा वसवले म्हणून तेव्हापासून या शहराचे नाव कॉन्स्टंटिनोपोल असे झाले. हेच आधुनिक युगातील इस्तंबूल ! बिझँटिअमचा राजा आणि पहिला थेरी Thierry हा फ्रँकिश राजा हे मित्र. आपल्या प्रकृतीची काळजी घेण्यासाठी उत्तम राजवैद्य हवा असे थेरीला वाटत होते. त्याने आपल्या मित्राला सल्ला विचारला आणि उत्तम ग्रीक डॉक्टरचे नाव सुचविण्यास सांगितले. बिझँटिअमच्या राजाने 'अँथिमस' या ग्रीक

डॉक्टरची आपल्या मित्राकरता शिफारस केली. उत्तम चौरस आहार आणि खाद्यपदार्थांवरील नियंत्रण या दोन सूत्रांचा उपयोग करून हे डॉक्टर महाशय आपल्या रुग्णांची प्रकृती उत्तम राखण्याचा प्रयत्न करीत. आपल्या रुग्णांनी उत्तम आहार घ्यावा याचा साधा सोपा मार्ग म्हणजे "क्षुधावर्धक खाद्यपदार्थ रुग्णांना देणे" असे अँथिमसचे मत होते. त्याने अशा भूक वाढवणाऱ्या खाद्यपदार्थांचे एक खास पुस्तकच लिहिले. त्या पुस्तकाचे नाव होते. "दि ऑब्झर्वेटर सायबोरम" De observator ciborum. एखाद्या डॉक्टरने पाककृतीचे पुस्तक लिहावे हा दुर्मिळ योग ग्रीक इतिहासात आढळतो. आल्याच्या पाचक आणि वायुनाशक गुणधर्मामुळे अँथिमसने पुस्तकात लिहिलेल्या प्रत्येक पाककृतीत आल्याचा अवश्य समावेश केला होता. म्हणजे औषध म्हणून वापरात असलेल्या आल्याने आहारशास्त्राच्या राजमार्गावरून नेहमीच्या युरोपीय खाद्यपदार्थात प्रवेश मिळवला. मध्ययुगीन युरोपीय पाककृतीत याचे पडसाद उमटलेले दिसतात.

आपण सॅलर्नो विद्यापीठाची माहिती करून घेतली आहे. सॅलर्नो हे इटलीच्या पश्चिम किनाऱ्यावरील बंदर असून प्राचीन काळापासून तेथे वैद्यकीय महाविद्यालय होते. सर्व युरोपीय देशातील विद्यार्थी वैद्यकीय शिक्षण घेण्याकरता या प्रसिद्ध विद्यापीठात येत असत. ग्रीक, रोमन, ज्यू आणि अरब अशा चार निष्णात डॉक्टरांनी सॅलर्नो वैद्यकीय महाविद्यालयात "औषधशास्त्र" विभागांची स्थापना केली. अँथिमस या ग्रीक डॉक्टरची विचारधारा या डॉक्टरांनी पुढे चालवली. त्यांनी आरोग्यशास्त्र आणि आहारशास्त्राचे नियम उत्कृष्ट लॅटिन काव्यात गुंफले. या काव्याचे नाव होते "रेजिमेन सॅनिटॅरिस सॅलर्नो," "आल्यामुळे तहान भागते, मेंदूला तरतरी येते आणि वृद्धत्वीसुद्धा ऐन तारुण्यातील प्रेम जागृत होते" अशा अर्थाची आल्यावरील स्तुतीपर कवने यात होती. 'आले' हे कामोत्तेजक आहे अशी युरोपियनांची श्रद्धा होती. या महत्त्वाच्या गुणधर्मामुळे युरोपीय पाककृतीत आल्याला "अढळस्थान" मिळाले. मध्ययुगीन युरोपीय पाककृतीतील बहुतेक सर्व पदार्थात आलं हे असायचेच असा अलिखित नियम झाला होता !

आल्याचे मूळ स्थान दक्षिण भारतात असले तरी किती वर्षापूर्वीपासून आले. भारतीयांना माहीत होते हे पाहणे आवश्यक ठरते. भारतात इ.स.पूर्व ३२०० च्या सुमारास सिंधु नदीकाठची प्रगत संस्कृती उदयास आली. या संस्कृतीचा अम्मल सुमारे एक हजार वर्षेपर्यंत राहिला. सुमारे २ ते ५ शतकांनंतर मोहेंजोदडो आणि हडाप्पा येथे प्रगत संस्कृती उदयास आली. यानंतर म्हणजे इ.स.पूर्व एक हजार सालच्या सुमारास आर्यांचा सांस्कृतिक काळ सुरू झाला. मसाल्याच्या पदार्थांचा विशेषत: आल्याचा उल्लेख आर्यांच्या काळापासून सुरू होतो. आर्य लोक उत्तम शेती करीत तसेच फळे व भाज्या पिकवीत. त्याचबरोबर हळद, मेथी (fenugreek) आले आणि लसूण हे चार मसाल्याचे पदार्थ आतल्या शेतात पिकवीत. दक्षिण भारतातील मिरी, दालचिनी आणि अफगाणिस्तानातून आलेला हिंग हे पदार्थ आर्य वापरीत असत. ऋग्वेदात कमळाचे देठ, काकडी, शिंगाडे, कारली अशा भाज्यांचे तर वैदिक काळाच्या उत्तरार्धातील वाङ्मयात औदुंबर जांब इत्यादी फळांचे उल्लेख आढळतात. त्याबरोबर जड जेवण झाल्यावर आर्य मुद्दाम आलं

आणि मुळा चावून खात असत असा उल्लेख आढळतो. म्हणजे आलं आणि मुळा यांचे 'पाचक' गुणधर्म आर्यांना माहीत होते. अथर्ववेदात आल्याचा उल्लेख 'आडारा' असा केलेला आढळतो. चोखंदळ आर्यांना लीक हा कांद्यासारखा उग्र वासाचा कंद, लसूण आणि कांदा हे तिन्ही पदार्थ वर्ज्य होते. काही धार्मिक प्रवृत्तीचे व पंथाचे तसेच जैन धर्माचे लोक एकविसाव्या शतकातसुद्धा हे पदार्थ खात नाहीत त्याची पाळेमुळे इतकी खोलवर गेलेली आढळतात.

जैन धर्माचे एकूण बत्तीस प्रमुख तीर्थंकर (संत) होऊन गेले. त्यापैकी गौतम बुद्धाचे समकालीन चोविसावे तीर्थंकर भगवान महावीर हे सर्वश्रेष्ठ समजले जातात. 'अहिंसा परमो धर्म" हे जैन धर्माचे प्रमुख सूत्र. या सूत्राचे आपल्या अनुयायांकडून पालन व्हावे म्हणून तीर्थंकरानी अनेक पदार्थ खाण्यास त्याना मज्जाव केला होता. साहजिकच 'आले' हा मसाल्याचा पदार्थ जैन धर्मीयांनी वर्ज्य ठरविला होता. बौद्ध धर्मीय मात्र आलं, जिरं, व्हिनेगार यासारखे पदार्थ अवश्य वापरत असत.

धर्मग्रंथ हे मानवाला नेहमीच आदरणीय आणि प्रिय असतात. बहुसंख्य लोक धर्मग्रंथातील विधानावर आक्षेप घेत नाहीत. धर्मग्रंथात प्रकट केलेले विचार बहुतांश लोकांना प्रमाणभूत असतात 'कुराण' हा असाच एक धर्मग्रंथ. सर्व मुसलमान धर्मीयांच्या श्रद्धा कुराणवाङ्मयाशी निगडित झालेल्या असतात. कुराणातील प्रत्येक शब्द म्हणजे परमेश्वरी आज्ञा! कुराणात कापूर, आलं, कस्तुरी आणि बेदाणे या चार खाद्यपदार्थांचा खास उल्लेख आहे. म्हणजे जैन धर्मीयांनी त्याज्य ठरविलेल्या आल्यासारख्या पदार्थांची कुराणात खास शिफारस केलेली आढळते. साहजिकच मुसलमानांच्या अनेक खाद्यपदार्थांत विशेषत: सामिष भोजनात 'आले' असतेच! 'स्वर्ग' ही संकल्पना कुराणातही मान्यता पावलेली आढळते. "काही सद्‌गुणी व्यक्ती मृत्यूनंतर स्वर्गात जातात व तेथे देहधारी व्यक्तींप्रमाणे पंचज्ञानेंद्रियांनी मिळणारी सर्व सुखे उपभोगतात. अशा व्यक्तींना सन्मानित करण्यसाठी हुअरीज (स्वर्गातील अप्सरा) चांदीची सुरई आणि सेल्सबिल येथील झऱ्याचे आल्याच्या स्वादाचे पाणी घेऊन येतील. तसेच चिरतारुण्याचे वरदान मिळालेले तरुण अशा व्यक्तींची सेवा करतात." असे कुराणातील सुरामध्ये लिहिलेले असून 'मृत्यूनंतर यापेक्षा अधिक कोणत्या सन्मानाची मानव अपेक्षा करेल?" असा सवाल त्यात केला आहे. यावरून मुसलमान धर्मात आल्याचे महत्त्व किती आहे हे वाचकांच्या सहज लक्षात येईल.

फार प्राचीन काळी आले आफ्रिकेच्या पश्चिम किनाऱ्यावर पोचलेले आढळते. 'पाली' हा पश्चिम आफ्रिकेतील प्रदेश अल्जेरियाच्या दक्षिणेकडे आहे. इ स १९५९ पर्यंत फ्रेंचाच्या ताब्यात असलेला हा प्रदेश 'फ्रेंच सुदान' या नावाने ओळखला जाई. या प्रदेशात राहणारे मूक आफ्रिकन आदिवासी लोक आमोंडजी Amondji या नावाने मस्त आल्याचा चहा पीत असत. मॉसी या जमातीचे लोक या आल्याच्या चहात तिखट व मिरपूड घालीत आणि त्याला एम्बुगी embourgui असे म्हणत. बुले Baoule ही आफ्रिकेतील अशीच एक जमात. संतति नियमनाची

संकल्पना यांच्या वाऱ्यालाही शिवत नाही. अनेक मुलांचे पितृत्व संपादल्यावर म्हातारपणीसुद्धा आपले पौरुषत्त्व टिकावे आणि आपल्याला उत्तम आयुरारोग्य लाभावे यासाठी हे पुरुष जागरूक असतात. लोमो रूडजी loumon roudji हे आल्याचे पेय त्यांचे अत्यंत आवडते ! या पेयामुळेच आपली प्रकृती उत्तम राहाते अशी बुले जमातीतील पुरुषांची श्रद्धा होती.

पोर्तुगाल आणि स्पेन हे ''सख्खे शेजारी'. स्पेनच्या मानाने पोर्तुगालचा आकार अगदी लहान पण पोर्तुगीज लोक मात्र धाडसी, उद्योगी, प्रयोगशील आणि कल्पक. आशिया खंडातील कित्येक भाज्या आणि फळे युरोपात नेण्याचे श्रेय पोर्तुगीजांचे ! याच पोर्तुगीज व्यापाऱ्यांनी आले आफ्रिकेच्या पश्चिम किनारपट्टीवर आणले आणि तेथील प्रदेशात रुजवले. येथील जमीन, हवा, पाणी आल्याला मानवले आणि आल्याचे उत्तम पीक या प्रदेशात येऊ लागले. लवकरच पश्चिम आफ्रिकेतील सिअेरा लिआँन Sierra Leone आणि गिनि Guine या बंदरातून आल्याची निर्यात होत असे. पोर्तुगीज लोक आफ्रिकेत गुलामांचा व्यापार करीत असत. तसेच पोर्तुगीजांना 'आले' हे वीर्यवर्धनाचे प्रतीक वाटत असे. गुलामांच्या संख्येत वाढ व्हावी, म्हणजेच गुलामांची पुनरुत्पत्ती भरपूर प्रमाणात व्हावी या स्वार्थी हेतूने पोर्तुगीजानी या रानटी जमातीत आल्याचा प्रचार व प्रसार केला. पोर्तुगीजांनी अमलात आणलेला हा उपाय फार भयंकर आणि स्वार्थीपणाचे किळसवाणे दर्शन घडवणारा होता.

१५ मे हा जपानी लोकांचा बालदिन. हाच दिवस जपानी लोक ''पौरुषत्त्व दिन'' म्हणूनही साजरा करतात. आपले पौरुषत्व टिकविण्यासाठी जी पारंपारिक पाककृती जपानी लोक या दिवशी करतात त्यात आल्याचा भरपूर प्रमाणात वापर केलेला असतो. आफ्रिकेप्रमाणे जपानमध्येसुद्धा आले हे वीर्यवर्धनाचे प्रतीक मानले जात होते हा विलक्षण योगायोग !

नॉस्ट्राडॅमस Nostraadamus (इ. स. १५०३ ते ६६) हा फ्रेंच भविष्यवेत्ता आणि डॉक्टर. त्याने केलेली भविष्यवाणी ही विसाव्या शतकातील वादविवादाचा विषय असे. त्यामुळे वाचकांचा या फ्रेंच भविष्यवेत्त्याशी परिचय असेलच. फ्रान्सचा बादशहा नववा (९वा) चार्लस् याचा वैयक्तिक डॉक्टर म्हणून फ्रेंच दरबारी नॉस्ट्राडॅमची नेमणूक झाली होती. त्याने खाद्यपदार्थाविषयी काही नोंदी केल्या आहेत. आल्याची तरफदारी करताना तो म्हणतो, ''उत्तम दर्जाच्या हिप्पोक्रेस वाइन्स बनविण्यासाठी आल्याचे पाणी वापरतात. हे मद्य तुम्ही घेतलेत तर तुमच्या चित्तवृत्ती उल्हसित होतील. त्याचे श्रेय त्यातील आल्यालाच द्यायला हवे. त्या मद्यात स्वादाकरता थोडी दालचिनीची पूड टाकलीत तर त्या मद्याची लज्जत आणखीच वाढेल.'' मध्ययुगीन युरोपीय पाकशास्त्रात विशेषत: फ्रान्समध्ये अनेक खाद्यपदार्थात आले आणि दालचिनी एकत्रितपणे वापरण्याची प्रथा होती.

इ. स. १५५३ च्या सुमारास युरोपमध्ये आल्याच्या किंमती चढ्या होत्या. त्यामुळे नॉस्ट्राडॅमने आल्याला पर्यायी पदार्थ सुचवला होता. समुद्रकिनाऱ्यावरील वाळूच्या ढिगाऱ्यावर 'अेरिंजिअम' Eryngium नावाची सदाहरित झुडुपे येतात. या झुडुपांची पाने गडद हिरवी, फुले पांढरी

असतात तर फळे मात्र बोरासारखी लालचुटुक आणि छोटी ! या झुडुपांची मुळे कोवळ्या आल्यासारखी दिसतात आणि त्यांना आल्यासारखा मंद वास येतो. या झुडुपाची मुळे आणि आले एकत्र वाटले तर आल्याचा स्वाद या मुळांना लागतो. "असे मिश्रण पदार्थात वापरल्यास आल्याचा स्वाद तर येईलच परंतु गरीब युरोपीय जनतेचे महागड्या आल्यामुळे दिवाळे निघणार नाही" अशी सूचना नॉस्ट्राडॅमने आपल्या लेखनात केली होती. अर्थात् हे मिश्रण नुसत्या आल्यासारखे तिखट व तीव्र स्वादयुक्त होत नाही. त्यामुळे नॉस्ट्राडॅमने सुचविल्याप्रमाणे युरोपीय जगतात आल्याचा पर्यायी पदार्थ म्हणून ॲरिंगोची मुळे तितकीशी रुचली नाहीत. मध्ययुगीन युरोपीय लोक खर्चिक होते. परंतु नॉस्ट्राडॅमच्या काळात म्हणजे सोळाव्या शतकाच्या उत्तरार्धात या बेसुमार खर्चाला आळा घालण्याकडे लोकांचा कल होता. मसाल्याच्या पदार्थांना हुसकावून लावून साखरेने स्वयंपाकघरात प्रवेश केला होता.

वाळवलेले आले म्हणजे सुंठ. हे आपल्याला सर्वांनाच माहीत आहे. इंग्रजीमध्ये त्याला मॅक्वीन Macquin असे म्हणतात. इ. स. १३९२ साली लिहिलेल्या मेनॅजिअर-डी-पॅरिस Menagier-de-Paris या ग्रंथात वाळलेल्या आल्याला मेश Mesche म्हणतात असा उल्लेख आढळतो. आल्याच्या विविध जातींची दखलही आपल्याला घेतलेली आढळते. "जे मेश बाहेरून फिक्कट चॉकलेटी रंगाचे, आतून पांढरे, सुरीने सहजगत्या तुकडे होतील असे ठिसूळ असेल ते उत्तम प्रतीचे व महाग असते" असे विश्लेषण या ग्रंथात केले होते. नॉस्ट्राडॅमच्या नोंदीनुसार मॅक्वीन मक्केहून येत असे. वास्तविक मक्केमध्ये आले निर्माण होत नसे. अरब व्यापारी दक्षिण भारत आणि मलेशिया येथून आले आणीत असत आणि वाळवून सुंठ करून टिकाऊ स्वरूपात ते युरोपियनांना विकत असत.

साखर घालून आले टिकवण्याची युक्तीसुद्धा अरबांना समजली होती. अशा आलेपाकाला अरब जिंजेम्ब्रॅट Gingembrat म्हणत असत. भारत आणि मलेशियातून आणलेले आले वर नमूद केल्याप्रमाणे वाळवणे किंवा साखर घालून त्याचे स्फटीकीकरण करणे हा त्या काळात अरब व्यापाऱ्यांचा फार मोठा व्यवसायच झाला होता. या दोन्ही स्वरूपातील तसेच ताजे आले युरोपियनांना विकून कित्येक अरब व्यापाऱ्यांनी आपले उखळ पांढरे करून घेतले. भारत व अतिपूर्वेकडील लोक आल्याचे 'औषधी' गुणधर्म लक्षात घेऊन आलेपाकाचा आस्वाद वर्षानुवर्षे घेत असत आणि आजही हा पदार्थ आपले मानाचे स्थान टिकवून आहे. आशियाई पदार्थ विकणाऱ्या युरोपमधील बहुतेक दुकानात बरण्यात भरलेला आलेपाक विक्रीसाठी ठेवलेला हमखास आढळत असे. आजसुद्धा स्फटीकीकरण केलेले किंवा साखरेच्या दाट पाकात टाकलेले आले व्यापारी तत्त्वावर मोठ्या प्रमाणावर तयार करतात.

झुआन झॅंग (Xuan Zang) हा चिनी प्रवासी इ. स. ६२९ ते ६४५ अशी सोळा वर्षे भारतात राहिला. ह्यु एन् त्सेतुंग या नावाने तो इतिहासात प्रसिद्ध आहे. संपूर्ण भारतभ्रमण करून त्याचा सविस्तर वृत्तांत त्याने लिहिला. हा वृत्तांत्त वाचला तर तत्कालिन भारताचा चित्रपट

आपल्या मन:चक्षूंसमोर उभा राहतो. आलं आणि मोहरी या मसाल्याच्या पदार्थांचा तो प्रामुख्याने उल्लेख करतो. कांदा, लसूण हे उग्रवासाचे पदार्थ फारच थोडे लोक वापरत. बहुतेकांना ते पदार्थ वर्ज्य असत अशीही नोंद त्याने केली होती.

इ. स. बाराशेच्या सुमारास कल्हन Kalhan याने 'राजतरंगिणी' नावाचा ग्रंथ लिहिला होता. त्यात काश्मिरमध्ये प्रचलित असलेल्या खाद्यपदार्थांची वर्णने आढळतात. काश्मिर लोक सामिष पदार्थ स्वादिष्ट करण्यासाठी आले, हिंग, कांदा हे मसाल्याचे पदार्थ वापरीत असत. काश्मिरी मिरचीचे लाल तिखट तर बहुतेक सर्व तिखट पदार्थात वापरले जाई. दक्षिण भारतातील मिरे मात्र त्याकाळापर्यंत काश्मिरमध्ये प्रचलित झाले नव्हते. असे अनेक निष्कर्ष या ग्रंथावरून काढता येतात.

मार्को पोलो या इटालियन प्रवाशाने (इ. स. १२९४) आपल्या प्रवासवर्णनात मलबारमधील आल्याचे उल्लेख वारंवार केलेले आढळतात. भारत, चीन आणि अतिपूर्वेकडील देशांच्या सफरी केल्यामुळे ताजे आले आणि सुंठ यांचा उपयोग अन्नपदार्थात कसा करतात हे त्याला माहीत होते. जॉन ऑफ मोंसे कॅव्हिनो John of Monte Cavino हा इटालियन आर्चबिशप पर्शियामागे भारतात आला. (इ. स. १२९२) आणि सुमारे वर्षभर येथेच राहिला. भारतातील आले आणि मसाल्याच्या पदार्थांची स्तुतीपर वर्णने त्याने आपल्या लेखनात केली होती.

ओडोरिक ऑफ पॉर्डीनन हा फ्रान्सिस्कन पंथाचा धर्मगुरू इ. स. १३२५ साली सुरतमध्ये आला व मग दक्षिण भारताला वळसा घालून चीनमध्ये पोचला. इ. स. १३२८ मध्ये जॉरडॅन Jordanvs या फ्रेंच धर्मगुरूचे भारतात आगमन झाले या दोघांनी भारतातील उत्कृष्ट आल्याचा उल्लेख आपल्या लेखनात केला आहे. इ. स. १६२० ते १७०० या कालखंडात डच, फ्रेंच, इटालियन, ब्रिटिश असे अनेक लोक व्यापार करण्याच्या उद्देशाने भारतात येऊन गेले. त्यातील बहुतेक सर्व प्रवाशांनी भारतीय भाज्या, फळे, पिके, भारतीय संस्कृती लोकांचे राहणीमान या सर्वाविषयी नोंदी केल्या होत्या. त्यात आले या मसाल्याच्या पदार्थाचा उल्लेख वारंवार येतो.

वास्को दि गामा या पोर्तुगीज खलाशाने तीन वेळा भारत सफरी केल्या. केप ऑफ गुड होपवरून भारतात येण्याचा मार्ग त्याने शोधून काढला. आपल्या पहिल्या सफरीत इतर मसाल्याच्या पदार्थाबरोबर २८ टन आले त्याने युरोपात नेले होते.

पोर्तुगीज लोक व्यापार करण्याच्या उद्देशाने मोठ्या संख्येने भारतात आले. सतराव्या शतकाच्या उत्तरार्धात त्यांची संख्या सुमारे वीस हजार एवढी होती. त्यापैकी अनेकजण बंगालमधील हुबळी, राजमहल या ठिकाणी किंवा त्याच्या आसपासच्या प्रदेशात स्थायिक झाले. या उद्योगप्रिय व कल्पक लोकांनी भारतातील विशिष्ट फळांची आणि अन्नपदार्थांची सुबत्ता हेरली. ही फळे टिकवण्यासाठी त्यांचे जॅम, मुरांबे, जेली, विविध पेये तयार करण्याचे तंत्र पोर्तुगीजांना अवगत होते. म्हणून त्यांनी मोठ्या प्रमाणावर असे उद्योगधंदे सुरू केले. फ्रेंच डॉक्टर फ्रँकॉय बर्निअर Franco's Bernice हा औरंगजेबाचा डॉक्टर होता. इ. स. १६५९ ते ६६

अशी सात वर्षे तो भारतात राहिला. या वास्तव्यात त्याने काश्मिर आणि बंगाल या प्रदेशाचा संपूर्ण अभ्यास केला. काश्मिरच्या सौंदर्याने आणि बंगालच्या समृद्धीने तो मोहित झाला. त्याने भारताबद्दलच्या नोंदीत पोर्तुगीज व्यापाऱ्यांचा आवर्जून उल्लेख केला होता. प्रामुख्याने आवळा, अननस, आलं आणि आंबा यापासून पोर्तुगीज तऱ्हतऱ्हेचे टिकाऊ पदार्थ बनवत असत अशी नोंद फ्रँकॉयच्या लिखाणात आढळते. त्याच्या मते ब्रेड तयार करण्याची पद्धत पोर्तुगीजांनीच बंगालमध्ये रुजवली.

सर्व युरोपभर प्रबोधनकाळ सुरू झाला. औद्योगिकीकरणाबरोबर खाद्यपदार्थ आणि ते तयार करण्याच्या पद्धतीत क्रांती घडून आली. फ्रेंच लोक पूर्वी आले वापरीत असत, पण आता त्यांनी आल्याशी प्रतारणा केली. फ्रेंच खाद्यपदार्थातील आल्याच्या वापराचे प्रमाण कमी झाले. याउलट अँग्लोसॅकसन, जर्मॅनिक, फ्लेमिश आणि स्कँडीनेव्हियन लोक आल्याशी प्रामाणिक राहिले. तिखट तसेच बऱ्याच गोड पदार्थात ही मंडळी आले घालतात. च्युइंग गमसुद्धा आल्याच्या स्वादाचा बनवतात. जिंजरेल हे युरोपियनांचे आवडते पेय आणि जिंजर बिअर हे आवडते मद्य! जिंजर वाईन ही ख्रिसमसच्या सणाला हवीच ! अलसेक Alsace येथे दुसऱ्या महायुद्धापर्यंतच्या काळात खाटिकखान्यात नेऊन मारण्यापूर्वी टर्कीना जिंजर वाईन पाजीत असत. यामुळे टर्कींच्या मांसात ही जिंजर वाईन मुरते व मांस अधिक चविष्ट लागते असा युरोपियनांचा समज होता.

भारत, इंडोनेशिया, वेस्ट इंडीज, विशेषत: जमेका, उत्तर व पश्चिम आफ्रिका या उष्ण कटिबंधातील प्रदेशात आल्याची प्रामुख्याने लागवड होते. आल्यासारखे जमिनीखालील दुसरे अन्नसंचयी खोड म्हणजे हळद. या हळदीच्या सान्निध्यात आल्याची वाढ चांगली होत असल्यामुळे आल्याचे मिश्र पीक काढतात. आल्याला येणारा विशिष्ट वास आल्यातील बाष्पनशील तेलामुळे येतो. यात तेलाचे आल्यामधील प्रमाण २ टक्के इतके कमी असते. त्यातील प्रमुख घटक झिंझीबरीन Zingiberene $C_{15}H_{24}$ हा असतो. आल्याचा तिखटपणा प्रामुख्याने झिंजरोन Zingerone $C_{11}H_{14}O_3$ यामुळे असतो. ऊर्ध्वपातनाने आल्याचे तेल काढतात. खाद्यपदार्थ किंवा अत्तरे व सुवासिक द्रव्ये तयार करताना ते वापरतात.

### सुंठ

भारतातील आल्याच्या उत्पादनापैकी २५ टक्के आल्याची सुंठ बनवतात. आल्याचे हाताच्या पंजासारखे दिसणारे गड्डे पाण्यात भिजत घालतात, धुऊन साफ करून शिंपल्याने किंवा बांबूच्या धारदार पात्याने त्याची साल खरवडून काढतात. नंतर सात आठ दिवस उन्हात वाळवून त्याची पावडर केल्यास सामान्य प्रतीची सुंठ तयार होते. धुतलेले आले जर काही काळ चुन्याच्या निवळीत भिजत टाकले तर त्याच्या विरंजक गुणधर्मामुळे आले अधिक पांढरे होते. असे आले वाळवून त्याची पूड केल्यास ती पांढरी व आकर्षक होते. उत्तम दर्जाची असल्यामुळे अशा सुंठीला भावही चांगला मिळतो. कधी कधी आल्याला गंधकाची धुरी देतात. गंधकाच्या विरंजक गुणधर्मामुळे आले पांढरट रंगाचे होते. असे आले वाळविले व मग त्याची पावडर केली तर

होणारी सुंठ पांढरी आकर्षक दिसणारी आणि उत्कृष्ट दर्जाची समजली जाते. भारतातून आशिया, अमेरिका, ऑस्ट्रेलिया, जर्मनी इत्यादी ठिकाणी सुंठ निर्यात केली जाते. या व्यवहारात भारताला अनेक कोटी रुपयांचे परकीय चलन मिळते.

## लवंग – क्लोव्ह Clove

'लवंग' हा महत्त्वाचा मसाल्याचा पदार्थ. 'Myrtaceae' 'मर्टाशिअे' वनस्पती कुटुंबातील या झाडाचे शास्त्रीय नाव आहे युजिनिया कॅरियोफायलस Eugenia Caryophyllus किंवा Eugenia aromatica युजिनिया अॅरोमॅटिका. इंडोनेशियातील मोलुक्का बेटे हे लवंगांचे मूळ स्थान. श्रीलंका, इंडोनेशिया, मॅलॅगॅसी, झांझिबार, पेंबा (टांझानिया), रेयुत्यों बेटे, मॉरिशस, वेस्ट इंडीज या सर्व देशात लवंगांचे उत्पादन करतात. भारतात तामिळनाडूतील निलगिरी, तिरुनेलवेली, कन्याकुमारी या जिल्ह्यात, तसेच केरळमधील कोट्ट्यम, एर्नाकुलम, त्रिवेंद्रम या जिल्ह्यात लवंगांचे चांगले पीक येते. इ. स. १९७९ पासून रत्नागिरी व सिंधुदुर्ग जिल्ह्यात जवळजवळ ७ हजार लवंग रोपांची लागवड करण्यात आली.

**वनस्पती वर्णन**

लवंगांची झाडे सर्वसाधारणपणे १० ते १५ मीटर उंच असतात. त्याचा आकार स्तुपासारखा त्रिकोणी असतो. झाडाचे प्रमुख खोड सरळ उंच असते. त्याचा घेर सुमारे १०० सें. मी. असतो. साल करडी आणि गुळगुळीत असते. लवंगांची पाने 'लॉरेल' वनस्पतीच्या पानांसारखी देठाजवळ रुंद व टोकाशी निमुळती होणारी, काहीशी लांबट असतात. या झाडाच्या सर्वच भागात सुगंधी तेल असते. पानांतही तैलग्रंथी असतात. या झाडावर आलेल्या कळ्या म्हणजेच 'लवंगा.' या कळ्या उमलण्यापूर्वी काहीशा लालसर झाल्या म्हणजे हातानी तोडतात व चार पाच दिवस उन्हात वाळवतात. सुकवलेली लवंग लालसर तपकिरी दिसते. ती सुमारे १२ ते १९ मि. मी. लांब असते. देठावरच्या चार टोकदार भागात गोलसर कळी असते.

**लवंग तेल**

लवंगेच्या झाडावरचे कळे थोडेसे दाबले तर त्यातून तेलकट पदार्थ स्त्रवतो. हीच लवंगेमधील आवश्यक तेले. लवंगेमधील या तेलाचे प्रमाण १४ ते २०% असून त्यातील प्रमुख घटक युजिनॉल eugenol $C_{10}H_{12}O_2$ हा असतो. हे तेल फिक्कट पिवळे असते तर जुने तेल लालसर तपकिरी दिसते. लवंगांच्या तेलाचा उपयोग किडक्या दातातील पोकळ्यांना स्थानिक बधिरता आणण्यासाठी झिंक ऑक्साइडबरोबर करतात. लवंगेचा स्वाद असलेली टूथपेस्ट बाजारात उपलब्ध आहे. गुळण्या करण्याच्या औषधातही या तेलाचा वापर करतात. लवंगाच्या स्वादाचा च्युइंग गम लहानथोर सगळ्यानाच प्रिय असतो. साबण, सौंदर्य प्रसाधने, सुगंधी द्रव्ये (तेले, अत्तरे) तयार करताना हे तेल वापरतात. पूर्वी लवंगेच्या तेलापासून कृत्रिम व्हॅनिला काढीत असत. औषधे तयार करणाऱ्या कंपन्याना या तेलाची गरज असते.



अनुक्रमणिका

'लवंग' या मसाल्याच्या पदार्थाचा इतिहास चांगलाच उत्कंठावर्धक, विक्रीचा उच्चांक गाठलेल्या एखाद्या कादंबरीत आढळणारा आणि प्रेक्षणीय चित्रपटात शोभेल असा सर्व "मालमसाला" लवंगेच्या इतिहासात आढळतो. त्या इतिहासात रहस्य आहे तशा विदेशी गोष्टी आहेत. कटकारस्थाने, माऱ्यामाऱ्या, खून याबरोबर दुष्ट खलनायक आणि सद्‌गुणी हीरो आहेत. मोठमोठी जहाजे, लहान मोठे व्यापारी या सर्व गोष्टींचा अंतर्भाव लवंगेच्या इतिहासात होतो. लवंगेचा इतिहास हेच एक 'वाचनीय' नाट्य आहे !

लवंगेच्या या नाट्याचा पहिला अंक चिनी बादशहाच्या दरबारात सुरू झाला. चीनमध्ये वेगवेगळ्या कालखंडात हॅन, टॅंग, संग, युआँ, मिंग, चिंग इत्यादी राजघराण्यातील लोक राज्य करीत होते. इ. स. पूर्व २२० ते इ. स. २०६ या कालखंडात 'हॅन' या राजघराण्यातील वंशावळीचे चीनवर साम्राज्य होते. इसवीसनाच्या दुसऱ्या शतकात या राजघराण्यातील गुणी राजाचा दरबार भरत होता. राजाने खास नेमणूक केलेला एक बृहन्नाडा नपुंसक (छक्का) दरबारातील अधिकाऱ्यांना खास दिवाणखान्यात घेऊन येई. रेशमी पडदा उघडण्यापूर्वी एक गुलाम पोर्सिलेन कप त्या अधिकाऱ्यांपुढे आणी. प्रत्येक अधिकारी त्या कपात ठेवलेली काळपट रंगाची खिळ्यासारखी दिसणारी एक वस्तू तोंडात टाके आणि चावत असे. त्यानंतर तो अधिकारी आपल्या कामगिरीचा वृतांत्त राजापुढे सादर करीत. त्या वस्तूला चिनी 'हाय-शो-हियांग' 'hi-sho-hiang' पक्ष्याची जीभ असे म्हणत. ही पक्ष्याची जीभ म्हणजे दुसरे तिसरे काही नसून उग्र वासाच्या एक झाडाची वाळलेली कळी आणि आपल्या या नाट्याची नायिका 'लवंग' होती! राजापुढे जाऊन बोलण्यापूर्वी प्रत्येक अधिकाऱ्याने लवंग खाऊन आपला श्वास सुगंधित केला म्हणजे राजा आपल्या विनंतीला नक्कीच मान्यता देईल अशी त्या अधिकाऱ्यांची समजूत असे.

प्राचीन काळी भारताच्या पूर्वेकडे गंगा नदीच्या खोऱ्यात 'मोगाडा' हे राज्य होते. मोगाडाचे लोक अनेक खाद्यपदार्थ स्वादिष्ट होण्याकरता 'लवंग' वापरीत असत. परंतु मोगाडा हे काही लवंगांचे 'मूळस्थान' नव्हे. भारताच्या आग्नेयेकडील बेटांवरून दीर्घकालीन समुद्रसफर करून लवंगा भारतात आल्या होत्या. चिनी लोक या 'मोगाडा' राज्यातून हाय-शो-हियांग मिळवीत असत. अरब दर्यावर्दी ओमनची सामुद्रधुनी पार करून बंगालच्या उपसागरातून भारताला वळसा घालून चिनी समुद्रात आपल्या बोटी नेत असत. तेथील बेटावर होणाऱ्या 'लवंगांचा सुवास' अरबांना प्रिय होता. अरब भरपूर लवंगांची खरेदी करीत. आपल्या हिशेबाच्या वहीत quaremfel 'क्वारमफेल' या नावाने लवंगांच्या खरेदीची नोंद करीत. पुन्हा एकदा दीर्घकाळ समुद्रप्रवास करून अरब या लवंगा लेबॅनीज आणि सिरीयन या वापाऱ्यांना पुरवीत.

इसवी सनाच्या पहिल्या शतकात प्लीनीने caryophyllon कॅरिओफायलॉन या मसाल्याच्या पदार्थाची नोंद केली होती. 'कॅरिओफायलॉन' हा ग्रीक शब्द असून त्याचा शब्दश: अर्थ 'कठिण कवचाची फळे येणाऱ्या झाडाची पाकळी' असा होता. अर्थात हा मसाल्याचा पदार्थ म्हणजे

'लवंग' असा अर्थ प्लीनीला अभिप्रेत नव्हता. डायोस्कोराइड्स्, थिओफ्रेटस् आणि 'खाद्यपदार्थ' या जिव्हाळ्याच्या विषयावर लिहिणारे समकालीन लेखक यापैकी कोणीही 'लवंगांचा' उल्लेखसुद्धा केलेला आढळत नाही. इसवीसनाच्या पहिल्या शतकापर्यंत तरी युरोपियनांना लवंगांची ओळख झाली नव्हती.

या ऐतिहासिक नाट्याचा दुसरा अंकसुद्धा ऐश्वर्यसंपन्न राजदरबारात सुरु होतो. यावेळी हा राजदरबार रोममध्ये होता. ख्रिस्ताला क्रूसावर चढविल्यावर ३३५ वर्षे लोटली होती. 'कॉन्स्टंटीन दी ग्रेट' या अतिशय उत्साही, ख्रिश्चन राजाचे रोमवर साम्राज्य होते. बिझॅटिअम ही त्याच्या साम्राज्याची नवी राजधानी होती. या राजाने पुनर्रचना केल्यामुळे त्या राजधानीचे नाव कॉन्स्टंटिनोपोल पडले. आता त्याचे नामकरण इस्तंबूल झाले आहे. राजा आपल्या साम्राज्याचे दैवी अधिकार प्रस्थापित करण्यास उत्सुक होता. तसेच रोमच्या चर्चविषयीचा आपल्या मनातील विलक्षण आदर त्याला व्यक्त करावयाचा होता. त्याने पोप सिल्हवेस्टर यांना एक आगळीवेगळी भेट दिली. १५० पौंड (४५ किलो) कॅरिओफायलॉन सुरेख भांड्यात ठेवून व ती भांडी हवाबंद करून राजाने पोपच्या स्वाधीन केली. लवंगेला फक्त व्यापारीदृष्ट्या महत्त्व होते असे नाही तर इतरही अनेक कारणाकरता लवंगांचे उपयोग होते.

इ. स. ६५० च्या सुमारास अेजिनाच्या पॉलने लवंगांचे वर्णन "मौल्यवान उपाय' असे केले होते. अेपिशिअसने आपल्या पाककृतीच्या पुस्तकात "लवंग हा मसाल्याचा पदार्थ प्रत्येक गृहस्थाच्या घरी हवाच !" असे विधान करून लवंगेला गौरविले होते. इटालियन भाषेत लवंगेला garofano गॅरोफॅनो म्हणतात तर बाराव्या शतकात फ्रेंचांनी लवंगेचे नामकरण girofre 'गायरोफ्र' असे केले होते. व्हिअॅंडिअरने आपल्या पाककृतीच्या पुस्तकात आलं, दालचिनी आणि भरपूर लवंगा घातलेल्या 'कॅमेलिन' सॉसची पाककृती दिली होती. त्यांत लवंगांचा उल्लेख girofle गायरॉफल असा केला होता. पक्ष्यांच्या मांसापासून केलेल्या Menjoire मेंजॉअर या सूपामध्ये लवंग अत्यावश्यक मानली जाते. मास्टर हेल्ये याने आपल्या विवाहप्रीत्यर्थ दिलेल्या मेजवानीत कोणते मसाल्याचे पदार्थ वापरले होते त्याची यादीच मेनॅजिअरने केलेली आढळते. यात लवंगांचा उल्लेख clous 'क्लोज म्हणजे खिळे' असाच केलेला आढळतो. त्यावरूनच इंग्रजीतील clove क्लोव्ह हा शब्द आला असावा.

मास्टर हॅल्ये याने वापरलेले सर्व मसाल्याचे पदार्थ फ्रान्सच्या बंदरावर आल्यावर त्यांच्यावर किती कर बसविला जात असे याचे उल्लेख १३३९ सालच्या फेब्रुवारी महिन्यातील कागदपत्रात नमूद केलेले आढळतात. साखर, तांदूळ याबरोबर मिरी, दालचिनी आणि लवंगासुद्धा पोती भरभरून फ्रान्सच्या बंदरावर उतरवत असत. मध्ययुगीन काळात Aframomum melegueta ॲफ्रामोमम मिलीग्वेटा या पश्चिम आफ्रिकेतील झाडांच्या बिया मसाल्याचा पदार्थ किंवा औषध म्हणून वापरत असत. या बियाना युरोपियन 'ग्रेन ऑफ पॅराडाइज' असे म्हणत. लवंगा आणि ग्रेन ऑफ पॅरडाइज हे दोन मसाल्याचे पदार्थ एकमेकांना पूरक असत. तत्कालीन लोकांना हे

दोन्ही पदार्थ एकत्र करून केलेल्या पाककृती रुचत असत. त्यामुळे बाजारात हे दोन्ही मसाले एकत्र करून विकत असावेत अशी शंका काही इतिहासकारांच्या मनात डोकावली परंतु मेर्नेजिअर या मासिकाचा संपादक बॅरन पिचन याने याचे शंकानिरसन त्याकाळी करून ठेवले आहे. 'ग्रेन ऑफ पॅरडाइज' हा मसाल्याचा पदार्थ महाग होता, पण लवंगा त्यापेक्षा अनेक पटीनी महाग होत्या. हे दोन मसाल्याचे पदार्थ कोणत्या प्रमाणात एकमेकात मिसळलेले आहेत हे समजणे कठीण आणि या गुणोत्तरावर नियंत्रण ठेवणे त्याहून कठीण ! मध्ययुगीन काळातील अधिकारी याबाबतीत अतिशय काटेकोर असल्यामुळे या दोन मसाल्याच्या पदार्थांचे एकत्रिकरण करून विकण्यास ते निश्चितच परवानगी देत नसत असे स्पष्टीकरण बॅरन पिचनने दिले होते.

इटलीमध्ये मध्ययुगीन काळात अनेक पदार्थात लवंगांचा वापर करीत असत. औषधशास्त्रानुसार लवंग हे अनेक रोगावरील रामबाण औषध म्हणून उपयोगात आणीत. इटलीच्या पश्चिम किनाऱ्यावरील सॅलर्नो हे बंदर आहे. प्राचीन काळी सॅलर्नो वैद्यकीय विद्यालय नावाजलेले होते. या विद्यापीठाची विचारधाराच या तत्त्वावर आधारलेली होती. प्लेग, नपुंसकत्त्व, मोतीबिंदू अशा अनेक रोगांवर 'लवंग' गुणकारी मानली जाई. वेदनांची तीव्रता कमी करण्याच्या लवंगेच्या विशिष्ट गुणधर्माचीसुद्धा प्राचीन काळी लोकांना माहिती होती. अरब आणि चिनी व्यापारी इटालियनांना लवंगांचा पुरवठा करीत. या लवंगा नक्की कोणत्या देशातून येतात हे बहुतेक व्यापारांना ठाऊक नसे आणि ज्यांना ते माहीत होते ते व्यापारी ही माहिती गुप्त ठेवण्याची खबरदारी घेत असत.

कॅमिअन (Camoens) (१५२४-८०) हा पोर्तुगीज कवी इ. स. १५५३ मध्ये भारताच्या सफरीवर निघाला. भारताबरोबर अतिपूर्वेकडील इतर अनेक देशांना त्याने भेटी दिल्या आणि १५७० साली तो मायदेशी परतला. "वास्को दि गामाच्या साहसी व अद्भुत सफरी, त्याने शोधलेला भारतात पोहोचण्याचा सागरी मार्ग, अतिपूर्वेकडील देशांत पोर्तुगीजांनी प्रस्थापित केलेले व्यापारी संबंध" या पोर्तुगीजांच्या मर्दुमकीचे वर्णन या कवीने लुसियाड Lusiads (१५७२) या महाकाव्यात केले होते. पोर्तुगीज इतिहासाचे संदर्भ देत लिहिलेले हे महाकाव्य इतके प्रभावी ठरले की सतराव्या शतकापासून 'राष्ट्रीय काव्य' म्हणून त्याला पोर्तुगालमध्ये मान्यता मिळाली. या काव्यातील पुढील परिच्छेद लवंगांच्या अरब व्यापाऱ्यांच्या धूर्तपणाचे दर्शन घडविण्यास पुरेसा आहे.

"वायव्य आफ्रिकेत राहाणाऱ्या, बर्बर आणि अरब लोकांना 'मूर' या नावाने संबोधतात. या मूर लोकांना आणि तुर्कस्तानमधील लोकांना सागरी मार्गाची उत्तम जाण होती. त्यांच्यातील अनेकजण धाडसी खलाशी होते. परंतु त्यानी सागरी मार्गाची माहिती अगदी काळजीपूर्वक युरोपियनांपासून दूर ठेवली. आपण गुप्त ठेवलेले हे सागरी मार्ग युरोपियनांना समजणार अशी भीती वाटू लागली तेव्हा त्यांनी शस्त्रास्त्रांचा उपयोग करण्यास सुरुवात केली. युरोपियनांचे पूर्वेकडे जाण्याचे सर्व मार्ग मूर आणि तुर्कस्तानमधील खलाशानी कावेबाजपणाने अडविले."

इटालियन व्यापाऱ्यांना लवंगांचा व्यापार करणाऱ्या अडत्यांबरोबर संधान बांधून लवंगांचे उत्पादन करणाऱ्या मूळ देशांबद्दल माहिती काढून घ्यावयाची होती. मार्को पोलो हा इटालियन व्यापाऱ्यांचे प्रतिनिधित्व करत होता. म्हणून त्याने चिनी लोकांकडे यासंबंधी विचारणा केली. तिबेटच्या दक्षिणेकडील Gaindu जियांडु, अत्यंत श्रीमंत बेट जावा, Nocaran नोकॅरन आणि Gavenispola गॅवेनिस्पोला या सर्व देशात लवंगांचे भरपूर उत्पादन होते अशी माहिती त्याला चिनी व्यापाऱ्यांनी दिली. सुमारे दोन शतकानंतर मार्को पोलोचा देशबांधव निकोलो कॉंटी Nicolo Conti याने पंचवीस वर्षे सागरी सफरी केल्या. तेव्हा 'जावा' बेटावरील वखारीत साठवून ठेवलेल्या लवंगा अतिपूर्वेकडील देशातून कदाचित Celebes सेलिबीसमधून आल्या असाव्यात असा शोध त्याला लागला.

इ. स. १४९७ साली वास्को-दि-गामाने केप ऑफ गुड होपला वळसा घातला आणि मोझॅम्बिक Mozambique येथे पोर्तुगीजांचे प्रमुख व्यापारी केंद्र प्रस्थापित केले. तो केनयामधील मोंबासा या गावी पोहोचला. तेव्हा मोंबासातील एका नगण्य राज्यप्रमुखाने त्याला बजावले, "भोजनाची लज्जत वाढविणाऱ्या लवंगा, दालचिनी, मिरी इत्यादी मसाल्याचे पदार्थ मिळवण्यासाठी तुला अतिपूर्वेकडील देशात जाण्याची मुळीच जरूर नाही. या सर्व वस्तू आमच्याकडे प्रचंड प्रमाणावर मिळतील. त्यामुळे येथल्या उत्पादनावर तू समाधान मानलेस तर ते उचित ठरेल. तू पुढे जाऊ नकोस." या सर्व हकीगतीचे रसभरीत वर्णन कॅमिअनच्या लुसियाडमध्ये आले आहे. वास्को दि गामाने मोंबासाच्या राजावर विश्वास ठेवला नाही. शिवाय भारतापर्यंत पोचायचे त्याचे ध्येय होते. युरोपियनांना हिंदी महासागरापर्यंत पोहोचू न देण्याचा पद्धतशीर प्रयत्न अखेर फसला कारण वास्को दि गामाचे खबरे अतिशय जागरूक होते. वास्को दि गामाच्या पाठोपाठ 'अल्बुकर्क' हा धाडसी इटालियन धर्मगुरू स्वदेशाचा त्याग करून सफरीवर निघाला होता. या साऱ्यांच्या प्रयत्नाना यश आले. लवंगा मोलुक्काज Moluccas किंवा मसाल्याच्या बेटावरून येतात असे अल्बुकर्कला खात्रीलायकरित्या समजले आणि लवंगांच्या मूळ स्थानाचा शोध युरोपियनांना लागला.

एखादे फळ झाडावर असावे असे वाटत असले तरी अनेकदा ते फळ पर्णभारांनी झाकल्यामुळे आपल्या दृष्टीस पडत नाही. प्रत्यक्षात ते फळ हस्तगत करण्यासाठी पाने बाजूला सारून फळ तोडावे लागते. तशीच काहीशी अवस्था लवंगांच्या बाबतीत अल्बुकर्कची झाली होती. 'मोलुक्काज' या नावाने अल्बुकर्क झपाटला गेला होता. मोलुक्काच्या किनाऱ्यावरील लवंगांची झाडे वातावरण सुगंधित करीत होती. परंतु त्या लवंगा मिळवण्यासाठी मोलुक्कापर्यंत प्रत्यक्ष पोचावयास हवे होते. अल्बुकर्क आणि त्याचे सहकारी आपापल्या बोटीं घेऊन मोलुक्काच्या दिशेने निघाले. पण वाटेत त्याची एक बोट फुटली. त्या बोटीचा कप्तान Serrao 'सेराओ' याला अँबॉइन Amboina येथे लवंगा आणण्यासाठी निघालेल्या मलेशियन व्यापाऱ्याने जीवदान दिले. अशा तऱ्हेने सेराओ हा मोलुक्काच्या राजधानीत Amboina अँबॉइन येथे पोचला. लवंगांच्या

जन्मस्थानी लोक दैवयोगानेच पोचले !

Magellan मेगेलान हा सेराओचा मित्र आणि अल्बुकर्कचा एक अधिकारी. पण पोर्तुगीज्र राजा Manuel मॅन्युअलने मेगेलानला अपमानास्पद वागणूक दिल्यामुळे त्याने स्पेनचा बादशहा पाचवा चार्लस् याच्याकडे नोकरी पत्करली. सेराओ या मित्राकडून लवंगांचे उत्पादन करणाऱ्या अतिपूर्वेकडील देशांची त्याला माहिती आली होती. या मसाल्याच्या बेटावर स्पेनच्या राजाचे वर्चस्व प्रस्थापित करण्याच्या उद्देशाने मेगॅलानने समुद्रसफर केली. परंतु यातच त्याचा दुर्दैवी अंत झाला. त्यानंतर स्पेनच्या राजानेसुद्धा मसाल्याच्या बेटांचा नाद सोडून दिला आणि पोर्तुगीजांची मोलुक्काज आणि तेथील लवंगांच्या झाडांवरील सत्ता अबाधित राहिली !

इ. स. १६१९ मध्ये काही इंग्रजांनी लवंगांच्या झाडांची रोपे मिळवली. Amboina ॲम्बॉइन आणि Miaou मियाऊ येथील आपल्या मालकीच्या जागेवर त्यांची लागवड केली. तेथे ती रोपे चांगली रुजली. परंतु सतराव्या शतकात 'मोलुक्का' वर डचांचे साम्राज्य होते. अर्थात लवंगांच्या झाडावरही त्यांची मालकी असणे ओघानेच आले. डचांनी काही इंग्रजांची हत्या केली व उरलेल्यांना हुसकावून लावले. डचांनी टर्नेट Ternate आणि ॲम्बॉईना Amboina येथे लवंगांची स्वत:च्या मालकीची झाडे वाढविली आणि तेथील मूळ लोकांना Native (नेटिव्हज्) इतर सर्व ठिकाणची लवंगांची झाडे नष्ट करण्यास भाग पाडले. टर्नेट आणि ॲम्बॉइना येथील लवंगांची झाडे ही जणू काही आपल्या प्रांतातील गोपनीय गोष्ट आहे अशा आविर्भावात डच त्या लवंगांच्या झाडांवर कडक पहारा ठेवीत असत.

लवंगांच्या वीरकथेतील तिसऱ्या अंकाची सुरुवात इ. स. १७४८ साली फ्रेंच ईस्ट इंडिया कंपनीच्या संचालकांच्या खोलीत झाली. मध्ययुगीन काळात म्हणजेच इसवीसनाच्या पाचव्या शतकापासून पंधराव्या शतकापर्यंतच्या काळात फ्रेंचाच्या पाककृतीत मसाल्याच्या पदार्थाचे प्रमाण अधिक असे. परंतु इ. स. १६५० ते १७५० या शतकांत फ्रेंचांच्या पाककृतीतील मसाल्याच्या पदार्थांचे प्रमाण कमी झाले. पुढे पुढे इटालियन लोकांनीसुद्धा मसाल्याचे पदार्थ मर्यादित प्रमाणात वापरण्याच्या फ्रेंचांच्या धोरणाचेच अनुकरण केले. फक्त 'लवंगा आणि 'मिरी' हे दोन मसाल्याचे पदार्थ संयमित वापराच्या तावडीतून सुटले होते. ते दोनच मसाल्याचे पदार्थ स्टँडर्ड मसाल्याचे पदार्थ म्हणून वापरले जात होते. पंधराव्या शतकांतील फ्रेंच पाककृतीत लवंग आणि मिरी या दोन मसाल्यांच्या पदार्थाचे प्रमाण ४ ते १६ टक्के होते तर इ. स. १६५१ सालच्या पाहणीत हे प्रमाण ४० टक्के झाल्याचे लक्षात आले. मध्ययुगात काहीसे मागे पडलेले पदार्थाला 'स्वाद' देणारे अन्य पदार्थही आता पुन्हा प्रकाशात येऊ लागले. बागकाम करणे हा तत्कालीन युरोपियनांच्या दृष्टीने फॅशनचाच एक भाग बनला होता. त्यामुळे युरोपियन अशा स्वाद देणाऱ्या पदार्थाचे उत्पादन स्वत:च्या बागेत करू लागले.

सतराव्या आणि अठराव्या शतकात युरोपमध्ये प्रबोधनकाळ सुरू झाला. अमीर-उमरावांची संस्कृती, सवयी आणि आवडीनिवडी या अधिकाधिक तरल होत होत्या. मध्ययुगीन काळात

मिरी आणि लवंगांचा वापर केलेले खाद्यपदार्थ अमीरउमरावांसाठी आहेत असे शिक्कामोर्तब होत असे. परंतु आता पोर्तुगीज, त्यानंतर डच लोकसुद्धा अशा पाककृती करू लागले. मध्यमवर्गीय लोकांच्या जेवणाच्या टेबलावर असे पदार्थ दिसू लागले.

पुन्हा एकदा फ्रेंच ईस्ट इंडिया कंपनीच्या संचालकांच्या खोलीतील नाट्यप्रवेशाकडे आपण वळू या. इ. स. १७५० च्या सुमारास संपूर्ण फ्रान्सला प्रतिवर्षी ९ हजार पौंड लवंगा लागत असत एवढ्या मोठ्या प्रमाणावर लवंगा खरेदी केल्यामुळे राज्याच्या आयातनिर्यातीचा तोल ढळत असे. संचालक मंडळाला या समस्येवरील उपाय शोधावयाचा होता. त्याचवेळी उत्साहाने रसरसलेला आणि सतत कार्यरत असणारा एक तिशीतला तरुण या संचालक मंडळाच्या खोलीत आला. अत्यंत हुशार, कलावान आणि निसर्गतज्ज्ञ असलेल्या या तरुणाने अतिपूर्वेकडील सर्व देशांचा प्रवास व अभ्यास केला होता. त्या देशांच्या राजकीय, भौगोलिक, सामाजिक परिस्थितीची त्याला चांगलीच जाण होती. अपंग असूनसुद्धा (अपघातात एक हात गमावलेला होता) मोठ्या आत्मविश्वासाने त्याने आपली योजना फ्रेंच ईस्ट इंडिया कंपनीच्या प्रमुख अधिकाऱ्यांपुढे सादर केली आणि अधिकाऱ्यांनी त्या योजनेला मान्यता दिली. वरवर पाहता हा प्रकल्प हास्यास्पद वाटला असता, परंतु कंपनीच्या अधिकाऱ्यांना त्या प्रकल्पाच्या ठिकाणी यशस्वीतेबद्दल खात्री वाटत होती. त्या तरुणाचे नाव होते पिअर पॉइव्ह "Pierre Poivre"

पिअर पॉइव्ह याने इंडोचायनाची सागरी सफर करण्याचे योजिले होते. ती त्याची सफर यशस्वी ठरली. त्यानंतर पिअरला मोलुक्काला जावयाचे होते परंतु डचांची परवानगी काढल्याशिवाय मोलुक्काला जाणे म्हणजे प्रत्यक्ष यमाच्या तावडीत जाण्यासारखे होते. परवानगी काढायची ठरवली असती तरी डचांनी ती नाकारली असती याची पिअरला खात्री होती. यावरील तोडगा म्हणून त्याने मोलुक्काजवळील 'फिलीपीन्स' हे बेट निवडले आणि तेथे आपला तळ ठोकला. फिलीपीन्समध्ये स्थायिक झालेल्या स्पॅनिश लोकांशी त्याने मैत्रीचे संबंध प्रस्थापित केले आणि तेथे बंदिवासात टाकलेल्या मोलुक्कन राजाची सुटका करण्यास मदत केली. राजाने या उपकारांचे स्मरण ठेवून मोलुक्काला जाण्याचा त्याचा बेत पार पाडण्यासाठी सर्वतोपरी सहाय्य केले. पिअरने मोलुक्काकडे जाण्यास प्रस्थान ठेवले. समुद्रसफरीतील अनेक अडचणी पार करत अखेर पिअर तिमूरला पोचला. त्याच्या या धाडसी बेताला मोलुक्काच्या नेटिव्हजनीसुद्धा पाठिंबा दिला. पिअरने त्याचा एक हात पूर्वी अपघातात गमावला होता. त्यामुळे आपण अपंग आणि नगण्य प्रवासी असून रस्ता चुकल्यामुळे तेथे आलो असा बहाणा त्याने केला आणि तिमूरच्या डच अधिकाऱ्यांना ही गोष्ट पटवून दिली. मोलुक्कामधील या अल्पकालीन वास्तव्यात अतिशय चालाखीने आणि कष्टाने जायफळाची आणि लवंगांची रोपे मिळवली आणि आपल्या कोटाच्या खिशात लपवली. इ. स. १७५३ साली ती रोपे घेऊन तो मॉरिशसला आला. मॉरिशसमधील बागाईतदार ती रोपे घेण्यास तयार होते. परंतु लवंगांची आणि जायफळाची स्वतंत्र बाग तयार करण्याइतकी त्या रोपांची संख्या नव्हती. फ्रेंच ईस्ट इंडिया कंपनी संकटात सापडली असल्यामुळे

लवंगांचा शोध घेण्यास पाठविलेल्या पिअरचा त्यांना विसर पडला होता. लवंगांच्या बाबतीत पिअरचाही भ्रमनिरास झाला होता. शेवटी तो फ्रान्सला परत गेला आणि शास्त्रीय संशोधन करीत एकलकोंडे जीवन जगला.

इ. स. १७६७ साली पिअरला पुन्हा एकदा संधी देण्यात आली. यावेळी मॅस्कॅरीन Mascarene बेटांचा गव्हर्नर म्हणून त्याची नेमणूक करण्यात आली. तो उत्तम प्रशासक होता. तरीसुद्धा लवंगांच्या झाडांच्या विचारांनी तो पछाडला होता. यावेळी त्याने आपल्या दोन बोटी मोलुक्का येथे पाठविल्या. मोलुक्कामधील प्रमुख अधिकारी या धाडसी फ्रेंच तरुणाला विसरले नव्हते. डचांचा कडक पहारा असूनसुद्धा मोलुक्कामधील अधिकाऱ्यांनी सर्व प्रकारच्या मसाल्याच्या पदार्थांची रोपे आणण्यास पिअरच्या कप्तानाना मदत केली. ला रियुनियन La R'eunion या बेटावर राहणाऱ्या Sieur Hubert सिअर ह्यूबर्ट याच्या ताब्यात पाच लवंगांची रोपे दिली होती. परंतु तिथल्या बगीच्यातील मत्सरी अधिकाऱ्याने हेतूपूर्वक त्या रोपांची नासधूस केली. त्यातील फक्त एक रोप वाचले. पण त्या रोपाला भरपूर लवंगा लागल्या. मॅडॅगॅस्करमधील ला रियुनियन आणि सेंत मारी या बेटांवरील एकूण एक लवंगांच्या झाडांचे ते 'पूर्वज' किंवा मूळ झाड ठरले. या मूळ झाडापासून तयार केलेली इतर रोपे Caynne San Domingo सॅन डॉमिंगो आणि Martiniqne मार्टिनिक येथे पाठवण्यात आली.

बोरबाँ येथील लवंगांची रोपे झांझिबार येथे नेण्यात आली. झांजिबारचे हवामान आणि जमीन लवंगांच्या झाडाला इतकी अनुकूल ठरली की अल्पकाळात ते बेट म्हणजे लवंगा निर्माण करणारे जगातील प्रमुख केंद्र ठरले ! विमानांचा शोध लागला नव्हता तेव्हां सागरी सफर हाच दळणवळणाचा प्रमुख मार्ग होता. "झांझिबार बेट जवळ आल्याचा इशारा लवंगांच्या मंद मंद सुगंधयुक्त मरुत देत असे." अशी वर्णने बोटीवरील प्रवाशांनी करून ठेवली आहेत यावरून झांझिबारमधील लवंगांच्या प्रचंड उत्पादनाची आपल्याला कल्पना येते.

अखेर पिअर पॉइव्ह लवंगांची रोपे आणण्यात आणि रुजवण्यात यशस्वी झाला. आपल्या ध्येयपूर्तीचे समाधान आणि आनंद त्याला स्वत:ला निश्चितच झाला. परंतु फ्रेंच प्रशासनाने मात्र त्याबाबत उदासीनता दाखविली. त्यामुळे इ. स. १७७३ साली तो डिजों Dijon येथे निवृत्त झाला आणि तेरा वर्षानंतर तेथेच त्याने या जगाचा निरोप घेतला. मॅडेगॅस्कर, Comores कॉमोरस आणि Seychlles सेचिलिस येथील सर्व लवंगांची झाडे पिअरनं आणलेल्या मॉरिशस आणि ला रियुनियन या बेटावरील झाडांची 'वंशावळ' आहेत. ही लवंगांची झाडे पिअर पॉइव्हच्या अथक प्रयत्नांची साक्ष देतात. ती झाडे हेच त्याचे स्मारक होत !

**भारतीय संदर्भ**

रामायण, चरकसंहिता, सुश्रुतसंहिता व महाकवी कालीदासच्या संस्कृत काव्यात व नाटकात लवंगेचा उल्लेख आढळतो. प्राचीन काळापासून भारतीयांना 'लवंग' हा मसाल्याचा पदार्थ माहित होता. संस्कृतमध्ये लवंगेला 'देवकुसुम' असेही म्हणतात. मॅले भाषेत बंग 'Bunga' म्हणजे लवंग.

या 'बंग'वरूनच 'लवंग' हे नाव आले असावे.प्राचीन काळातील युरोपीय विद्वानांची ज्ञानग्रहणाची भाषा लॅटिन आणि लॅटिनमध्ये Clavus क्लेव्हस म्हणजे खिळा.खिळ्यासारखी दिसणारी म्हणून Clove क्लोव्ह !

'कल्याण' या मध्य भारतांतील प्रदेशाचा राजा सोमेश्वर (इ. स. ११३०) याने लिहिलेल्या 'मानसोल्हास' या ग्रंथात विड्याच्या संदर्भात लवंगांचा उल्लेख आढळतो. तत्कालीन अमीर, उमराव, राजघराण्यातील मंडळी भोजनोत्तर लवंग, वेलची, जायफळ, जायपत्री आणि कापूर ही पाच सुगंधी द्रव्ये घातलेला विडा (तांबूल) खात असत, असा विडा रसिकांना प्रिय असे अशी वर्णने त्या ग्रंथात होती. लोणची, केचप, सॉस यात स्वादाकरता लवंगा घालतात. बहुतेक सर्व मांसाहारी पदार्थात 'लवंग' हा मसाल्याचा पदार्थ कमी अधिक प्रमाणात असतोच ! तिखटपणा व सुवास यामुळे लवंगाचा वापर केक, पुडिंग, शिरा, खीर, साखरभात, अळीव लाडू इत्यादी पदार्थात फार पूर्वीपासून केला जात आहे.

वैद्यकशास्त्रांत लवंगांचा वापर पुरातन आहे. लवंग सुगंधी, उत्तेजक व वायुनाशक असल्याने जठरांतील दाहावर आणि भूक वाढविण्यास देतात. मळमळ, शिसारी, वांती आणि पोटातील गॅस यासारख्या तक्रारीवर लवंग तोंडात धरण्यास देतात किंवा लवंगेची पूड करून चाखतात. वाइन, शँपेन, ब्रँडी, बिअर या मद्यांमध्ये लवंग, दालचिनी व इतर मसाल्याचे पदार्थ घालून उकळवतात. अशा मद्यांना 'बर्न्ट' हे विशेषण लावतात. बर्न्ट वाइन, बर्न्ट शँपेन इ. सकाळच्या वेळी, विशेषत: हिवाळ्यात युरोपियन असे मद्य अगदी थोड्या प्रमाणात व सावकाश घेत असत. त्यामुळे पोटाच्या बारीकसारीक तक्रारी दूर होतात असा त्यांचा समज असे.

१९६० सालापर्यंत लवंगांच्या उत्पादनात झांझिबार, मॅलॅगॅसी हे आघाडीवर होते आणि इंडोनेशियाचा क्रमांक तिसरा होता. १९६० नंतर झांझिबारमधील राजकीय परिस्थिती बदलली. त्याचा परिणाम लवंगांच्या उत्पादनावर झाला असावा. झांझिबारमधील कित्येक लवंगांच्या झाडांना सूडोमोनास सिझिजी (Pseudomenco syzygii) या जिवाणूंमुळे होणारा 'सुमात्रा' रोग झाला. हे जंतू झाडाच्या मुळांतील जलवाहिन्या नष्ट करतात. अर्थात् जमिनीतील पाणी शोषून ते संपूर्ण झाडाला पुरवणाऱ्या जलवाहिन्यांचे कार्य बंद पडल्यामुळे संपूर्ण झाड मरते. या रोगाची लागण झाल्यामुळे झांझिबारमधील व्यापाऱ्यांचे अतोनात नुकसान झाले व तेथील लवंगांच्या उत्पादनात प्रचंड घट झाली.

हल्ली तयार होणाऱ्या लवंगांच्या उत्पादनापैकी बराचसा भाग 'क्रेटेक सिगरेट्स' तयार करण्यासाठी वापरतात. या सिगारेट्स तयार करताना तंबाखूच्या वजनाच्या ३० ते ४०% भाग वाळवलेल्या आणि बारीक तुकडे केलेल्या लवंगा वापरतात. Kretek क्रेटेक सिगरेट्सची निर्मिती प्रामुख्याने इंडोनेशियात होते आणि त्यांचा वापरही त्याच देशात सर्वाधिक होतो. त्यामुळे क्रेटेक सिगरेट्सचे सर्वाधिक कारखाने इंडोनेशियात आहेत आणि दिवसेंदिवस त्यांची संख्याही वाढते आहे. म्हणजे इंडोनेशिया हा लवंगांचा सर्वाधिक उत्पादक आणि ग्राहक आहे.



अनुक्रमणिका

इंडोनेशियात तेथील देशबांधवांची लवंगांची वाढती मागणी लक्षात घेऊन १९६० पासून शास्त्रीय तत्त्वावर आधारित लवंगांच्या झाडाची लागवड करण्यात आली. लवंगांच्या उत्पादनाच्या बाबतीत स्वयंपूर्ण व्हावे हा यामागील उद्देश होता. त्यामुळे लवंगांचे उत्पादन खूप वाढले. लवंगांच्या उत्पादनाच्या बाबतीत इंडोनेशिया प्रथम क्रमांकावर आहे. १९८६ साली जागतिक लवंगांचे उत्पादन ५५ ते ६० हजार टन होते. त्यावर्षी एकट्या इंडोनेशियातील लवंगांचे उत्पादन ३५ ते ४० हजार टन होते ! आता इंडोनेशियाला प्रतिवर्षी पन्नास हजार टन लवंगा लागतात आणि इसवी सन २००० सालापर्यंत ही मागणी १ लक्ष टनावर जाईल असा तज्ज्ञांचा अंदाज आहे. ही अपेक्षित मागणी पूर्ण करण्यासाठी वनस्पती शास्त्रज्ञ लवंगांच्या झाडावर प्रगत संशोधन करीत आहेत. लवंगात गुणसूत्रांच्या एकूण ११ जोड्या असतात. (२ n = २२) जनुकशास्त्रज्ञ उत्तम पीक देणाऱ्या व जास्तीत जास्त रोगप्रतिकारक शक्ती असणाऱ्या रोपांची निर्मिती करण्याचा प्रयत्न करीत आहेत. लवंगांचे पीक अनियमित असते. एखाद्या वर्षी उत्पादन समाधानकारक होते तर एखाद्या वर्षी कोणतेही सबळ कारण नसताना उत्पादन घटते. याही अडचणीवर मात करण्याच्या दृष्टीने तज्ज्ञ कार्यरत आहेत.

**नावाजलेल्या व्यापारी संस्था**

वास्को दि गामा, अल्बुकर्क, सेराओ यांनी अनुक्रमाने केलेल्या धाडसी सफरीमुळे पोर्तुगीजांना मोलुक्काचा आणि लवंगांच्या झाडाचा शोध लागला आणि युरोपमधील अनेक देशांचे लक्ष या बातमीने वेधून घेतले. इंग्रजांना लवंगांचे आकर्षण वाटले आणि लवंगांच्या व इतर मसाल्याच्या पदार्थांच्या उत्पादक देशांवर कब्जा मिळवण्यासाठी त्यांची धडपड सुरू झाली. साहसी, शूर आणि सागरी सत्तेत श्रेष्ठ ठरलेले डच दर्यावर्दी या स्पर्धेत उतरले आणि आपल्या सागरी सामर्थ्याच्या मस्तीत, दंडेलशाही वृत्तीने त्यांनी या प्रांतावर आपला जुलमी अंमल प्रस्थापित केला. "या स्पर्धेत मागे राहून कसे चालेल?" असे वाटून फ्रेंच या स्पर्धेत उतरले. या सर्व देशांनी आपापल्या व्यापारी संस्था स्थापन केल्या. या व्यापारी संस्थांचा इतिहास आपल्या नाट्यातील लवंगेभोवती गुंफला गेला असल्यामुळे तो वाचकांना उद्बोधक ठरेल असे वाटते. तो इतिहास येथे देत आहे.

इ. स. १५८७ साली इंग्लंडचा भावी ॲडमिरल फ्रान्सिस ड्रेक कार्डीझहून समुद्रसफरीवर निघाला. कार्डिझ येथे अनेक गलबते उभी होती. संपूर्ण जगाच्या दुसऱ्या सफरीवर असताना फ्रान्सिसने पश्चिम अमेरिकेच्या किनारपट्टीवरील स्पॅनिश वसाहती उद्ध्वस्त केल्या होत्या. त्याचीच पुनरावृत्ती त्याला कार्डिझ येथे करावयाची होती. फ्रान्सिसचे नशीब जोरावर होते. बेसावधपणे त्याचा मार्ग ओलांडणाऱ्या पोर्तुगीज जहाजाला फ्रांन्सिसने ताब्यात घेतले. त्यावरचा सर्व माल जप्त केला आणि बोटीवरची सर्व महत्त्वाची कागदपत्रे हस्तगत केली. याच कागदपत्रांत भारत आणि अतिपूर्वेकडील बेटावरील व्यापाराची महत्त्वाची माहिती होती.

हे सर्व कागदपत्र घेऊन तो लंडनला परतला. आणि लंडनच्या व्यापाऱ्यांपुढे त्याने ती

माहिती सादर केली. त्यामुळे लंडनच्या व्यापाऱ्यांच्या मनात अतिपूर्वेकडील देशांशी व्यापार करण्याची तीव्र इच्छा निर्माण झाली आणि तशी व्यापारी संस्था स्थापण्याचा संकल्प त्या व्यापाऱ्यांनी केला. 'संकल्प आणि सिद्धी यात अंतर असते' याची प्रचीती त्या व्यापाऱ्यांना आली. संकल्पानंतर तेरा वर्षानी ३१ डिसेंबर १६०० साली ईस्ट इंडिया कंपनीची स्थापना झाली. पहिल्या ॲलिझाबेथ राणीने ईस्ट इंडिया कंपनीला राजाश्रय दिला. 'दि गव्हर्नर अँड कंपनी ऑफ मर्चंटस् ऑफ लंडन, ट्रेडिंग इनटू दि ईस्ट इंडिज' या नावाने या कंपनीचा कारभार सुरू झाला. या कंपनीला आफ्रिका आणि अमेरिकेशी व्यापार करण्याचा अधिकार दिला होता. कागदपत्रावर स्वतःचे शिक्कामोर्तब करणे, कारभारविषयक निर्णय स्वतंत्रपणे घेणे, स्वतःचे वीस अधिकारी आणि गव्हर्नर निवडणे याची त्यांना मुभा होती. फार मोठी रक्कम कंपनीला भांडवल म्हणून देण्यात आली. त्या भांडवलातून सुमारे १५० ते ६०० टन वजनाची पाच जहाजे विकत घेतली. प्रत्येक बोटीवर एका कप्तानाची नेमणूक केली. या कप्तानाना भारतातील गव्हर्नर् आणि सुंदा बेटावरील सुलतानांशी राणीच्या नावे व्यापारी करार करण्याची परवानगी दिली होती.

अशा तऱ्हेने अतिपूर्वेकडील व्यापारात इंग्लंडने ढवळाढवळ केल्यामुळे पोर्तुगीज आणि डच लोकांच्या मनात इंग्रजांविषयी कटुता निर्माण झाली. व्यापारी कंपन्यांच्या या आपापसातील चुरशीमुळे मोठ्या प्रमाणावर व्यापार करण्याची आणि ते प्रदेश काबीज करण्याची ईर्षा निर्माण झाली. ही ईर्षा त्या देशांतील रहिवाशांना धोकादायक होतीच पण त्या देशांतील सरकारला या कंपन्यांच्या कारभारावर नियंत्रण ठेवणे फारच कठीण होते. मसाल्याच्या पदार्थांचा व्यापार करणारी साम्राज्ये रक्तलांच्छित झाली होती. एकोणिसाव्या शतकातील नावाजलेला अर्थतज्ज्ञ आणि ऑक्सफर्डमधील राजकीय अर्थशास्त्राचे प्राध्यापक जेम्स रॉजर्स यांचे मत लक्षात घेण्यासारखे आहे. ते म्हणाले, "राजघराण्यांतील युद्धापेक्षा 'लवंग' या मसाल्याच्या पदार्थामुळे अधिक रक्तपात झाले !"

या कंपनीला सुरुवातीपासून फायदा होत गेला. त्यांनी सुरतेला आपले बस्तान बसविले आणि भारतातील व्यापाराचा श्रीगणेशा केला. पोर्तुगीज आणि डच हे एकमेकांना हुसकावण्याचा प्रयत्न करत होते. त्यांना इंग्रजांचे हे धोरण रुचले नाही. मसाल्याच्या पदार्थांच्या व्यापाराची संपूर्ण मक्तेदारी आपल्याकडे रहावी या उद्देशाने २ मार्च १६०२ रोजी डचांनी 'डच ईस्ट इंडिया' कंपनीची स्थापना केली. या कंपनीचा प्रमुख म्हणून Cornelius Houtman कॉर्नेलिअस हाऊटमन याची नेमणूक केली. कॉर्नेलिअसला लिस्बन आणि जावा येथील व्यापाराचा प्रदीर्घ अनुभव होता. त्याने अत्याधुनिक धोरणाचा अवलंब केला. डचानी आपल्या प्रतिस्पर्ध्याप्रमाणे (इंग्रजांप्रमाणे) मोठ्या व्यापाऱ्यांची एकच संघटना तयार केली नाही. आपल्या कंपनीत डचांनी छोट्या छोट्या स्थानिक पण स्वायत्त संस्थांचा समावेश केला. एखाद्या छोट्याशा बीजातून प्रचंड वृक्ष निर्माण व्हावा त्याप्रमाणे या छोट्या छोट्या संस्था संघटित होऊन लक्षणीय भांडवल जमा

करीत असत.

डच ईस्ट इंडिया कंपनीने मोलुक्काज (मसाल्याची बेटे) वर आणि तेथील लवंगांच्या झाडावर मालकीहक्क प्रस्थापित केला. वरवर पाहता लोकशाहीचा पुरस्कार करणारी डच ईस्ट इंडिया कंपनी ही शक्तिमान सर्वकष सत्ता ठरली. ज्या ठिकाणी सहजतेने पाळत ठेवता येईल अशा जागा निवडून डचांनी तेथे लवंगांची झाडे लावली. स्थानिक लोकांना मात्र लवंगांची झाडे लावण्याची बंदी होती आणि तसा प्रयत्न जर कोणी केला तर त्याला शिक्षा होती देहदंडाची! मोलुक्का आणि आसपासच्या बेटावरील ज्या राजपुत्रांनी डचांच्या या दंडेलशाही धोरणाला विरोध केला त्यांना डचांनी वेगवेगळ्या किल्ल्यात बंदिस्त केले. लवंगा, जायफळे चोरट्या पद्धतीने कोणी विकत आहे असा संशय आला तर त्या व्यक्तीचा कंपनीचे अधिकारी अनन्वित पद्धतीने छळ करीत असत.

डच ईस्ट इंडिया कंपनीकडे पराक्रमी आणि साहसी खलाशी होते आणि जागतिक कीर्तीचे हिशेब तपासनीस होते. त्यामुळे सागरी सत्ता बळकावणे आणि पूर्वेकडील देशांत ठिकठिकाणी व्यापारी केंद्रे स्थापना करणे डचांना सहज शक्य झाले. डचांची सागरावरील अधिसत्ता इतकी प्रभावी होती की त्यांच्या एका बोटीवरील कप्तानाने थेम्स नदीत शिरण्याचे धाडस दाखविले. त्याच्या या बोटीबरोबर इतर अनेक बोटींचा ताफा होता आणि प्रमुख बोटीवर झाडू लावला होता. "हॉलंडने सर्व सागरी सत्ता हस्तगत केली आहे" हा अर्थ त्यातून ध्वनित होत होता. हॉलंड ही सर्वाधिक सामर्थ्यवान सागरी सत्ता असल्यामुळे डच ईस्ट इंडिया कंपनीला कोणाचीच भीती वाटत नसे. त्यांचा कारभार स्वतंत्रपणे चालत असे. जावा, मलाक्का, सिलोन, सेलीवस्न् यावर त्यांनी ताबा मिळवला. पूर्वी अरब आणि इटालियन लोकांच्या ताब्यात असलेली मलबारच्या किनाऱ्यावरील काही बंदरेसुद्धा त्यानी काबीज केली. आपल्या दोनशे बोटींचा ताफा एवढ्या प्रचंड व्यापारावर नियंत्रण ठेवायला डचांना अपुरा पडत असला तरी सागरी सत्ता टिकवून धरण्यास तो पुरेसा होता. जेसुइट पंथाचे स्पॅनिश लोक जपानमध्ये रहात असत. आपल्या सर्व व्यवहाराबाबत ते कमालीची गुप्तता पाळत. या स्पॅनिश लोकांच्या मदतीने डचांनी जपानी लोकांबरोबरही व्यापारी करार केला.

अँबन किंवा अँबॉइन हे पूर्व इंडोनेशियातील डोंगराळ बेट असून मोलुक्का बेटाचे राजधानीचे ठिकाण आहे. या प्रदेशावर डचांचे साम्राज्य होते. डच तेथे अत्यंत मगरूरीने आणि क्रौर्याने वागत असत. इ. स. १६५० च्या सुमारास अँबॉइन येथे डचांनी अनेक माणसांची कत्तल केली. आता मात्र डचांच्या पापाचा घडा भरला होता. इंग्लंडमध्ये यावेळी क्रॉमवेल या इंग्लिश जनरलची (इ.स. १५९९ ते १६५८) अत्यंत प्रभावी कारकीर्द चालू होती. क्रॉमवेलच्या काळात कॉमनवेल्थ ही जगातील प्रमुख प्रोटेस्टंट सत्ता बनली. त्याने या कत्तलीच्या नुकसानभरपाईपोटी प्रचंड रक्कम डचांकडून वसूल केली. इंग्लिश ईस्ट इंडिया कंपनीने आपले लक्ष भारतात विशेषत: मद्रास आणि हुबळी येथे केंद्रित केले होते आणि भारतात आपले हातपाय पसरण्यास सुरुवात केली

होती. इ. स. १६५७ साली दुसऱ्या चार्लस्ने ईस्ट इंडिया कंपनीचे नूतनीकरण केले. लवकरच ईस्ट इंडिया कंपनी इंग्लंडमधील उपसत्ता बनली ! इ.स. १६९८ साली आणखी एका कंपनीची स्थापना झाली. दोन कंपन्या एकमेकांच्या प्रतिस्पर्धी बनल्या. प्रचंड भांडणे, वादविवाद होऊन अखेर दोन्ही कंपन्या एकमेकीत विलीन झाल्या आणि संघटित ईस्ट इंडिया कंपनीची स्थापना झाली. त्यांनी भारतात खूप जमिनी खरेदी केल्या. चहाच्या व्यापारावर लक्ष केंद्रित करून खूप पैसा मिळवला आणि तरुण पिढीसाठी नवे कार्यक्षेत्र निर्माण केले. याचा फायदा मात्र प्रतिष्ठित श्रीमंतांच्या खुशालचेंडू व नालायक मुलांनी घेतला !

मसाल्यांच्या पदार्थांच्या आंतरराष्ट्रीय व्यापारात डच आणि इंग्रजांची चुरस चालूच राहिली. इंग्लंडची गंगाजळी वाढली तेव्हा डच काहीसे मागे पडले आणि डचांचे पारडे जड झाले तेव्हा इंग्रजांची व्यापाराकडील पकड ढिली झाली. इ. स. १६९७ हे साल डचांच्या दृष्टीने सर्वनाशाचे ठरले. दक्षिण आफ्रिकेजवळील हिंदी महासागरातील मॅडॅगॅस्कर बेटांवर आपल्या वसाहती स्थापना करण्याचा फ्रेंचांचा प्रयत्न दोनदा फसला होता. पण या अपयशाने खचून न जाता इ. स. १६६४ साली 'कोल्बर्ट' या चौदाव्या लुईच्या दरबारातील एका अधिकाऱ्याने पुन्हा एक नवीन कंपनी स्थापन केली. डच आणि इंग्रज व्यापारी हे आपापसातील भांडणे, हेवेदावे सोडविण्यात इतके गुंतले होते की या नवीन फ्रेंच कंपनीची दखलसुद्धा त्यानी घेतली नाही. मसाल्याच्या पदार्थाच्या व्यापारातून जी अलोट संपत्ती डच, इंग्रजांना मिळाली त्यात आपल्यालासुद्धा काही हिस्सा मिळावा असे फ्रेंच ईस्ट इंडिया कंपनीला वाटत होते. कोल्बर्टने या कंपनीला ५० वर्षांची सनद दिली आणि दरवर्षी ४० लाख लिव्हर्सचे अर्थसहाय्य दिले. उष्ण कटिबंधातील प्रदेशात राहण्याचा, तेथील लोकांच्या मानसिकतेशी जुळवून घेण्याचा अनुभव असलेले व्यापारी, प्रशासक आणि लोकांनी या संधीचा फायदा घ्यायला हवा होता. त्याऐवजी अमीर उमरावांच्या आळशी, उडाणटप्पू आणि छानछोकीत राहाणाऱ्या मठ्ठ मुलांनी कंपनीचा कारभार पाहण्यास सुरुवात केल्यामुळे कंपनी रसातळाला गेली. इ. स. १७१४ साली फ्रेंच ईस्ट इंडिया कंपनीला ५०० लक्ष लिव्हर्सचे कर्ज झाले. तेव्हा फ्रेंच बँकरने इ. स. १७१९ साली कंपनीचा ताबा घेतला.

फ्रेंच ईस्ट इंडिज आणि चीनमधील फ्रेंचांची कंपनी या दोन्ही एकमेकीत विलीन झाल्या आणि ही फ्रेंचांची मोठी कंपनी झाली. कंपनीने आता आपले लक्ष तंबाखूच्या व्यापारावर केंद्रित केले. पण त्यासाठी नेमलेले सर्व अधिकारी वैयक्तिक मालमत्ता वाढविण्याच्या उद्योगात रमल्यामुळे याही व्यवहारात कंपनीला तोटा झाला. इ. स. १७३१ पासून कंपनीने आपले सर्व लक्ष अतिपूर्वेकडील व्यापारावर केंद्रित केले. कार्डिनल फ्ल्युरीने बराच निधी कंपनीच्या कारभारासाठी उपलब्ध करून दिला आणि कार्यक्षम अधिकाऱ्यांची नेमणूक केली. त्यामुळे थोड्याच कालावधीत पाँडेचरी, चंद्रनगर याबरोबर Mahe माहे, Karikal कारिकल, Yanam यानम हे प्रदेश फ्रेंच ईस्ट इंडिया कंपनीने ताब्यात घेतले. मॉरिशस हा भारतात जाण्याच्या सागरी मार्गावरील महत्त्वाचा टप्पा होता. म्हणून Mahe de la Boudonnais माहे दि ला

बोदोने या कार्यक्षम अधिकाऱ्याची मॉरिशसचा गव्हर्नर म्हणून नेमणूक केली. बोर्दोने स्वखर्चाने लढाऊ गलबतांचा ताफा सागरी सत्ता मिळवण्याकरता वापरला आणि मद्रास बंदर ताब्यात घेतले. परंतु त्याचे हे स्वतंत्र वागणे कंपनीला रुचले नाही. थोड्याच दिवसात त्याला फ्रान्सला परत बोलावण्यात आले आणि बिनबुडाचे आरोप त्याच्यावर लादून त्याला बॅस्टिलच्या तुरुंगात टाकण्यात आले. त्याच्या जागी 'द्युप्ले' या नवीन अधिकाऱ्याची नेमणूक झाली. द्युप्लेने चंद्रनगरचे मोठ्या व्यापारी केंद्रात रुपांतर केले आणि अनेक भारतीय राज्यकर्त्यांशी मैत्रीचे संबंध प्रस्थापित केले. भारतीय राज्यकर्त्यांनासुद्धा इंग्रजांपासून आपली सुटका करून घ्यायची होती. काट्याने काटा काढण्याचे तंत्र त्यानी अवलंबिले आणि या मैत्रीसाठी हात पुढे करून सहकार्य केले. द्युप्लेचे हे धोरण फ्रेंच ईस्ट इंडिया कंपनीला पसंत पडले नाही. त्यालासुद्धा मायदेशी परत बोलावण्यात आले. इ. स. १७६९ साली कंपनीची एकाधिकारशाही संपुष्टात आली आणि इ. स. १७९१ साली कंपनीची सनदही बंद झाली.

यानंतर सात वर्षांनी हॉलंड व इंग्लंड यांच्यातील युद्धामुळे डच ईस्ट इंडिया कंपनीसुद्धा बंद पडली. इ. स. १७८४ साली पिट्स् इंडिया करारानुसार इंग्लिश कंपनीचे राष्ट्रीयीकरण झाले. इ. स. १८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धानंतर भारताचा कारभार कंपनीकडून काढून राणीकडे सोपवण्यात आला. अशा तऱ्हेने डच, पोर्तुगीज, फ्रेंच आणि ब्रिटिश ईस्ट इंडिया कंपनी या सर्वांनी लवंगांच्या व्यापाराचा रोचक इतिहास घडवला.

## जायफळ (Nutmeg) आणि जायपत्री (Mace)

मसाल्याच्या पदार्थातील 'जायफळ' हे नाव थोडेसे फसवे आहे. नावावरून हे झाडाचे 'फळ' असावे वाटले तरी प्रत्यक्षात फळांतील 'बी' मसाल्याचा पदार्थ म्हणून वापरली जाते. संस्कृतमध्ये जायफळाला मातलीफलम् किंवा जातिफलम् म्हणतात. मनुस्मृतीत 'जायफळ' या मसाल्याच्या पदार्थाचा उल्लेख आढळतो. अन्य संस्कृत वाङमयात इसवीसनाच्या सहाव्या शतकापासून या मसाल्याच्या पदार्थाचे संदर्भ सापडतात. बहुतेक भारतीय भाषातील जायफळाची नावे 'जातिफलम्' या संस्कृत नावाशी साम्य दर्शवतात.

लवंगेप्रमाणेच 'मोलुक्का' हे जायफळाचे जन्मस्थान असले तरी लवंगेप्रमाण 'जायफळाने' जन्मस्थानाचा निरोप घेतलेला नाही. मोलुक्कात आता लवंगाचे उत्पादन होत नाही परंतु तेथे जायफळाची झाडे मात्र भरपूर प्रमाणात आढळतात.

जायफळाचा वृक्ष सुमारे ९ ते १२ मीटर उंच असतो; तर काही झाडे २० मीटर इतकी उंच असतात. मिरिस्टिकॅशिओ 'Myristicaceae' या वनस्पती कुटुंबातील झाडाचे शास्त्रीय नाव आहे Myristica fragrans मिरिस्टिका फ्रॅग्रन्स. हे उष्ण कटिबंधातील सदाहरित झाड असून त्याची पाने चिवट, मोठी, एकांतरित (एका आड एक) आणि सुगंधित असतात. झाडावरील

फुले सुगंधी आणि फिकट पिवळट आणि एकलिंगी असतात. जायफळाचा वृक्ष एकलिंगाश्रयी (Dioecious) असतो. म्हणजेच जायफळाचा वृक्ष पुल्लिंगी किंवा स्त्रीलिंगी असतो. पुल्लिंगी झाड प्रत्यक्ष फलधारणा करीत नाही. म्हणून काही ठिकाणी पुल्लिंगी झाडावर स्त्रीलिंगी झाडाच्या फांद्यांचे कलम करतात. फलधारणेच्या दृष्टीने हे झाड उपयोगी ठरावे हा 'व्यापारी' उद्देश या पद्धतीमागे असतो. परंतु बहुतेक ठिकाणी स्त्रिलिंगी आणि पुल्लिंगी वृक्षांचे प्रमाण २०.१ असे ठेवतात. वारा हे परागवहनाचे माध्यम असल्यामुळे या एका पुल्लिंगी वृक्षावरील फुलांतील पुबीजे त्या वृक्षाच्या 'जनानखान्यांतील' वीसही स्त्रीलिंगी वृक्षावरील फुलांचे फलन घडवून आणतात.

जायफळाची फळे प्रथम पिवळी असतात पण पुढे तांबूस होतात. ती 'ड्रुप' या प्रकारात मोडतात. फळे गोलाकार, पेरूसारखी मांसल, एकाकी, जोडीने किंवा ४–५ च्या झुबक्यांनी येतात. ती लोंबत राहतात व पुढे तडकून दुभंगतात. बी लंबगोल असून बाह्यकवच काळपट, चॉकलेटी रंगाचे व कठीण असते. या कवचाभोवती गर्द शेंदरी जाळीदार बाह्यावरण असते. हे बाह्यावरण म्हणजेच जायपत्री. सर्वसाधारणपणे सातव्या वर्षी जायफळाचे झाड वयात येते. प्रत्येक झाडाला दरवर्षी हजार– बाराशे फळे येतात. कित्येक झाडाना ४ ते ६ हजार फळे येतात तर काही जायफळाच्या झाडांना वीस हजार जायफळे लागल्याचा उच्चांक नमूद केला गेला आहे. कित्येक वर्षे जायफळाचे झाड फळे देत राहते. काही जायफळाच्या वृक्षांना वयाच्या सतर ते ऐंशी वर्षांपर्यंतही फळे आल्याची उदाहरणे आहेत. 'म्हातारा इतुका न अवघे पाऊणशे वयमान' असे जायफळाच्या झाडाच्या बाबतीत म्हणण्यास काहीच हरकत नाही!

जायफळाच्या फळाचा गर खातात किंवा त्यापासून मुरांबे किंवा जॅम तयार करतात. फळातील तुकतुकीत चकाकणारी चॉकलेटी बी आणि बीभोवतीची किरमिजी रंगाची जायपत्री वेगळी काढतात व सुमारे ६ ते ८ आठवडे उन्हात वाळवतात. या काळात मुख्य जायफळ आकरसते आणि बाहेरील कडक आवरणापासून वेगळे होते. त्यामुळेच जायफळ खुळखुळ्यासारखे वाजते. हे आवरण फोडल्यावर आंतील जायफळ लंबगोलाकृती फिकट चॉकलेटी रंगाचे आणि खडबडीत पृष्ठभागाचे असते. मोठी जायफळे १.२" लांब आणि ०.८" परिघाची असतात. जायफळाला उग्र वास आणि तिखट चव असते. जायपत्री तिखट, कडवट, तोंड स्वच्छ करणारी, रुचिकर व उष्ण असते. जायफळ विड्यात व पक्वान्नात सुवासासाठी घालतात. आयुर्वेदात जायफळ कामोत्तेजक, आतड्याचे आकुंचन करणारे– स्तंभक आणि वायुनाशी मानले जाते. अतिसार, वांत्या, उचकी, पोटफुगी इत्यादी विकारांवर जायफळ गुणकारी मानले जात

जायफळ आणि जायपत्री या दोन्हीत ७ ते १४ % आवश्यक तेले असतात. पिनीन Pinene कॅम्फीन Camphene आणि डायपेन्टीन Dipentene हे त्यातील प्रमुख घटक असून या तिन्हीचा एंपिरिकल फॉर्म्युला ( Empirical Formula) $C_{10}H_{16}$ असा असतो. जायफळापासून चरबीयुक्त पदार्थ काढतात. त्याला 'जायफळाचे लोणी' असे म्हणतात. यातील

प्रमुख घटक ट्रायमिरीस्टीन trimyristin C 45 H 86 O 6 हा असतो. या लोण्याचा उपयोग साबण व सुगंधित द्रव्ये तयार करण्यासाठी करतात. संधिवात, पक्षाघात, मुरगळणे इत्यादींवर लावण्याकरिता जी मलमे तयार करतात त्यात जायफळाच्या लोण्याचा उपयोग करतात.

मनुस्मृती आणि अन्य प्राचीन संस्कृत वाङ्मयातील उल्लेखावरून भारतीयांना जायफळाची माहिती फार पूर्वीपासून होती असे दिसून येते पण युरोपियनाना 'जायफळ' या 'परदेशी' मसाल्याच्या पदार्थाची ओळख इतर मसाल्याच्या पदार्थांच्या तुलनेत बऱ्याच उशिरा झाला. इसवी सनाच्या सहाव्या शतकात वाळवंटातील भटक्या अरबांनी– 'बदाऊन' लोकांनी बिझँटाइनच्या (सध्याचे इस्तंबूल) राजदरबारात जायफळ आणल्याचा खात्रीलायक उल्लेख आढळतो. पर्शियन भाषेत Muchk किंवा Meskhos मेरकॉस म्हणजे जायफळ. यावरूनच अरबांनी Mesk 'मेस्क' हा शब्द तयार केला. इतर मसाल्याच्या पदार्थाप्रमाणेच अरब जायफळाच्या व्यापारातील अडत्ये होते. अतिपूर्वेकडील देशातील जायफळे अरब युरोपियनापर्यंत पोचवीत असत. त्यामुळेच बहुतेक युरोपीय भाषातील जायफळाची नावे अरबांच्या 'मेस्क' या नावावरून घेतलेली आढळतात. आधुनिक फ्रेंच भाषेत Muscade 'मस्काद' तर इटालियन भाषेत Moscade मॉस्काद, जर्मन भाषेत Maskat मस्कॅट ही उदाहरणे वानगीदाखल पुरेशी आहेत. जर्मन भाषेत जायफळ आणि जायपत्री या दोन्हीला मस्कॅट हा एकच शब्द वापरत असले तरी जायफळाच्या तेलाला मात्र Macisol 'मॅसिसोल' असा खास शब्द आहे!

आतापर्यंत आपण अनेक मसाल्याच्या पदार्थांचा इतिहास पाहिला. बहुतेक सर्व मसाल्याच्या पदार्थांचा स्वयंपाकगृहातील प्रवेश औषधाच्या माध्यमातून झालेला दिसून येतो. जायफळही त्याला अपवाद नाही! मसाल्याच्या पदार्थांचे औषधी गुणधर्म लक्षात घेऊन युरोपीय लोक औषधे तयार करताना प्रथम ते पदार्थ वापरीत. औषधाद्वारे तो पदार्थ जनसामान्यापर्यंत पोचला की हळूहळू खाद्यपदार्थात त्याला स्थान मिळू लागे आणि एकदा त्या स्वादाची, चवीची चटक लागली की त्या पदार्थाशिवाय लोकांचे चालत नसे. जायफळाचा उपयोग माणसाला गुंगी आणण्यासाठी (Soporafic निद्रापक) करीत. त्या औषधाला 'निकोलायचे रेक्वीज' असे म्हणत. विषारी प्राण्याच्या विषावरचा उतारा म्हणूनही जायफळाचा उपयोग युरोपियनांना ठाऊक होता. त्या औषधाला युरोपीय 'सिल्व्हीयूचे थेराइक' असे संबोधत. 'वातहारक' हा जायफळाचा महत्त्वाचा गुणधर्म युरोपियनांच्या परिचयाचा होता. त्यानंतर पुडिंग्ज, केकस्, बिस्किटे, नानकटाई यासारख्या पदार्थांत जायफळाने प्रवेश केला आणि मानाचे स्थान मिळवले.

कोणतेही औषध ठराविक मात्रेमध्ये घेतले तर ते शरीराला उपकारक ठरते. परंतु त्याचा वाजवीपेक्षा अधिक प्रमाणात केलेला वापर अपायकारक होण्याची शक्यता असते. जायफळसुद्धा ठराविक प्रमाणात फायदेशीर वाटले तरी जास्त प्रमाणात ते हानिकारक ठरते. याची प्राचीन काळातील रोमनांना कल्पना होती. पुन्हा एकदा इटलीतील सॅलर्नो वैद्यकीय विद्यालयातील

तज्ज्ञांच्या मतांची नोंद घेणे आवश्यक ठरते. "एक जायफळ हे गुणकारी ठरते, दुसऱ्यामुळे तुम्हाला खचितच अपाय होईल आणि तिसरे वापरल्यास निश्चितच मृत्यू येईल" असा इशारा सॅलर्नो वैद्यकीय विद्यालयातील डॉक्टरानी जनसामान्यांना दिला होता. हीच विचारधारा मेनॅजिअरने आपल्या पाककृतींच्या पुस्तकात पुढे आणलेली दिसते. "जायफळ, जायपत्री आणि गॅरिंगल यांचा अधिक प्रमाणात वापर केल्यास डोके दुखते" अशी सावधगिरीची सूचना या पुस्तकात मुद्दाम लिहिली आहे. गॅरिंगल हा एक प्रकारचा आल्यासारखा पदार्थ असून खाद्यपदार्थ स्वादिष्ट करण्यासाठी तो वापरीत. लवंग, वेलची, मिरी ही आकाराने लहान असल्यामुळे एखादी लवंग किंवा वेलची खाद्यपदार्थात घातल्यास त्याचा सुगंध पदार्थाला स्वादिष्ट करण्यास पुरेसा होत असे परंतु या सर्वांपेक्षा जायफळ आकाराने खूपच मोठे असल्यामुळे "एखादे जायफळ" पदार्थात वापरणे चांगलेच धोक्याचे ठरते.

इ. स. एक हजारच्या सुमारास तत्कालीन सुप्रसिद्ध आणि निष्णात पर्शियन डॉक्टर Avicenna ॲव्हिसेन्ना याने जायफळाचा उल्लेख "बांडा या बेटावरील कठीण कवचाचे फळ" असा केला होता. बांडा हे मोलुक्कन बेटांच्या समूहातील बेट असून तेथे जायफळाचे अमाप पीक येते. 'बांडा' या अतिपूर्वेकडील बेटाचा युफ्रेटस नदीच्या पश्चिमेकडील प्रदेशातील हा प्रथम ऐतिहासिक उल्लेख असावा असे तज्ज्ञांना वाटते. इसवी सनाच्या पंधराव्या व सोळाव्या शतकात मसाल्याच्या पदार्थांचा व्यापार पोर्तुगीजांच्या ताब्यात होता. परंतु इ. स. १६५६ साली बांडा व अन्य मोलुक्कन बेटांवर आपला अम्मल प्रस्थापित करून डचांनी हा व्यापार हस्तगत केला. डचांच्या दंडेलशाही व हुकुमशाही वागणुकीचा वृत्तांत आपण लवंगेच्या इतिहासात पाहिला आहे. तेच धोरण डचांनी जायफळाच्या बाबतीतही चालू ठेवले. इतरदेशवासीयांनाच काय पण स्वत:च्या देशातील वनस्पतीशास्त्रज्ञांनासुद्धा डच रोपांची माहिती देत नसत. पिअर पॉइव्ह या फ्रेंच तरुणाच्या धाडसाचा इतिहास आपण लवंगेच्या संदर्भात अभ्यासला. पिअरच्या धाडसी बेताला पक्ष्यांनी अनमोल साहाय्य केले. आकाशात स्वच्छंदपणे विहार करणाऱ्या पक्ष्यांना डचांच्या कडक पहाऱ्याची काय पर्वा! अनेक पक्षी डचांच्या मालकीच्या जायफळाच्या वृक्षावरून जायफळे पळवीत आणि मोलुक्काच्या आसपासच्या बेटावरील प्रदेशात जाऊन फळे खाऊन "बिया" टाकीत. रानावनात पडलेल्या या बियांना अनुकूल पर्यावरण मिळाले की जायफळाची रोपे तयार! पिअरच्या दूतांची टेहळणी चालूच असे. त्याच्या तीक्ष्ण नजरेतून ही रोपे सुटत नसत. पिअरने हस्तगत केलेल्या अशा अनेक रोपांमुळे अन्य देशात जायफळाचा प्रचार व प्रसार होण्यास मदत झाली.

सतराव्या शतकाच्या अखेरीस युरोपियनांची मसाल्याच्या पदार्थाची आवड पराकोटीला पोहोचली होती. "तुम्हाला जायफळाचा स्वाद आवडतो का? जायफळाची पूड सगळ्या पदार्थात घालतात." असे Boileau बोईलो हा फ्रेंच पाकशास्त्रज्ञ लोकांना विचारीत असे. फ्रान्समध्ये जंगी

शाही मेजवान्यांच्यावेळी एक छोटीशी किसणी आणि जायफळ घेऊन एक मनुष्य हिंडत असे आणि एखाद्या व्यक्तीला पदार्थात अधिक प्रमाणात जायफळ हवे असल्यास ती गरज भागवीत असे! या काळातील एका धातुचित्रात एका बाजूला शाही मेजवानीचे दृश्य असून उरलेल्या अर्ध्या भागात जायफळाच्या झाडावरील फळे स्थानिक लोक पाडत आहेत असे दृष्य आहे. त्या चित्राखाली लिहिले आहे. "तुम्हाला जायफळे आवडतात. ती कशी वाढतात व गोळा केली जातात ते जाणून घ्या." युरोपीय देशातील जायफळाची लोकप्रियता पटवून देण्यास ही उदाहरणे पुरेशी आहेत. इटलीतील टस्कनी या भागात राहणारे लोक जायफळाचा उपयोग खाद्यपदार्थांचा स्वाद वाढविण्यास करीत असत. खाद्यपदार्थात जायफळ घातले की तो पचायला हलका होतो असा डचांचा समज असल्यामुळे त्यांच्या बहुतांश खाद्यपदार्थात जायफळाचा अंतर्भाव असतोच! क्युबेक हा पूर्व कॅनडातील फ्रेंचांनी व्यापलेला प्रदेश. खाद्यपदार्थात भरपूर जायफळ वापरण्याची फ्रेंचाची सतराव्या शतकातील सवय येथे आजही रेंगाळलेली दिसते. लेबॅनॉन, उत्तर आफ्रिका या देशाप्रमाणे इजिप्तमधील रहिवासीसुद्धा खाद्यपदार्थात भरपूर प्रमाणात जायफळ वापरतात. इजिप्शियन ममीजमध्यें प्रेते टिकवण्यासाठी जे अनेक मसाल्याचे पदार्थ वापरीत त्यात जायफळाचा समावेश होता. म्हणजे जायफळ वापरण्याची प्राचीन परंपरा इजिप्तला लाभली आहे. त्यामानाने आपण भारतीय जायफळाचा वापर काही विशिष्ट पदार्थातच करतो!

प्राचीन काळी डच लोक जायफळे टिकवण्यासाठी चुन्यात बुडवून ठेवीत. चुन्याच्या विरंजक गुणधर्मामुळे या जायफळाचा नैसर्गिक काळपट चॉकलेटी रंग जाऊन पांढरट रंग येत असे! पांढरट रंगाची अशी जायफळे खरेदी करण्याची डचांना एवढी सवय झाली की नैसर्गिक काळपट चॉकलेटी रंगाची जायफळे लोक खरेदी करीनात! शेवटी ग्राहकांच्या इच्छेला मान देण्यासाठी विक्रेत्यांना जायफळे चुन्यात बुडवावी लागली!

अठराव्या शतकाच्या उत्तरार्धात आणि एकोणिसाव्या शतकात डच आणि इंग्रजांनी अनेकदा या मोलुक्कन बेटांच्या समूहावर वर्चस्व प्रस्थापित केले. जायफळाच्या रोपांची मक्तेदारी फक्त या प्रदेशापुरती राहू नये म्हणून इंग्रजांनी एक उपाय योजला. त्यांनी जायफळाची या बेटांवरील रोपे मलेशियातील पेनांग येथे रुजवली. हा प्रयोग यशस्वी झाला आहे अशी खात्री पटल्यावर सिंगापूरमध्येही पेनांगची पुनरावृत्ती केली. येथील जमीन आणि हवामान जायफळाच्या वाढीला पोषक ठरले. पेनांग आणि सिंगापूर येथे जायफळाचे उत्पादन होऊ लागले. परंतु दुर्दैवाने इ. स १८६५ साली या रोपांना एक प्रकारच्या कवकाचे ( Fungi) संक्रामण (इन्फेक्शन) झाले आणि सर्वच्या सर्व झाडे या रोगाला बळी पडली!

आता मात्र जायफळाच्या रोपांचा प्रसार सर्व जगभर झाला आहे. दोन्ही गोलार्धातील उष्ण कटिबंधीय देशात जायफळाची रोपे वाढतात. सुमात्रा, जावा, बंगाल, वेस्ट इंडिज, ब्राझिल, कोलंबिया, सेंट्रल अमेरिका, मॅस्करीन्स, मॅडॅगॅस्कर या सर्व देशात जायफळाचे भरपूर उत्पादन

होते. 'बांडा' या बेटावर जायफळाची झाडे इतक्या विपुल प्रमाणात आढळतात की गंमतीने या बेटाला 'जायफळाची बाग' असे म्हणतात. वेस्ट इंडीजमधील Grenada ग्रीनाडा या बेटावर जायफळाच्या जागतिक उत्पादनाच्या ४० % उत्पादन होते. त्यामुळे 'जायफळाची बाग' हे नामाभिधान ग्रीनाडा बेटाला देणे अधिक संयुक्तिक होईल!

## वेलची कार्डमम Cardamom

कात, चुना आणि सुपारी घातलेला विडा हा सर्वसामान्यांचा पण जायपत्री, बदाम, केशर, वेलची इ. पदार्थ घातलेला 'त्रयोदशगुणी विडा' राजे रजवाडे, जमीनदार आणि अन्य श्रीमंत वर्गाच्या चैनीचा पदार्थ. सुग्रास भोजनानंतर असा विडा हवाच ! भोजनाची लज्जत वेलची केशरयुक्त विड्याच्या स्वादाने वाढते. प्रेयसीने प्रेमाने 'जमवून' दिलेला आणि प्रेमाचे प्रतीक असलेला असा विडा न रंगला तरच नवल ! फक्त विडाच कशाला, भारतीय भोजनातील पक्कान्ने आणि इतर गोड पदार्थांना वेलचीचा स्वाद आवश्यक असतो. अशा पदार्थांचे रूपरंग डोळ्यांना भावले आणि ज्ञानेंद्रियांनी त्याचा स्वाद मान्य केला की त्या पदार्थाच्या दर्जेदारपणाची अर्धी पोचपावती रसिकांकडून मिळाली असे समजण्यास काहीच हरकत नाही.

अशा या वेलचीची माहिती मिळविण्यासाठी पुन्हा एकदा आपल्याला आलं आणि हळदीच्या वनस्पती कुटुंबाकडे वळायला हवे. वेलचीचा सुद्धा समोवश झिंजिबरेशिअे या वनस्पती कुटुंबात होतो. कुटुंब एकच असले तरी आलं आणि हळदीप्रमाणे जमिनीखालच्या खोडासाठी हे झाड वाढवीत नाहीत. झाडाला येणाऱ्या छोट्या छोट्या फळांतील बियांसाठी हे झाड वाढतवतात. या बिया म्हणजेच वेलचीचे दाणे. वेलचीचे शास्त्रीय नाव 'इलेटारिया कारडॅमोमम.' (Elettaria Cardamomum.) दक्षिण भारत हे वेलचीचे जन्मस्थान. मोठ्या पानांचे बहुवार्षिक झाड सुमारे ५ ते २० फूट उंच वाढते. सुमारे ३ फूट उंचीवर या झाडाला फुलोरा येतो. या फुलोऱ्यात सुमारे २ इंच व्यासाची भरपूर फुले असतात. या फुलांच्या पाकळ्या हिरवट छटा असलेल्या असतात आणि पाकळ्यांतील रेषा जांभळट तर पाकळ्यांचे टोक पांढरट रंगाचे असते. परागीभवन आणि फलन झाल्यावर या फुलांचे छोट्या फळांत रुपांतर होते. सुमारे १ सें. मी. लांबी व तीन बाजू असलेल्या लंबगोलाकृती फळांत १५ ते २० गडद, लालसर चॉकलेटी किंवा चॉकलेटी काळ्या कोनाकृती बिया असतात. या बियांना वेलचीचा वैशिष्ट्यपूर्ण स्वाद असतो. ही फळे पूर्णपणे झाल्यावर झाडावरून काढतात व उन्हात वाळवतात तर कधी कधी कृत्रिम रीतीने गरम केलेल्य खोलीत ठेवतात. वेलचीला छोटेसे देठ राहिलेले असते, ते अगदी हलके असल्यामुळे 'वारवणी' पद्धतीने वेगळे करतात.

वेलचीच्या तीन प्रमुख जाती असतात. १) पांढरी वेलची – या फळाचे बाहेरील आवरण पांढरे असते. त्यांतील बियांना बेताचा स्वाद असतो. २) हिरवी वेलची – या फळांचे बाहेरील

आवरण हिरवट रंगाचे असते. ही जात म्हैसूरमधली असली तरी केरळमधील 'अल्लेप्पी' या गावी या वेलचीचे प्रचंड पीक काढतात म्हणून अल्लेप्पी वेलची या नावानेच ही वेलची प्रसिद्ध आहे. या बियांना वेलचीचा तीव्र स्वाद असल्यामुळे ही जात सर्वोत्कृष्ट समजली जाते. ३) बडी वेलची– अतिशय मोठ्या आकाराची (सुमारे १।। सें. मी. लांबी) ही वेलची वेगवेगळे मिश्र मसाले तयार करताना वापरतात. या वेलचीचे शास्त्रीय नाव आमोमम ॲरोमॅटिकम " Amomum Aromaticum" या वेलचीचे पीक प्रामुख्याने बंगाल आणि आसाममध्ये काढतात. प्राचीन संस्कृत वाङ्मयामध्ये हे वर्गीकरण केलेले आढळते. एला ही उत्तम वेलची तर एलिका म्हणजे बडी वेलची.

एलची, एलाची, वेलची हे मराठीतील समानार्थी स्त्रीलिंगी शब्द तर त्याच अर्थाचा वेलदोडा मात्र पुल्लिंगी. संस्कृतमध्ये एला, एलिका, गुजराथीत एलची कानडीत यार्लक्की तर,बंगालीत इलायच, हिंदीत इलायची अशी खूप साम्य असलेली वेलचीची भारतीय भाषिक नावे. वेलचीला मध्ययुगीन काळात युरोपमध्ये 'आमोमम' असे म्हणत असत. हे नाव वेलचीला कसे दिले गेले ते जाणून घेणे फार मजेशीर आहे. हिब्रु, अरेबिक, फोनेशियन, असिरीयन, बॅबिलोनियन या भाषांच्या गटाला सेमिटिक भाषा असे म्हणतात. या भाषा बोलणाऱ्या युरोपीयनांना वेलची हा मसाल्याचा पदार्थ खूपच आवडला आणि स्वाभाविकपणे त्यांच्या तोंडून उद्‌गार बाहेर पडले,"आमोमम् ! आमोमम् !" "फारच तीव्र ! फारच मसालेदार !" आणि त्यानंतर आमोमम हे वेलचीचे गुणदर्शक नाव सेमिटिक भाषांत रुढ झाले. आपण वॉटरक्रेस या भाजीचा इतिहास पाहिला आहे. या भाजीचे दुसरे नाव कारडॅमन (Kardamon) मसालेदार सुवास असलेली कारडॅमन ही भाजी ज्या पाणथळ जागी उगवते त्या जागेला काराद्रा Karadra असे म्हणतात. 'कारडॅमन' सारखा तीव्र वास असलेला पदार्थ म्हणून 'कारडॅमम' हे वेलचीचे नाव युरोपीय भाषांत रुढ झाले आणि शास्त्रीय नावाचाही एक भाग बनले.

व्हर्जिल हा रोमन कवी इ. स. पूर्व ७० ते १९ या कालखंडात होऊन गेला. त्याने तीन दर्जेदार खंडकाव्यांची निर्मिती केली होती. तो म्हणत असे,"असिरीयन वेलचीचे झाड कोणत्याही मातीत रुजेल." युरोपियनांना वेलचीची ओळख होण्यापूर्वीपासून बॅबिलॉन, थीब्ज, अथेन्स आणि रोम याठिकाणी वेलचीची विक्री होत असे. थिओफ्रेटस (इ. स पूर्व ३७० ते २८७) हा ग्रीक तत्त्ववेत्ता व शास्त्रज्ञ ॲरिस्टॉटलचा शिष्य होता. त्याने लिहिलेल्या वनस्पतीशास्त्रावरील ग्रंथात वेलचीचा उल्लेख केलेला आढळतो. डायोस्कोराइडसने इ. स. ६५ साली लिहिलेल्या 'मटिरिया मेडिका' Materia Medica या ग्रंथात "औषधासाठी वापरावयाचा पदार्थ" असे वेलचीचे वर्णन केले होते.

युरोपियनांना वेलचीची ओळख इतर मसाल्याच्या पदार्थाच्या मानाने बरीच उशिरा झाली. लॅटिन लेखकांना वेलची माहीत असली तरी वेलचीची वनस्पतीशास्त्रीय ओळख नव्हती.

प्लीनीलासुद्धा 'वेलची म्हणजे द्राक्षाच्या बिया' असे वाटत होते. अँटिफेनस हा ग्रीक विनोदी लेखक तिसऱ्या शतकाच्या अखेरीस होऊन गेला. ग्रीक लोक खाद्यपदार्थात वापरत असलेल्या पंचवीस प्रमुख पदार्थांची यादीच अॅंटिफेनसने दिली होती. त्यात मध, तीळ, चीज, क्रेस, लसूण, ऑलिव्ह, व्हिनेगार यासारखे अनेक पदार्थ असले तरी वेलचीचा उल्लेख नव्हता. म्हणजे तिसऱ्या शतकाच्या अखेरपर्यंत वेलची हा मसाल्याचा पदार्थ युरोपीय खाद्यपदार्थांत समाविष्ट झाला नव्हता.

परमेश्वराला प्रसन्न करण्यासाठी आपण ज्याप्रमाणे देवापुढे धूप जाळतो त्याप्रमाणे प्राचीन काळी ग्रीक आणि रोमन लोक परमेश्वरापुढे वेलची जाळत असत. मेणात वेलचीची पूड मिसळून ग्रीक आणि रोमनांनी मेणाच्या सुवासिक वड्या तयार केल्या होत्या. अशा सुगंधी वड्या जिप्सी लोक शिंपल्यात भरून ते शिंपले केसात माळत असत. अशा सुगंधी वड्या पिनेने कपड्यांना लावत असत. अशा तऱ्हेने ग्रीक व रोमन लोक वेलचीच्या सुवासाचा उपयोग सुगंधी द्रव्ये, अत्तरे याप्रमाणे करीत असत. सेंट जेरोम (इ. स. ३४२ ते ४२०) हा रोममधील पोप डॅमॅससचा सेक्रेटरी (इ. स. ३८२ ते ८५) होता. पुढे त्याने बॅथलहेम Bathlehem येथे नवीन धर्मपीठाची स्थापना केली. त्यां काळातील ख्रिश्चन धर्मगुरु वेलचीच्या वड्या कपड्यांना लावणे यासारख्या फॅशन्स करीत असत. सेंट जेरोम अशा फॅशन्स करणाऱ्या धर्मगुरूंवर दोषारोप करीत असे.

जेवल्यानंतर विशेषत: सामिष आहार घेतल्यावर तोंडाला कांदा लसणीचा वास येतो. म्हणून जेवल्यावर मुखवास म्हणून वेलचीचे दाणे चावले तर वेलचीच्या तीव्र सुगंधामुळे कांदा लसणीचा वास नाहीसा होतो हे युरोपियनांना माहीत होते. वेलची खाणे हा घशावरील सूज, खोकला यावरचा उपाय समजला जाई. वेलचीच्या जंतुनाशक गुणधर्मामुळे वेलची घशाला आरामदायी ठरते असा प्राचीन काळी युरोपियनांचा समज होता. पोटांतील जंत वेलची खाल्ल्यामुळे पडून जातात असेही ग्रीक आणि रोमनांना वाटत असे. अशा अनेक औषधी गुणधर्मांमुळे वेगवेगळ्या प्रकारची सॉस तयार करताना ग्रीक आणि रोमन वेलची वापरू लागले आणि वेलचीचा अंतर्भाव अन्नपदार्थांत होऊ लागला.

अेपिशिअसने लिहिलेल्या एका पाककृतीत वेलचीचा उल्लेख येतो. ट्रफल्स हे जमिनीखाली येणारे कवक युरोपियन लोक आवडीने खातात. त्याची माहिती आपण बटाट्याच्या वेळी करून घेतलीच आहे. ही ट्रफल्स टिकविण्यासाठी तेल व (Garum) याबरोबर वेलची वापरत असत. त्या काळात युरोपियनांना वेलचीच्या वाळवलेल्या काळ्या बियांपेक्षा हिरवट मऊ बिया अधिक आवडत असत. वाळलेल्या बियांपेक्षा अशी ताजी वेलची महाग असे. पांढऱ्या सॉसमध्ये शिजवलेले चिकन लीकच्या (कांद्यासारखी एक भाजी) दाट रसात घालत व स्वादाकरता त्यांत वेलची घालत. अप्रतिम चवीचा हा पदार्थ युरोपमध्ये लहान थोर गरीब श्रीमंत साऱ्यांनाच प्रिय असे. सेव्हिलचा

इसिओडोर याने इसवी सनाच्या सहाव्या शतकातील अत्त्यावश्यक मसाल्याच्या पदार्थाच्या याद्याच तयार केल्या होत्या. एका यादीत सर्व वनस्पतिजन्य पदार्थांचा समावेश होता. त्यात वेलचीचा उल्लेख 'आमोमम' असा केला होता. दुसरी यादी सुवासिक झुडुपांची होती. त्यात वेलचीचा समावेश 'कारडॅमम' या नावाने केला होता.

प्राचीन काळी हडाप्पा संस्कृतीनंतर भारतात आर्यांची संस्कृती उदयास आली. अनेक क्षेत्रांत आर्यांनी लक्षणीय प्रगती केली होती. शेतकीशास्त्रही त्याला अपवाद नव्हते. आलं, लसूण, मेथी, हळद या मसाल्याच्या पदार्थांचे ते स्वत: पीक काढीत असत. त्याचबरोबर मिरी आणि वेलची हे दक्षिण भारतातील मसाल्याचे पदार्थसुद्धा आर्य वापरीत असत. मनुस्मृतीत चार प्रकारच्या वेलचींचा उल्लेख येतो. त्यापैकी हिरवी वेलची सर्वात उत्तम असते अशीही नोंद मनुस्मृतीत आढळते. प्राचीन काळापासून दक्षिण भारतातील खाद्यपदार्थात मसाल्याच्या पदार्थांचा वापर अधिक प्रमाणात करण्याची पद्धत होती. अर्थात् दक्षिण भारत हे मसाल्याच्या पदार्थांचे आगरच असल्यामुळे त्यांचा वापर मुक्तहस्ताने करणे हे अगदी स्वाभाविक होते. तरीसुद्धा तेथे मिरी, हळद, आल्याच्या मानाने वेलचींचा वापर कमी प्रमाणात होत असावा असे प्राचीन काळातील नोंदीवरून समजते.

चरक, सुश्रुत आणि वाग्भट्ट या तीन प्राचीन वैद्यराजांनी भारतीय वैद्यकीय विज्ञानाचा पाया घातला. भारतीय पुरा कथेप्रमाणे जगाचा निर्माता ब्रह्मा असून त्याने वैद्यकीय ज्ञान प्रजापतीला दिले. प्रजापतीने अश्विनीकुमारांना सूचना दिल्या. त्यांनी हे ज्ञान सर्व देवांचा प्रमुख 'इंद्र' याला दिले आणि इंद्राने वैद्यकशास्त्र व औषधशास्त्राचे अधिकार आत्रेय आणि भारद्वाज यांना दिले, काश्यपाला बालरोगचिकित्सेचे प्रावीण्य बहाल केले आणि धन्वंतरीना शल्यशास्त्रचिकित्सक बनवले. आत्रेयांचे सर्व ज्ञान त्याचा शिष्य अग्निवेश याने लिहून ठेवले. इसवीसनाच्या पाचव्या शतकात या वैद्यकीय ज्ञानात सुधारणा करून चरकाने त्याचा पुनर्मांडणी केली, आणि चरकसंहितां लिहिली. चरकसंहितेत ३४१ औषधी वनस्पती, प्राण्यांपासून मिळणारी १७७ औषधे तर खनिजांपासून तयार होणाऱ्या ६४ औषधांचे विस्तृत विवेचन केले होते. चरकाने या सर्वांचा उपयोग करून आपली प्रकृती उत्तम राखण्यासाठी "आहारतत्त्व" सांगितले होते. यांत औषधांबरोबर अनेक पौष्टिक पाककृतींचा समावेश करण्यात आला असून बारीक व अशक्त व्यक्तींनी असे पदार्थ जरूर खावे असा सल्लाही दिलेला आढळतो. 'साम्यव' या गव्हापासून तयार करावयाच्या गोड पदार्थात तूप, साखर, दूध याबरोबर स्वादासाठी व औषधी गुणधर्मासाठी आले, मिरपूड आणि वेलची घालावयास सांगितली होती. मधुशीर्षक हा आणखी एक गव्हाचा गोड पदार्थ. 'प्युपलिका' म्हणजे गव्हाच्या किंवा तांदुळाच्या पिठाचा तूप घातलेला केक असून त्याच्या मध्यभागी मध असतो आणि स्वादाला अर्थातच वेलची असते.

मध्य भारतातील कल्याणचा राजा सोमेश्वर याने इ. स. ११३० साली मानसोल्हास हा

ग्रंथ लिहिला होता. त्यात राजाची कर्तव्ये, त्याची वागण्याची पद्धती, राजाने मन रिझवण्यासाठी करावयाच्या गोष्टी या साऱ्यांचा ऊहापोह केलेला आढळतो. त्या ग्रंथात राज्याच्या खास मुदपाकखान्यात मेजवानीच्या वेळी कोणत्या शाही पाककृती कराव्यात त्याची सुद्धा नोंद आढळते. दुधापासून तयार करता येण्यासारखे अनेक पदार्थ त्यात दिले होते.. दुधात दही घालून दूध नासवून त्यापासून छन्ना तयार करावा व त्यांत तांदुळाचे पीठ घालून तुपात तळून साखरेत घोळवावे व मग स्वादाकरता त्यावर वेलची दाणे पसरावेत अशा तऱ्हेच्या पाककृती त्यात दिल्या होत्या. दूध फाटवून केलेल्या तऱ्हेतऱ्हेच्या बंगाली पक्कान्नांची ही सुरुवात होती असे इतिहासकार मानतात. इ. स. १००० व १५०० या कालखंडात कर्नाटकातील वेगवेगळ्या राजांच्या संदर्भात राजदरबारातील त्यांच्या सेवकांनी शाही मेजवानीची वर्णने लिहिली आहेत. इ. स. १४८५ साली 'तेरकनाबी बोम्मरस' या राजकवीने कन्नडमध्ये काव्य लिहिले होते. त्यांत नारळ, कढिलिंब आणि वेलची घातलेल्या वांग्याच्या भाजीचे वर्णन येते. इ. स. सोळाशेमध्ये "अण्णाजी" याने कन्नड भाषेत घरगुती जेवण व मेजवानीच्या वेळचे जेवण याची वर्णने केली होती. त्यात वेलचीयुक्त नारळाचे पुरण व मैद्याची पारी असलेल्या करंजीचे वर्णन आढळते.

इ. स. पंधराशेच्या सुमारास कर्नाटकात विजयनगरचे साम्राज्य प्रसिद्ध होते. येथील समृद्धी आणि सुबत्ता पाहून पाश्चात्त्य प्रवासी व्यापाराच्या उद्देशाने येथे येत असत. इ. स. १५०५ ते ८या काळात लुडोविको दी वर्थिमा हा इटालियन व्यापारी आला होता. धनधान्य, फळफळावळ, दूधदुभते या सर्व बाबतीत विजयनगरच्या साम्राज्यात आबादीआबाद असल्याचे त्याने आपल्या प्रवासवर्णनात लिहिले आहे. विजयनगरमधील वेलची आणि मिरी या मुबलक प्रमाणात आढळणाऱ्या मसाल्याच्या पदार्थांबद्दल त्याने आश्चर्य व्यक्त केले होते.

पाश्चात्त्य देशांतील व्यापाऱ्यांबरोबर काही वैज्ञानिक दृष्टी असलेले आणि ज्ञानार्थी प्रवासीसुद्धा भारतात आले होते. 'गर्शिया दी ऑर्टा ' Garcia da orta हा औषधे तयार करून देणारा पोर्तुगीज डॉक्टर इ. स. १५३४ साली भारतात आला. एकूण ३५ वर्षे त्याच गोव्यात वास्तव्य होते. त्याने संपूर्ण भारतभर भ्रमंती केली. त्याने लिहिलेला 'कलोक्वीज ऑन दि सिंपल्स ॲण्ड ड्रग्ज ऑफ इंडिया'' हा ग्रंथ त्याच्या सूक्ष्म निरीक्षणशक्तीची साक्ष देतो त्या ग्रंथांत त्याने दोन प्रकारच्या वेलचींच्या जातीची वर्णने करून त्यांची भारतीय आणि श्रीलंकन भाषातील नावेही नोंदवली होती. "भारतीय पुरुष विड्याच्या पानाची मध्यशीर काढण्यासाठी उजव्या हाताच्या अंगठ्याचे नख वाढवितात" त्या ग्रंथातील अशा बारीक सारीक तपशीलामुळे तत्कालीन समाजाचे दर्शन आपल्याला या ग्रंथाद्वारे होते.

युरोपमध्ये 'वेलची'चा प्रचार व प्रसार इतर मसाल्याच्या पदार्थांबरोबर झाला. रोम, ग्रीस इत्यादी देशांवासीयांना वेलची भावली असली तरी सर्वच युरोपियन देश वेलचीचा वापर करीत असत असे नाही. इंग्रजांना वेलची प्रिय होती तर फ्रेंचाना इंग्रजांइतके वेलचीचे प्रेम

नव्हते. इ. स. १३५९-६० मध्ये फ्रान्सचा राजा जीन ले बॉन Jean le Bom याला इंग्लंडमध्ये कैद केले होते. ही कैद नाममात्र होती. या राजाला मोकळेपणानी फिरण्याची बंदी असली तरी त्याला त्याच्या नातेवाईकांबरोबर सुखाने मजेत राहता येत होते. त्याच्या या कैदेतील आहारातसुद्धा वेलची, साखर, आले, लवंग, दालचिनी, जायफळ, पांढरी मिरी इत्यादी श्रीमंती पदार्थांचा समोवश होता. पण त्याच वेळी राजाच्या पत्नीच्या फ्रान्समधील स्वयंपाकघराचा शोध घेतला तर त्यांच्या स्वयंपाकात अजिबात वेलची वापरत नसत असे आढळून आले. अर्थात् वेलची वापरणे अथवा न वापरणे हे सर्वस्वी व्यक्तिगत आवडीनिवडींवर अवलंबून असते. जीन– ले– बॉन याने मात्र इंग्लंडमध्येच खाद्यपदार्थांतील वेलचीचा आस्वाद घेतला असावा अशी शक्यता इतिहासकार वर्तवतात. युरोपमधील नॉर्वे, स्वीडन, डेन्मार्क या स्कँडिनेव्हियन देशातील लोक अजूनही मोठ्या प्रमाणावर वेलची वापरतात. भारतातील एकूण उत्पादनाच्या चौथा हिस्सा वेलची एकट्या स्वीडनमध्ये निर्यात करताना या सर्व देशांत केकस्, पेस्ट्रीज, बिस्किटस् व अन्य गोड पदार्थांत वेलची घालतातच पण त्याबरोबर अनेक मद्ये तयार करताना वेलची वापरतात.

अरब लोक वेलचीचा स्वाद असलेली कॉफी पितात. त्यासाठी ते कधी कधी कॉफीच्या बिया दळताना त्यात वेलचीच्या बिया टाकतात म्हणजे आपोआप कॉफीला वेलचीचा स्वाद लागतो. कधी कधी अरब कॉफी ठेवलेल्या किटलीच्या तोटीत वेलचीचे दाणे ठेवतात. त्यामुळे कॉफी कपात ओतताना ती पुन्हा एकदा वेलची दाण्यांच्या गाळणीतून गाळली जाते आणि कॉफीला वेलचीचा स्वाद लागतो. भारत भ्रमणाला निघाल्यावर दार्जिलिंग, काठमांडू, हिमाचल प्रदेश येथे भेटी देण्याची फॅशनच पाश्चात्य देशात रुढ झाली होती. त्यामुळ वेलचीच्या वासाचा चहासुद्धा लोकप्रिय होऊ लागला. वेलचीच्या स्वादाचा चहा ही कल्पना मुळांत पाकिस्तान्यांची ! आता देशोदेशी या कल्पनेचा स्वीकार झालेला दिसतो. वेलचीयुक्त कोको हे पंचतारांकित हॉटेलमध्ये उपलब्ध असलेले आणखी एक श्रीमंती पेय !

कंबोडियामध्ये प्राचीन काळापासून वेलचीचे भरपूर पीक येत असे. कंबोडियाचे प्राचीन नाव 'ख्मेर' आणि त्यांच्या बोली भाषेला सुद्धा 'ख्मेर' असेच म्हणत असत. 'पोल' Pohl ही कंबोडियाच्या डोंगराळ प्रदेशात राहणारी जमात. या डोंगरउतरणीवर वेलचीची भरपूर झाडे येत असत. या प्रदेशातील वेलचीच्या झाडांचे प्रमाण इतके प्रचंड असे की त्या संपूर्ण डोंगरालाच कंबोडियन लोकांनी 'वेलचीचे डोंगर' असे नाव दिले होते. या डोंगराळ प्रदेशात हिंडून पक्व झालेली फळे गोळा करणे हा 'पोल' जमातीमधील लोकांचा व्यवसाय असे. आजसुद्धा हे लोक आपले सारे आयुष्य वेलचीचे पीक काढण्यात खर्च करतात. त्यांतील दुर्दैवाचा भाग असा की अत्यंत मेंहनतीने गोळा केलेली वेलची 'अडत्ये लोक' कवडीमोलाने त्यांच्याकडून विकत घेतात आणि व्यापाऱ्यांना मात्र चढ्या किमतीने विकतात. ही वेलची ग्राहकांपर्यंत पोचते तेव्हा त्या वेलचीची किंमत गगनाला जाऊन भिडलेली असते. म्हणजे

अडत्ये आणि व्यापारी या व्यवहारात आपला लाभ करून घेतात. कंबोडियाप्रमाणे मलबार, श्रीलंका, इंडोचायना, थायलंड या सर्व देशात मोठ्या प्रमाणावर वेलचीचे उत्पादन होते.

ऊर्ध्वपातन पद्धतीने वेलीतील तेले काढता येतात. वेलचीतील या तेलांचे प्रमाण वेलचीच्या जाती व प्रतीवर अवलंबून असते. हे प्रमाण सुमारे २ ते १० टक्के असते. यांतील मुख्य घटक सिनिओल Cineole $C_{10}H_{18}O$ आणि अल्फा टर्पिनील ॲसिटेट terpenyl acetate $C_{12}$ $H_{20}$ $O_2$ हे असतात. आमोमम ॲफ्रामोमम Amomum Aframomum आणि अल्पिनिया Alpinia हे वेलचीसारखे दिसणारे मसाल्याचे पदार्थ आफ्रिका व आशिया खंडात वापरतात. उत्तम दर्जाच्या वेलचीत व्यापारी याची भेसळ करतात.

भारतात काश्मिरपासून कन्याकुमारीपर्यंतच्या वेगवेगळ्या प्रांतातील गोड पदार्थ जरी भिन्न असले तरी या 'विविधतेतील एकता' म्हणजे त्यात असणारा वेलचीचा स्वाद !

---

लोकशाहीमध्ये जनमत ही अखेरची निर्णायक शक्ती असल्याने ते डोळस व प्रभावी बनविणे हे वेगवेगळ्या क्षेत्रातील व्यासंगी कार्यकर्त्यांचे आद्यकर्तव्य आहे. कल्याणकारी राज्यात तर संमती आणि स्वातंत्र्य, सामाजिक न्याय आणि आर्थिक सुरक्षितता समानता आणि बंधुभाव इत्यादी मूल्ये सर्वांनी प्रमाण मानलेली असतात. तेव्हा आपल्या देशातील निरनिराळ्या संस्थांची घडण व कार्यपद्धती ही आपल्या सामाजिक उद्दिष्टांशी कितपत सुसंगत आहेत याची विचारवंतांनी वारंवार छाननी केली पाहिजे. सर्वसामान्य लोकांची दृष्टी बहुधा तात्कालिक प्रश्नांवर खिळलेली असते. कोणत्याही गोष्टीचे दूरगामी परिणाम सहसा त्यांच्या लक्षात येत नाहीत. भोवतालची परिस्थिती अधिकाधिक बिकट व गुंतागुंतीची होऊ लागली की ते गोंधळून जातात. अशा वेळी योग्य मार्गदर्शक न लाभल्यास लोक प्रवाहपतित किंवा प्रतिगामी बनण्याचा संभव असतो. म्हणून या बाबतीत विचारवंतांची जबाबदारी मोठी आहे.

**– गं. भा. सरदार**

सत्यान्वेषणात गढून गेलेले संशोधक व तत्त्वचिंतक हे कोणत्याही समाजाचे डोळे होत.

**– गं. भा. सरदार**

ज्ञान हे उपयुक्त असो वा नसो त्याचे पावित्र्य स्वत:सिद्ध आहे. जिज्ञासापूर्तीचा निरागस आनंद, मानवाच्या अंत:शक्तीचा स्वतंत्र विलास व संपूर्ण विकास हेच ज्ञानाचे खरे प्रयोजन आहे. ज्ञानाची निर्मिती, विकास व प्रसार ही कार्ये सातत्याने चालू राहावयास हवीत.

**– गं. भा. सरदार**



अनुक्रमणिका

फ्रांझ काफ्का
(१८८३-१९२४)

जागतिक वाङ्मयात स्वतःचे घराणे निर्माण करणारा
जर्मन कथा-कादंबरीकार.

विसाव्या शतकातील
या महान साहित्यिकाचा परिचय करून देणारा
मराठीमधील पहिला ग्रंथ

# थोडाबहुत काफ्का

शकु नी. कनयाळकर

१८८३-१९१८ या कालखंडातील काफ्काचा जीवनवृत्तांत.
'द ट्रायल' या कादंबरीचा संक्षिप्त अनुवाद.

चरित्रपट, वाङ्मयसूची इ. आर्टपेपरवरील ५२ छायाचित्रे
एकूण पृष्ठे २६० + ४ + १६

मूळ किंमत रु. २००
'नवी क्षितिजे' च्या वर्गणीदारांना सवलतीची किंमत रु. १२०

त्वरित संपर्क साधा
नाना जोशी
४ अ, सोमणनगर, क्रांतीवीर भाई बालमुकुंद मार्ग, मुंबई ४०००१२



अनुक्रमणिका